इंदुप्रकाशांतून क्रमशः प्रसिद्ध झालेली कादंबरी

# हीरक-वलय.



लेखक,


**रा. विठ्ठल सीताराम गुर्जर.**

जीवनसंध्या, प्रेम-संयोग, प्रेमकहाणी, गोप्यगोपन, भ्रमनिरसन,
सं० प्रणयमुद्रा, वगैरे पुस्तकांचे कर्ते.



प्रकाशक,

**दामोदर सांवळाराम आणि मंडळी.**

सन १९१२.

हें पुस्तक रा. रा. विठ्ठल सीताराम गुर्जर यांनीं लिहिलें, व रा. रा. दामोदर
सांवळाराम यंदे यांनीं, नं. ४३४ ठाकुरद्वार रोड, मुंबई येथें
"इंदुप्रकाश" छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.


किंमत ८ आणे.



# दोन शब्द.

काहीं वर्षांपूर्वी एका सुप्रसिद्ध बंगाली मासिक पुस्तकांत प्रसिद्ध झालेल्या एका ऐतिहासिक गोष्टीची अंधुक रूपरेखा आधारभूत धरून प्रस्तुत कादंबरी लिहिली आहे.

या पुस्तकाचीं सर्वच प्रुफें माझ्या नजरेखालून न गेल्यामुळें यांत बरेच मुद्रणदोष राहून गेले आहेत. परंतु ते वाचकांच्या सहज ध्यानांत येण्यासारखे असल्यामुळें मुद्दाम निराळें शुद्धिपत्र दिलें नाहीं.

मुंबई,
१५ जानेवारी १९१२.

पुस्तककर्ता.



# अर्पणपत्रिका.

प्रेमभरानें हातीं धरून ज्यानें मला

महाराष्ट्रवाङ्मयोद्यानांत विहार करावयास आणिलें,

त्या

**मासिक मनोरंजनास**

ही कृति

प्रेमादरपुरःसर समर्पण करितों.

वि. सी. गुर्जर.



# प्रेम-कथा.

-०0*0०-

[ १ ]

# हीरक-वलय.

## प्रकरण पहिलें.

### गृहत्याग.

कृष्णपक्षाची रात्र. काळोख तर मी ह्मणत होता! दोन हातावरचा पदार्थ दिसण्याची देखील मारामार! अशा धनघोर अंधकारराशीमधून विशालकाय दामोदर नद एखाद्या उन्मादग्रस्त वेड्या मनुष्याप्रमाणें--कोण जाणे कोणीकडे तें?--सारखा धांवत सुटला होता! जणु काय प्रलयकालच्या पंचमहाभूतांच्या प्रचंड कल्लोल आणि भीषण उल्हास यांच्या--योगानें तो अगदीं बेफाम होऊन गेला होता! दामोदराचे उत्तुंग तरंग जणु काय आकाशांतील तारकावलींचें चुंबन घेण्या-करितां उसळ्या मारीत होते! तरंगांवरोबर उसळणारा शुभ्र फेण तारकांच्या क्षीण प्रकाशांतहि दामोदराची क्षुब्धता दाखवून सृष्टिसुंदरीला भेवडाविण्याचा प्रयत्न करीत असे. जलकल्लोलांची भीषण गर्जना आस-पासच्या बऱ्याच अंतरापर्यंतचा भूमिभाग हलवून सोडीत होती. ती भयंकर गर्जना ऐकून आणि दामोदराची खवळलेली रुद्र मूर्ति पाहून सर्व जड प्रकृति अगदीं निस्तब्ध व स्तंभित होऊन गेली होती!

दामोदराचा जलप्रवाह ज्या वालुकामय भूमीचें चुंबन घेत वाहात जात होता, त्याच भूमीला लागून एक विस्तीर्ण पल्लव-मय घनदाट आमराई होती. सर्व जगांत होता नव्हता तेवढा सारा अंधकार, त्या आमराईंत एकमेकांना दृढ आलिंगन देऊन दृढतेनें उभे असलेल्या आम्रवृक्षा-वलींच्या पल्लवराशींच्या भोंवतीं, शाखा-समूहाच्या अंतरालामधून आणि वृक्षांला लपेटून राहणाऱ्या दुर्भेद्य गुल्मराजीच्या आसपास जणु काय एके ठिकाणीं गोळा होऊन राहिला होता! अंधकारांत मधून मधून टिकटिकाणीं काजव्यांचे पुंजकेच्या पुंजके चमकत होते. त्यांची शोभा फार विलक्षण दिसत होती. आमराईच्या एका कोंपऱ्याला एक पांढऱ्या रंगाची भव्य इमारत अंधकारांत अगदीं अंधुकपणें दि-सत होती.

यावेळीं जिकडे तिकडे अगदीं शांत होतें. एवढी विराट प्रकृति, पण यावेळीं अगदीं शब्दशून्य होऊन गेली होती. सर्व जगत् जणू काय घोर मायेच्या पाशांत सांपडून गंभीर निद्रेंत अगदीं निमग्न होऊन गेलें होतें. मधून मधून सोसाट्यानें व मधून मधून मृदुपणानें वाहणारा निशाकालीन वायु, वृक्षावलींच्या मस्तकांवर पुंजका करून राहणारे शेंकडों काजवे, अंधकारांत किंचित् स्मित करणाऱ्या पुष्प-कलिका आणि विश्वाच्या प्रारंभापासून सदा-सर्वदा निद्राविहीन असणारा विचित्र नील नभोमंडलांतील तारकासमूह--एवढींच काय ती त्यावेळीं जागृतावस्थेत होतीं!

दामोदराच्या विशाल वक्षःस्थलावर एकहि नौका त्यावेळीं दिसत नव्हती. एवढ्या

रात्रीं अशा वाऱ्याच्या सोसाट्यांत नदीच्या पलिकडे जाणारे उतारू बिचाऱ्या नाविकांना कोठून मिळणार? आणि नाविक तरी यावेळीं आपापल्या नावेंत उगीच तिष्ठत कशाला राहणार आहेत? मुशाफरखान्याचा प्रचंड दरवाजा यावेळीं अर्गलाबद्ध होता. गृहस्थांच्या घरांत, गरीबांच्या झोंपडींत आणि श्रीमंताच्या वाड्यांत यावेळीं एखाद दुसराच दिवा मधुन मधून मिणमिण करीत असलेला दिसून येई. नगरांतील राजपथावर एखादासुद्धां वाटसरू दिसत नव्हता. फक्त ज्यांना कोठेंहि आश्रय नाहीं अशीं चार दोन कुत्रीं वेळानें वेळानें आपल्या कर्कश भुंकण्यानें चहूंकडे पसरलेल्या निस्तब्धतेचा भंग करित असत.

अशा शांत निशीथकालीं, जिचें आह्मी वर वर्णन केलें आहे, त्या आमराईच्या शेवटीं एका कोपऱ्यांत असलेल्या शुभ्र इमारतीच्या वरच्या मजल्यावरील एका लहानशा खोलींत एक लहानसा दिवा अगदीं मिणमिण जळत होता. त्या मंद दीप प्रकाशांत एक तरुण परिचारिका कांहीं लहानमोठ्या बहुमूल्य वस्तु एकत्र करून त्यांची प्रवासाकरतां लहान गांठोडीं बांधून ठेवित होती. तिच्या तयारीवरून ती कोणासाठीं तरी प्रवासाची तयारी करित होती, हें उघड दिसत होतें. गांठोडी बांधित असतां ती दासी पुनः पुनः खोलीच्या दरवाजाकडे पहात होती.

त्या दासीनें आपल्या मताप्रमाणें प्रवासाला अवश्य लागणाऱ्या वस्तूंचीं चांगलीं चार पांच गांठोडीं बांधली. आणखींही कांहीं वस्तु आणावयासाठीं ती जाणार तों एक उंच, नाजुक बांध्याची, गौरवर्ण सुंदरी त्या खोलींत आली. तिचें मुखमंडल अगदीं म्लान होऊन गेलें होतें; त्यावरून तिला कसली तरी दारुण चिंता लागून राहिली होती, हें उघड दिसत होतें. खोलींत येतांच, सकरुण दृष्टीनें चोहोंकडे दृष्टिनिक्षेप करून चिंतेचा एक दीर्घ निश्वास टाकून तिनें खिन्न स्वरानें हळूच हांक मारली—"मरजीना!"

दासी आपल्या धनिणीच्या म्लान मुखाकडे पहात हात जोडून ह्मणाली "काय बिबिसाहेब? काय आज्ञा आहे?"

"तुझें सारें काम आटोपलें का? रात्र किती झाली आहे तें तुझ्या आहे का लक्ष्यांत? उगीच उशीर करण्यांत काय अर्थ? अगबाई! हें काय? अजूनपर्यंत तूं काय करित होतीस मरजीना?"

"हीं मीं गांठोडीं बांधून घेतलीं आहेत. आतांपर्यंत मी हींच बांधित होतें बिबिसाहेब!"

मरजीनानें बांधलेल्या गांठोड्यांकडे त्या अनिंद्य सुंदरीनें एकवार तिरस्कारदृष्टीनें पाहिलें. तीं पाहून तिच्या शुभ्र विशाल कपाळाला आंठ्या पडल्या! ती मरजीनाकडे पहात रागानें म्हणाली "मरजीना! दिवसं दिवस तुझी अक्कल अगदीं जात चालली हो! हीं तूं कशाला बांधून घेतलीं आहेस?"

धनिणीच्या या टोमण्याचें मरजीना बरीच खिन्न झाली. आपली धनीण आज आपणावर इतकी कां रागावली आहे, हें त्या विचारीच्या मुळींच ध्यानांत येईना! ती खालीं मान घालून ह्मणाली "आपणाबरोबर जें जें कांहीं घेतलं पाहिजे असं मला

वाटलं, तें मी यांत बांधून घेतलं आहे बिबिसाहेब ! "

" एवढया पांच सात गांटोड्यांत तूं बांधून तरी काय काय घेतलं आहेस ? "

" आणी कांहीं नाहीं बिबिसाहेब ! कांहीं मोठमोठे हिऱ्यांचें, माणकांचे आणि इतर रत्नांचे दागिने, सुटं जवाहीर, मोत्यांचें अलंकार, थोडेसे जडावाचं काम केलेले उंची उंची कपडे, तो आपला आवडता मोत्यांचा जाळीदार अंगरखा अन् कांहीं नक्षीचीं सोन्यारुप्याचीं लहान लहान भांडीं—" मरजीना धनिणीच्या मुखाकडे पहात ह्मणाली.

हें ऐकून ती सुंदरी मरजीनाच्या अंगावर ओरडली—" तुझं कपाळ अन् डोस्कं मरजीना ! तुला मुळीं ह्मणतां मुळीं कशी ती अक्कल नाहीं ! या मौल्यवान जिनसांची मला बिलकुल जरूरी नाहीं ! जा, हीं सारी गाठोडीं दामोदराच्या डोहांत एकदम फेंकून दे ! या साऱ्या डागिन्यांची, उंची पोषाकांची मला एक दिवस फार आवड होती. मला त्यांच्यापासून अतिशय सुख वाटत असे—पण आतां काय त्याचं ? माझं सारं सुख आटलं—माझे आनंदाचे अन् नटण्यामुरडण्याचे दिवस पार नाहींसे झाले ! आतां हे दागिने अन् वस्त्रं मला मातीमोल वाटतात ! मरजीना ! खरंच तूं अकलेची अगदीं खंदक आहेस ! मी हिंदु लोकांच्या मुलींप्रमाणें आज आपल्या सासरीं जात्यें आहे असं का तुला वाटलं ? मग हे सारे जिन्नस बरोबर कशाला घेतले आहेस तूं ?"

मरजीना हें ऐकून आश्चर्यचकितच होऊन गेली ! आपली यजमानीण ह्मणजे आपणाला अशी कडाडून बोलेल अशी त्या बिचारीची कल्पना देखील नव्हती ! ती कांपत कांपत ह्मणाली " बिबि-साहेब ! मला वाटलं, कीं, या साऱ्या दागिन्यांची अन् जिनसांची आगऱ्यांत आपणाला फार जरूर लागेल. यांची जरूर लागणार नाहीं, असं जर मला वाटलं असतं, तर मग मी उगीच हे बांधून तरी कशाला घेतले असते ? "

त्या सुंदरीनें आश्चर्यचकित होऊन विचारलें " ह्मणजे ? तूं ह्मणते आहेस तरी काय मरजीना ? मी आगऱ्याला जाणार ह्मणून तुला कुणीं सांगितलं ? मला आगऱ्याला जायचं असतं तर इतकं चोरून कशाला जायला हवं होतं ? हेंसुद्धां का तुझ्या लक्ष्यांत येऊं नये ? "

" तर मग आपण नदीवर नौका तयार ठेवायची तजवीज करायला मला कशाला आज्ञा केली ? "

" मला दामोदराच्या पलीकडे जायचं आहे ह्मणून ! नौकेंतून जायचं तें केवळ आगऱ्यालाच वाटतं ? "

" अगबाई ! मला खरंच वाटत होतं कीं, आपण आगऱ्यालाच जाणार ह्मणून ! दामोदराच्या पलिकडे गेल्यावर आपण कुणीकडे जाणार बिबिसाहेब ? "

" जिकडे मला माझे पाय नेतील तिकडे ! "

सुंदरीच्या मुखांतून शब्द फुटेना ! तिचा कंठ भरून आला—उभय नेत्रांत दोनचार अश्रुबिंदु चमकूं लागले !

मरजीना ही त्या घरांतील बरेच दिव-सांची जुनी, पण स्वामिनीनिष्ठ दासी होती. त्यामुळें तिला तेथें एका प्रकारचा अधिका-

आला होता. त्यांतून ज्याच्या त्याच्यावर पगडा ठेवून बोलवयाची तिला एक वाईट खोड लागलेली होती. आपल्या धनिणीला मरजीना किंचित् वचकून असे हें खरें; परंतु प्रसंगीं ती तिलासुद्धां गप्प बसविण्यास कमी करित नसे. मात्र धोरण पाहून वागण्याचें तिच्या अंगीं मोठें कौशल्य असल्यामुळें ती कधीं अतिप्रसंग होऊं न देण्याविषयीं काळजी घेत असे.

आपली यजमानीण बरीच नरम आलेली पाहून मरजीना रागाचा अविर्भाव दाखवून त्या सुंदरीला ह्मणाली "बिबिसाहेब! मला वेडीला आपला हेतुच काय तो मुळीं कळत नाहीं! आपण आगऱ्याला जाणार नाहीं ह्मणतां—अन् इथंहि राहणार नाहीं ह्मणतां! मग आपण जाणार तरी कुठं बाई! या जगांत या दोन ठिकाणांशिवाय आपणाला रहायला स्थळ तरी आहे कुठं? हा महाल आपण आज सोडलात, कीं, आपला सारा आश्रय सुटला असं आपण समजा! मग आपण जाणार कुठं अन् करणार काय? वाटेंत आपणाला खायला तर पाहिजे? नुसता वारा खाऊन अन् पाणी पिऊन तर आपला निभाव लागायचा नाहींना?"

मरजीनाचें हें किंचित् कठोर भाषण ऐकुन तिच्या यजमानिणिला फार वाईट वाटलें असावें असें दिसलें. ती विषादपूर्ण स्वरानें अडखळत ह्मणाली "ज्याच्या विशाल राज्यांत एक मुंगीसुद्धां उपाशी मरत नाहीं, तो माझा योगक्षेम चालविल्याखेरीज कधींही रहाणार नाहीं मरजीना! त्याच्या विशाल राज्यांत कुठंना कुठं तरी तो मला स्थान देईल! तो दीनदयाळही जर मज अभागिनीवर कोपला तर निदान अन्नाशिवाय—उपास काढित—रस्त्यांत मरून जाणं तर माझ्या हातांतलं आहेना?"

परंतु या आशावादानें व्यवहारपरायण मरजीनाचें कसें समाधान होणार? तिला आपल्या धनिणीचा हा नीरस वेदान्त मुळींच रुचला नाहीं. ती रागारागानें त्या सुंदरीला ह्मणाली, "आपलं कीं नाहीं, सारंच उलटं बिबिसाहेब! या सुखानं ह्मणा, किंवा दुःखानं भरलेल्या ह्मणा—या दुनियेंतच रहावं अन् परमेश्वरानं दिलेलं सुखदुःख भोगावं एवढंच आमच्यासारख्या भोळ्या लोकांना वाटतं—परंतु आपला हिशेब उलटाच! आपणाला या जगाचाच मुळीं कंटाळा येऊन गेला आहे. आगऱ्यांत हिरेमोत्यांनीं मढविलेल्या सोन्याच्या सिंहासनावर विराजमान होऊन मोठ्या वैभवांत दिवस काढण्याच्या सुखकर कल्पनेपेक्षां रस्त्यांत उपास काढीत हाल अपेष्टांत मरून जाणंच आपणाला सुखाचं वाटतं! खरंच आपल्या सुखाच्या कल्पनाच कांहीं विचित्र आहेत!"

मरजीनाच्या पुराणाला तिची यजमानीण अगदीं कंटाळून गेली होती. ती कपाळाला आंठ्या घालून त्रासानें ह्मणाली, "मरजीना! माणसानं मेलं बडबडावं तरी किती? तुला जर माझा विचार रुचत नसेल तर तूं मजबरोबर येऊं नकोस! तुला जर ऐश्वर्याची अन् संपत्तीची एवढी आवड असली, तर माझी ही सारी संपत्ति मी तुला देत्यें—तूं ती सुखानं भोग—मजबरोबर तूं येऊं नकोस—मी जात्यें—"

मरजीनाला हा बाण बरोबर मर्मी लागला! आपल्या धनिणीवर तिची अतिशय भक्ति होती. तिच्या सुखवासाठीं मरजीना

आपला प्राण देण्यास देखील तयार झाली असती. यजमानिणीनें दाखविलेला हा तिरस्कार तिला बिलकुल सहन झाला नाहीं. मरजीना खरोखरच अतिशय कोमल हृदयाची होती. तिच्या डोळ्यांतून सळकन् अश्रु वाहूं लागले.

मरजीना बाष्पगद्गद कंठानें ह्मणाली " असं भलतंच काय बरं बोलावं, बिबिसाहेब ? माझा स्वभाव आपणाला ठाऊक असतां माझ्या हृदयाला असे घरे पाडणं आपणाला शोभत तरी का ? मला ऐश्वर्य नको, संपत्ति नको, कांहीं नको. माझं सर्वस्व काय तें आपण ! "

त्या सुंदरीलाही आतां किंचित् वाईट वाटलें. ती मृदुस्वरानें मरजीनाला ह्मणाली " तर मग तूं माझ्या बरोबर येणार ना ? "

" कुणाचं ऐकायचं ह्मणून नाहीं, असाच जर आपला हट्ट असला, तर काय करायचं ! परंतु माझं भविष्य ऐका-शेवटीं आपणाला परत इथच यावं लागेल. "

" बरं बरं-लागूं दे परत यावं लागल तर ! "

" चलावं तर बिबिसाहेब ! या जिनसांची जरूर नाहीं ना ? "

" मुळींच नाहीं-यायचं असलं तर चल मजबरोबर. आधींच ठरलेली वेळ होऊन गेली आहे. उगीच उशीर करण्यांत काय अर्थ आहे ? "

असें ह्मणून ती सुंदरी प्रयाणास सिद्ध झाली. खोलींतला मिणमिण करणारा दिवा मालवून त्या अंधकारपरिपूर्ण इमारतींतील कित्येक दालनें व खोल्या उलटून, त्या दोघी युवती सोपानपंक्ति उतरून खालीं आल्या व कांहीं न बोलतां घराच्या बाहेर पडल्या; बाहेर पडतांना सजल नयनांनीं दोघींनींहि त्या भव्य इमारतीकडे शेवटची दृष्टि फेंकली.

वरतीं मोकळें नील आकाश त्यांच्याकडे टवकारून पहात होतें. आकाशकटाहांत असंख्य तारका असंख्य हीरकखंडांप्रमाणें अंधकारांत चमचमत होत्या ! आपल्या लिकलिकणाऱ्या नेत्रांनीं त्याही या दोघींचा जणुं काय उपाहासच करित होत्या ! आसपासच्या वृक्षवेलींच्या अर्धविकासित कलिकावृंदाच्या अल्पस्वल्प, परंतु अतिशय बहारीच्या सुगंधानें दरवळेला मृदु समीरण यावेळीं हळु हळु वहात होता ! तोही आपल्या मृदु श्वासानें यांची अवहेलनाच करित होता ! वर खालीं, उजवीकडे, डावीकडे-जिकडे तिकडे घोर अंधकार यांना ग्रासावयास येत होता ! त्या घोर अंधकारराशीला लवमात्र न जुमानतां दोघीजणी एकावस्त्रानिशीं नगरांतून बाहेर पडल्या. एकच मर्मभेदी दीर्घ निश्वास-त्या व्याकुल हृदयाच्या आंतर भागांतून निघून शून्यांत मिसळून गेला ! हाय ! भाग्य!

यजमानीण पुढ-परिचारिका मागाहून, याप्रमाणें त्या बराच वेळ चालत होत्या. दोघींच्याहि मुखांतून एक चकार शब्दही येत नव्हता ! मधली एक मोठी बाग ओलांडून पलीकडले तीन चार रस्ते ओलांडले कीं नदीतीर ! दोघी रस्ता तोडीत होत्या.

जातां जातां मध्येंच कोणी वस्त्र ओढल्याचा सुंदरीला भास झाला. तिनें झटकन् मागें वळून पाहिलें. तत्क्षणीं तिच्या लक्षांत आलें कीं, त्या भयाण स्थलीं, घोर अंधकार पाहून मरजीना अतिशय भ्याली आहे !

मरजीनाचा हात धरून ती मृदु स्वरानें ह्मणाली, " मरजीना! माझ्या जवळ ये! पोरी, भ्यालीस वाटतं? अजून किती दूर आहे?"

मरजीना कांपत कांपत अस्फुट-स्वरानें ह्मणाली " तो पलीकडील रस्ता उलटला कीं दामोदराचा तीर आलाच! पण मला भारी भय वाटतं हो—बिबिसाहेब! काय बाई हा भयंकर अंधकार अन् काय ही भयाण जागा! अन् आतांच सुकलेल्या पानांवर कुणा तरी मनुष्याच्या पावलांचा शब्द मीं खास ऐकला!"

" तुझं डोस्कं मरजीना! तूं चाललीस ह्मणून शहरांतल्या मांजरांनीं अन् कुत्र्यांनीं दिखील का रस्त्यांत फिरूं नये? एवढ्या रात्रीं माणसं कशाला मरायला येताहेत इथं? चल—चालूं लाग झटकन्."

मधला रस्ता ओलांडून दोघीजणी थोड्याच वेळांत त्या अंधकारांतच नदीच्या वालुकामय तीरावर येऊन पोंचल्या. जवळच नदीच्या पात्रांत एक नौका नांगरली असून तिच्यांत एक मंद दिवा पेटत होता.

आपल्या धनिणीचा हात धरून मरजीना मृदु स्वरांत पुटपुटली "बिबिसाहेब! अजूनही विचार करावयाला जागा आहे. आपण दोघीही स्त्रिया—त्यांतून आपलं रक्षण करायला आपण कुणाही रक्षकाला बरोबर घेतला नाहीं. पहा—अजून नीट विचार करा—परत फिरायला अजून आपणाला वेळ आहे. आपलं हें अप्सरेप्रमाणं सौंदर्यच रस्त्यांत आपलं शत्रु होईल, या गोष्टीचा आपण विचार केला आहे का बिबिसाहेब!"

"होय—या गोष्टीचा मीं नीट विचार केला आहे—अन् त्याचा उपायही मी तयार करून ठेविला आहे. दिवसा रस्त्यांतून प्रवास करावयाचा नाहीं, रात्रीं करावयाचा असं मीं ठरविलं आहे; अन् त्यांतूनही जर कांहीं मजवर संकट आलं तर बरोबर मीं जालीम विष घेऊन ठेविलं आहे. आतां तरी तुझं भय गेलं कीं नाहीं मरजीना?"

मरजीना कांहींच बोलली नाहीं.

अश्रुपूर्ण नयनांनीं आपल्या चिरप्रिय निवासस्थानाकडे सतृष्ण दृष्टिपात करून त्या सुंदरीनें आपल्या गृहाचा जन्माचा निरोप घेतला. एक हृदयभेदी दीर्घ निःश्वास टाकून ती ह्मणाली " चल मरजीना! आपणाला गेलं हें पाहिजेच. पाण्यांतून जाऊन आपण नौकेंत बसूं या—माझा हात धर ये."

---

## प्रकरण दुसरें.

—:*:—

### ' भविष्य खरं झालं! '

मरजीनाचा हात धरून ती सुंदरी किनाऱ्यापासून थोड्याच अंतरावर नांगरून ठेविलेल्या नौकेकडे निघाली. गुडघाभर पाण्यांतून त्यांना थोडेंसें अंतर तोडावयाचें होतें. तें तोडित तोडित त्या नौकेपासून पांच चार हातांवर येऊन ठेपल्या. मरजीनाच्या यजमानिणीनें फिरून एकदां मागें पाहून एक दीर्घ निःश्वास टाकला. तिच्या डोळ्यांतून खळकन् एक दोन अश्रुबिंदुहि आले. वरच्या अनंत तारकामंडित नील नभोमंडलाकडे तिनें एकवार सजल नय-

नांनीं पाहिलें व हात जोडून अस्फुट वाणीनें कांहीं पुटपुटून ती नौकेकडे निघाली.

ती एक पाऊल पुढें सरते तों दोघेजण-सशस्त्र सैनिक नौकेंतून उतरून त्यांच्या समोर उभे राहिले ! दोघांच्याही हातांत नुकत्याच पेटविलेल्या मशाली होत्या. मशालींच्या क्षीण प्रकाशांत त्या दोघी युवतींना निरखून ते दोघेहि सैनिक एकदम ओरडले " दिल्लीश्वराचा जयजयकार असो ! बेगमसाहेबांचा जय असो ! "

" दिल्लीश्वराचा जय असो ! बेगमसाहेबांचा जय असो ! "

दिल्लीश्वर ! बेगम ! आहे काय प्रकरण हें ? दिल्लीश्वराचा येथें काय संबंध ? आणि ही बेगम तरी कोण ? दामोदराच्या तीरावरील चिखलानें भरलेले आणि प्रथम स्तंभित होऊन गेलेले त्या सुंदरीचे चरण हा अनपेक्षित प्रकार पाहून आणि त्याहिपेक्षां हे अनपेक्षित शब्द ऐकून भीतीनें आणि विस्मयानें एकदम मागें सरले ! दोन पावलें मागें सरून सुंदरी मेहेरउन्निसानें त्या दोघां सैनिकांकडे एकवार कठोर दृष्टिनिक्षेप केला. रस्त्यानें स्वच्छंदानें जाणाऱ्या पथिकाला त्याच्या अगदीं पायाशींच एखादा लांबलचक आणि प्रचंड कृष्णसर्प दिसला असतां तो जसा चमकून जातो, त्याप्रमाणेंच त्या सैनिकांच्या दर्शनानें मेहेरउन्निसा चमकली ! विस्मयानें आणि भीतीनें तिचें हृदय धडधडूं लागलें !

परंतु मेहेरउन्निसा ही सामान्य स्त्री नव्हती. ती फार धोरणी आणि प्रसंगावधानी होती. संकट प्रसंगीं तिला दुप्पट धैर्य चढत असे ! तत्क्षणी सर्व खरा प्रकार तिनें तेव्हांच ताडला. आपणाला आगऱ्याला जनानखान्यांत घेऊन जाण्याकरतां खुद्द बादशहानें थोडेंसें सैन्य पाठविलें असावें आणि त्या बादशाही सैन्यापैकींच हे सैनिक असावे, हें मेहेरजानच्या ताबडतोब लक्ष्यांत आलें. बादशहाचे लोक वर्धमानला अल्पावकाशांतच येऊन पोंचतील ही बातमी मेहेरजानला अगोदरच लागली होती आणि ते येऊन पोंचण्यापूर्वीच आपण येथून ' यः पलायते ' करावें, असा हेतु धरूनच ती आज अशा भयाण मध्यरात्रीं आपल्या वाड्याबाहेर पडली होती. परंतु मनुष्य चिंतितो एक आणि ईश्वर करतो भलतेंच ! असाच प्रकार या ठिकाणींही झाला ! मेहेरउन्निसाचा हेतु सिद्धीस गेला नाहीं. तिनें वर्धमान सोडण्यापूर्वीच बादशहाचे लोक तेथें येऊन पोंचले होते !

त्या दोन युवतींचा पथरोध करणाऱ्या दोघां सैनिकांपैकीं एकजण वृद्ध होता. त्याचे केस पिकून पांढरे सफत झाले होते. तरी त्याच्या तोंडावर वीरश्रीचें तेज विराजमान झालें होतें. केशांच्या पक्वतेशिवाय त्या सैनिकांत वृद्धपणाचीं इतर चिन्हें फारशीं दृग्गोचर होत नव्हतीं. त्याची मुद्रा सतेज, परंतु सौम्य दिसत होती. दुसरा सैनिक अगदींच तरुण होता.

त्या वृद्ध सैनिकाकडे तुच्छतेनें पहात कठोर स्वरानें मेहेरजान ह्मणाली " तुह्मी कोण आहां ? एवढ्या रात्रीं आह्मा अबलांना दरडावणारे शूर पुरुष तुह्मी आहां तरी कोण ? अन् आमच्या नौकेंत तुह्मी कां ? "

दोघां सैनिकांच्या हातांतील टेंभे यावेळा चांगले जळत होते. त्यांचा चंचल प्रकाश त्या अनिंद्य सुंदरीच्या सुंदर मुखकमलावर अस्थिरपणें पडला होता. त्या

प्रकाशांत मेहेरजानचा उद्धत, पण अभिराम ग्रीवाभग पाहून आणि तिचे ते तेजोमय शब्द ऐकून त्या तरुण सैनिकांच्या हृदयांत कांहीं विलक्षणच खळबळ सुरू झाली ! परंतु वृद्ध सैनिकावर मेहेरजानच्या त्या कठोर शब्दांचा कांहींसुद्धां परिणाम झाल्याचें दिसलें नाहीं ! तो दृढतेनें, परंतु नम्र स्वरानें ह्मणला " आह्मी दिल्लीश्वराचे सेनापति आहों. आह्मीच आपली नौका आमच्या ताब्यांत घेतली. बेगमसाहेबांनीं या दासांच्या कसुरीची माफी करावी. आह्मीं किती झालों तरी दिल्लीश्वराचे नोकर. प्रभूचा हुकूम इमानें इतबारानें पाळणें हेंच आमचें परम कर्तव्य होय. ह्मणून बेगमसाहेबांना आमची विनंति आहे, कीं, त्यांनीं या दासांवर कोप करूं नये. "

" परंतु आमची नौका आपल्या ताब्यांत घ्यायचं तुह्माला कारण काय ? कुणाच्या हुकुमानं तुह्मी हें केलं ? "

" दिल्लीश्वराच्या ! "

मेहेरजान तिरस्कारपूर्वक हंसत ह्मणाली " ठीक ठीक ! तुमचा दिल्लीश्वर तरी मोठा विलक्षणच प्राणी दिसतो आहे! एखादी निःसहाय अनाथ अबला पाहून तिला त्रास द्यायला त्यानं आपले नोकर पाठवावेत, हें त्याला योग्य दिसतं का ? सभ्य गृहस्थांच्या अंतःपुरांत ढवळाढवळ करायचं त्याला काय कारण ? अन् तुम्ही तरी मला बरेच दिसतां ! बादशहाचं नांव सांगून वाटेल तो गोंधळ घालायला अन् गरीब निःसहाय स्त्रियांना त्रास द्यायला तुह्माला लाज नाहीं वाटत ? आमची नौका आपल्या ताब्यांत घ्यायला तुम्हांला कांहीं जरूर नव्हती! "

सुंदरीनें दर्शविलेला तिरस्कार फारच तीव्र होता ! मेहेरजानसारख्या अप्रतिम लावण्यशालिनी अप्सरेचा तिरस्कार सहन करावयालाहि निधड्या छातीचाच मनुष्य लागत असतो. रहमतखां—दिल्लीश्वराचा वृद्ध सेनापति—त्या प्रसंगीं तेथें होता, म्हणूनच कांहीं तरी बरें होतें ! नाहीं तर दुसऱ्या एखाद्या लेच्यापेच्या माणवकाची मेहेरजानच्या विषयुक्त तीव्र कटाक्षांपुढें आणि तीव्र तिरस्कारापुढें गाळणच उडून गेली असती !

वृद्ध रहमतखां दृढतेनें आणि निश्चल दृष्टीनें मेहेरजानकडे पहात तसाच उभा होता. रहमतकडे आपल्या भेदक नजरेनें पाहून किंचित् क्रोधानें मेहेर ह्मणाली " आपला हा वीरोचित पोषाक पाहून अन् आपली ही लखलखणारी शस्त्रं बघून आपण दिल्लीपतीच्या सेनापतींपैकीं अगदीं उच्च दर्जाचे सेनापति असाल अशी माझी कल्पना होते. "

रहमत हात जोडून ह्मणाला " बेगमसाहेबांचा तर्क चुकला नाहीं. शहानशहांचा मी प्रमुख सेनापति आहें. "

पुनः एक विषारी तीव्र कटाक्ष! मेहेरजाननें किंचित् दराडवर्णाच्या स्वरानें पुनः रहमतला विचारिलें " तर मग एखाद्या भित्र्या चोराप्रमाणें माझ्या अंतःपुरांत आपण कां शिरलांत ? "

" दिल्लीश्वराच्या आज्ञेनें ! "

" बद्बख्त्-बे-आदब ! तुह्मी दिल्लीपतीचे प्रमुख सेनापति असून काय भलतंच बोलतां हें ? तुह्माला हृदयच नाहीं का ? दिल्लीश्वराचा हुकूम झाला ह्मणून काय झालं ? असला दुष्ट आणि धडधडीत अन्यायाचा

हुकूम पाळायला तुह्माला लज्जा कशी नाहीं वाटली ! धिक्कार असो तुह्माला अन् तुमच्या या पांढऱ्या केशांना ! "

सेनापति रहमतखां मेहेरजानचे हे तिरस्काराचे शब्द ऐकून अत्यंत खिन्न झाला तो हात जोडून स्थिर भावानें ह्मणाला आपण जें जें कांहीं बोलाल तें मला मुकाट्यानें सहन केलेंच पाहिजे. प्रभूला उलटून बोलणें किंवा त्याची यत्किंचितूही बेअदबी करणें हें सेवकाचें कर्तव्यच नव्हे ! बिबिसाहेब ! दासाच्या अपराधाची माफी असावी. मी दिल्लीश्वराच्या आज्ञेनें इकडे आलें, यांत आपणाला माझा खरोखरच अपराध वाटतो का ? वाटत असेल, तर वाटेल ती शिक्षा आपण मला फर्मावावी— ती आनंदानें भोगण्यास मी तयार आहें ! "

मेहरजानला रहमतखांच्या या युक्तिवादाची सत्यता पटली नाहीं असें नाहीं, परंतु यावेळीं माघार घेणें बरें नाहीं असा मनांत विचार करून ती कठोर स्वरानें त्या वृद्ध सेनापतीला ह्मणते " धन्याचा आणि त्यांतून प्रत्यक्ष दिल्लीच्या बादशहाची आज्ञा झाली ह्मणून काय झालें ? तिची पात्रता अपात्रता याचा विचार देखील सेवकानं करायला नको का ? न्यायान्याय बुद्धीला सेवकानं फांटाच दिला पाहिजे असं कोणीही सुज्ञ मनुष्य ह्मणणार नाहीं. अन् तुह्मी तरी मला खरं खरं सांगा—तुमचे केश पक्क झाले आहेत. हा विचार मनांत आणून तरी मला खरं सांगा—खुद्द बादशहानं तरी तुह्माला एखाद्या चोराप्रमाणं माझ्या अंतःपुरांत हळूच प्रवेश करायचा हुकूम दिला होता का ? तुह्माला माहित आहे का सेनापति साहेब ? या नगरींत खां साहेबांचे शेंकडों सैनिक अन् पाहारेकरी या वेळीं निद्रित आहेत माझ्या आरोळीचा एक शब्द त्यांनीं ऐकला तर ते आपल्या शरीराचे तिळा एवढे तुकडे तुकडे करून टाकतील हें आपल्या पक्कं लक्षांत असूं द्या ! "

वृद्ध रहमतखां दृढतेनें तसाच उभा होता. मेहेरजानच्या भय प्रदर्शनाचा त्या वीरावर कांहीं सुद्धां परिणाम झाला नाहीं. तो दृढ स्वरानें परंतु अत्यंत नम्रपणानें मेहेरजानला ह्मणाला " बेगमसाहेब ! आपल्या धमकीनें मला कांहीं सुद्धां भीति वाटली नाहीं. आह्मी वीर आहों—मरण्यासाठींच आमचा जन्म आहे—मरणाची आह्मांला मुळींच भीति वाटत नाहीं. बिबिसाहेब ! या घनदाट अमराईंत आमचे पांचशें शूर शिपाई सुखानें निद्रा घेत पडले आहेत— माझ्या या तुतारीच्या आवाजाबरोबर ते सारे एकदम येथें धांवून येतील; ही गोष्ट आपणाला ठाऊक नसल्यामुळेंच आपण ही मला धमकी दिली असावी असें मला वाटतें. आणि दिल्लीश्वराच्या कार्य लवासाठीं या पिकलें पान झालेल्या रहिमतखांचे तुकडे झाले ह्मणून काय झालें ? प्रभूच्या कार्यसाधनासाठीं आपला उपयोग झाला असं समजून माझ्या या शरिराचा प्रत्येक तुकडा आपल्या शत्रूचें हितचिंतनच करील, अशी माझी खात्री आहे. मी मरण पावलों, तर दुसरा कोणी तरी सेनापति नेमून शेर साहेबांच्या सैनिकांचा माझे शूर शिपाई पक्का सूड घेतील, हें आपण खास समजावें !"

दिल्लीपतीच्या वयोवृद्ध सेनापतीच्या भाषणाच्या प्रत्येक शब्दाबरोबर मेहेरउन्निसाच्या हृदयाचा थरकांप होऊं लागला ! परंतु त्या साहसी रमणीनें आपल्या मुखा-

वर भीतीचें लवमात्रहि चिन्ह प्रगट केलें नाहीं ! मेहेर उन्निसासारख्या शूर स्त्रियेला असलें संकट म्हणजे कःपदार्थ होता ! कांहीं वेळ शांत चित्तानें विचार केल्यावर सभोंवतालची सर्व परिस्थिति त्या रमणीच्या चांगली ध्यानांत आली. याप्रसंगीं काय केलें पाहिजे, याबद्दलचा विचार तिनें आपल्या मनाशीं चालविला.

कांहीं वेळानें रहिमतखांकडे स्थिर दृष्टीनें पहात मेहेरजाननें विचारलें " आपलं नांव काय सेनापतिसाहेब ? "

" या बंद्याला रहमतखां म्हणतात. "

" आपणच दिल्लीश्वराचे मुख्य सेनापति अहां वाटतें ? "

" होय बेगमसाहेब ! मीच मुख्य सेनापतीच्या जागेवर आहें. "

मेहेरजान इतका वेळ कांहीं विचार करित होती. रहमतखांला कांहीं एक प्रश्न विचारण्यांचें धाडस तिच्यानें होत नव्हतें. कांहीं वेळानें तिनें रहमतखांला कोमल स्वरानें विचारिलें—" रहमतखां ! दिल्लीश्वराचा आपणाला काय हुकूम आहे ? मला बंदिवान् करून आगऱ्याला न्यायची बादशहांनीं आपणाला आज्ञा केली आहे का ?

रहमतखां घाईनें म्हणाला " छे छे छे ! हें कधीं तरी संभवनीय होईल का ? बेगम साहेबांनीं असें भलतेंच कांहीं मनांत आणूं नये. शहानशहांनीं एखाद्या साम्राज्ञीला शोभेल अशाच थाटानें व सन्मानानें आपणाला आगऱ्यास घेऊन यावयाचा मला हुकूम केला आहे. मजबरोबरचें सम्राटाचें सैन्य आपणाला बंदिवान् करावयाकरितां आलल नसून साम्राज्ञी म्हणून आपणाला दिल्लीच्या तखतावर बसविण्याकरितां आलें आहे. आमच्या प्रभूंविषयीं बिबिसाहेबांनीं आपला असा भलताच गैरसमज करून घेऊं नये. '

" तर मग तुम्ही आमच्या या नगराला वेढा कां दिला आहे ? "

रहमतखां हात जोडून नम्रपणें म्हणाला " आमचा खरोखर त्यांत कांहीं अपराध नाहीं. येथून एक दोन मुक्कामांच्या अंतरावर असतां आमच्या हेरांकडून आम्हांला अशी बातमी कळली कीं, बिबिसाहेब वर्धमान सोडून आजच कोठेंतरी बाहेर जाणार आहेत. आम्ही मजल दरमजल सारखी दौड करीत आजच येथें येऊन पोंचलों. खुदातालीची आमच्यावर मोठी कृपा म्हणूनच आपण आज आमच्या दृष्टीस पडलां. आम्हीं येथें येऊन पोंचण्यापूर्वीच जर वर्धमान सोडून आपल्या बेताप्रमाणें आपण दुसऱ्या कोठें निघून गेलां असतां, तर मग आमची धडगत नव्हती. शहानशहांनीं आमचें डोकेंच मारलें असतें ! "

मेहेरउन्निसाचें रहमतखांच्या भाषणाकडे फारसें लक्ष नव्हतें. ती स्थिर चित्तानें मनांतल्या मनांत बराच वेळ कांहीं विचार करीत होती. कांहीं वेळानें किंचित् स्मित करून त्या वृद्ध सेनापतीला उद्देशून ती म्हणाली " रहमतखां ! जरा इकडे चला, मला तुमच्याशीं कांहीं बोलायचें आहे. "

" जशी बेगम साहेबांची आज्ञा ! "

मेहेरजान पुढें निघाली. रहमतखां कांहीं न बोलतां तिच्या मागोमाग निघाला. नौकेपासून बऱ्याच अंतरावर मेहेरउन्निसा उभी राहिली. तिच्या शेजारीं कांहीं अंतरावर रहमतखां नम्रपणें उभा राहिला.

कांहीं दृढनिश्चय करून मेहेरजाननें बोलावयास प्रारंभ केला—" रहमतखां "

" सेवेला दास तयार आहे. बेगम साहेबांनीं बंद्याला हुकूम करावा. "

" मी जर तुमच्याबरोबर आलें नाहीं तर ?–"

" तर मग आमचा इलाज नाहीं. आह्मी या नगराला वेढा घालून राहूं. कोणालाही नगराच्या बाहेर जाऊं देणार नाहीं. सर्व हकीकतींचा खलिता लिहून शहानशहांकडे आगऱ्यास रवाना करूं आणि त्यांच्याकडून जसे हुकूम आह्मांला येतील तसें आह्मी पुढें करूं. त्याशिवाय आह्मांला गत्यंतरच नाहीं. थोड्याच दिवसांनीं साम्राज्ञीपदावर ज्या आरूढ होणार त्यांच्या मर्जीविरुद्ध आह्मांला कांहींसुद्धां करतां कामा नये ! "

मेहेरउन्निसाच्या या डावाचा फारसा उपयोग झाला नाहीं. वृद्ध रहमतखांचे केंश उगीच पांढरे झालेले नाहींत असें तिच्या प्रत्ययास आलें तरीहि मेहेरजानचा धीर खचला नाहीं ! रहमतखांवर दुसरा डाव टाकण्याचा तिनें निश्चय केला. ती हंसत हंसत रहमतखांला ह्मणाली " सेनापतिसाहेब ! दिल्लीश्वराच्या प्रमुख सेनापतीच्या जागीं आहां ना ? "

" होय, बेगमसाहेब ! आपणाला हें मीं पूर्वींच सांगितलें आहे. "

" आपण किती हजारी अहां ? "

" वीस हजारी बेगमसाहेब ! "

चतुर रहमतखांपुढें आपली डाळ शिजत नाहीं, अशी मेहेरजानची खात्री झाली. पुनः तिनें त्या वृद्ध सेनापतीला प्रश्न केला " आपणाला बादशहाकडून तनखा किती मिळतो, सेनापतीसाहेब ? "

" बाराशें दिनार, बिबिसाहेब ! "

" काय ? आपणासारख्या मुख्य सेनापतीला बाराशें दिनारच तनखा ? मला नाहीं हें खरं वाटत, रहमतखांसाहेब ! "

" या रहमतखांच्या मुखांतून आजपर्यंत एकहि असत्य भाषण निघालेलें नाहीं ! या पक्व केंशांवर देखील आपला भरंवसा बसूं नये, हें माझें दुर्दैव होय असेंच मी समजतों. "

रहमतखांकडे आपल्या तीक्ष्ण नजरेनें पहात मेहेरउन्निसा त्याला गंभीरपणानें ह्मणाली " माझी एक गोष्ट आपण ऐकाल रहमतखांसाहेब ? मीं तुह्मांला दहा हजार असरफी देत्यें;—"

" कांहीं बक्षिसाशिवाय देखील हा बंदा बेगमसाहेबांचे हुकूम पाळायला तयार आहे. प्रभूचा संतोष हेंच सेवकाला मोठें बक्षिस होय. "

" आपण माझ्या मनांतील भाव नीट समजलां नाहीं असं दिसतं. मी आपणाला दहा हजार असरफी देत्यें;—माझे बहुमुल्य हिऱ्यामाणकांचें अन् मोत्यांचे दागिने आहेत तेवढे आपणाला देत्यें—एवढी विशाल संपत्ति मिळाल्यावर बादशहाची नोकरी करण्याचं आपणाला कारण नाहीं. एखाद्या अमीरासारखं आपणाला ऐश्वर्यानं आयुष्य काढतां येईल—माझी सारी दौलत मी आपणाला देत्यें परंतु मला आपण सोडून द्या सेनापति साहेब ! "

त्या सुरसुंदरीची ही करुणावाणीनें केलेली प्रार्थना ऐकून वृद्ध रहमतखांचें हृदय द्रवलें. त्याच्या डोळ्यांला झटकन् पाणी आलें. मेहेरजानकडे पाठ करून त्यानें अश्रुबिंदु हळूच पुसून काढले. रहमतखांचा व्यवसाय जरी युद्धाचा होता,

तरी त्याचें हृदय पुष्पाहूनही कोमल होतें. त्यानें अश्रुबिंदु पुसले, तें धूर्त मेहेरजानच्या लक्ष्यांत आलें कीं नाहीं, कोण जाणे ?

" आपण बोलत कां नाहीं, खांसाहेब ? "

रमणीचा अभिप्राय रहमतखांला केव्हांच कळला होता. मेहेरजानच्या तीक्ष्ण बुद्धीचें त्याला कौतुक वाटलें. तो हात जोडून ह्मणाला " आपला अभिप्राय माझ्या लक्ष्यांत आला. परंतु मी सर्वस्वी पराधीन आहें. शहानशहानां मी कोणत्या तोंडानें भेटूं आणि त्यांना काय सागूं ? "

मेहेरजानच्या करपलेल्या आशावृक्षाला किंचित् पालवी फुटूं लागली. ती उत्सुकतेनें ह्मणाली " आणखीं काय सांगायचं आहे त्याला ? त्याला सांगा, कीं, आज्ञेप्रमाणं मेहेरउन्निसाला आह्मी धरली. साम्राज्ञीपदाला योग्य अशा सन्मानानं आह्मी तिला आगऱ्याकडे आणित असतां तीनं विष खाऊन प्राण त्याग केला आह्मी पुष्कळ यत्न केले. परंतु दुर्दैवानं आमचे प्रयत्न सिद्धीस गेले नाहींत. दामोदराच्या तीरीं तिचे योग्य मानमरातबानें दफन करून आह्मी आगऱ्याला निघून आलों ! "

मेहेर जानची ही युक्ति ऐकून रहमतखां हसला व मेहेरजानला ह्मणाला " मासाहेब ! आपल्या भोळेपणाचं मला हसूंहि येतें आणि आपल्या बुद्धीचें मला कौतुकहि वाटतें. आपण दिल्लीश्वराला ओळखीत नाहीं ह्मणून अशी भोळसर पणाची युक्ति आपण मला सुचविली. या गोष्टीवर बादशहाचा कधींहि विश्वास बसावयाचा नाहीं ! सर्व भरतखंडाच्या साम्राज्याचीं सूत्रें ज्याच्या हातीं वागत आहेत, तो अशा गोष्टींनीं फसेल असं आपणाला वाटतें काय ? आपणाला घेतल्याशिवाय जर मी आगऱ्याला गेलों तर भुकेनें कावलेल्या कुत्र्याकडून शहानशहा मला फाडफाडून खाववितील ! त्याचप्रमाणें आपणाला दुसरीहि एक गोष्ट सांगितली पाहिजे—ती गोष्ट आपण नेहमीं ध्यानांत ठेवावी. दिल्लीश्वराचे सेनापति आपल्या प्रभूशीं निमकहराम होण्यास अद्याप शिकले नाहींत. आपणाला जर मला सोडावयाचेंच असेल, तर वीराप्रमाणें—सेनापती प्रमाणें—मी आपली मुक्तता करीन. आपणाकरितां मी प्राणहि देईन. परंतु प्रभूशीं असा दगलबाज होणार नाहीं. शहानशहांना खरी हकीगत कळविल्याशिवाय मला आपली मुक्तता करतां येणार नाहीं.

मेहेरजान चमकली ! आपला अंदाज चुकला, आपल्या सर्व युक्त्या फसल्या, अशी तिची पक्की खात्री झाली. तिचें हृदय धडधडूं लागलें—निराशेनें तिचा कंठ अगदीं सुकून गेला. आपले सर्व प्रयत्न तर विफल झालेच आहेत, तेव्हां शेवटचा रामबाण उपाय करून पहावा, असा विचार करून मेहेरउन्निसा रहमतखांला ह्मणाली "असेल ! आपण ह्मणतां तसं असण्याचा बराच संभव आहे. शहानशहांच्या तुमच्या सांगण्यावर कदाचित् नाहीं विश्वास बसणार. परंतु माझ्या बोलण्यावर तरी त्याचा विश्वास बसेल कीं नाहीं ! दिल्लीश्वरासमोर उभी राहिल्यावर मी त्यांना सांगेन—जहांपनाह ! आपले सेनापति फारच विश्वासू यांत शंका नाहीं ! आपल्या विश्वासू सेनापतींनीं रस्त्यांत माझी इज्जत नष्ट करण्याचा प्रयत्न केला—मी ह्मणूनच आपली लज्जा रक्षण केली ! सेनापति साहेब ! आपण मग काय कराल ? "

वृद्ध रहमतखाचें मुख सुकून गेलें ! ' अगाध स्त्रीचरित्रा ' च्या या मासल्यानें तो थक्कच होऊन गेला ! परंतु दिल्लीपतीच्या सेनानायकाचें काम करूनच रहमतखांचें केंस पिकले होते. मेहेरजानच्या याहि जाळ्यांत तो धूर्त म्हातारा सांपडला नाहीं. दृढ स्वरानें तो मेहेरजानला म्हणाला " बेगमसाहेब ! या असत्यपूर्ण जगांत सत्यनिष्ठ, नीतिमार्गानें चालणाऱ्या मनुष्यावर असेच प्रसंग येत असतात. आपल्या बोलण्यावर शहानशहांचा विश्वास बसल्याखेरीज रहाणार नाहीं. आपणासारख्या थोर राज्ञीच्या बोलण्यावर या जगांत कोण विश्वास ठेवणार नाहीं ? शहानशहा तत्क्षणीं मला प्राणदंडाचा हुकूम करतील. परंतु मी मरणाची क्षणोक्षणीं अपेक्षाच करीत असतों. आपण जाणून बुजून मिथ्या कथा सांगून माझ्या या पक्क केशांला भयंकर कलंक लाविल्यावर मग या जगांत जगून तरी काय करावयाचें आहे ? आपल्यासारख्या थोर बेगमसाहेबांच्या संतोषासाठीं मरावयास हा रहमतखां नेहमीं एका पायावर तयार आहे. परंतु या अलम दुनियेच्या बादशहाचाही बादशहा आहे. त्याच्या दरबारांत लहान थोर, राव रंक सर्व सारखेच. तो तरी माझा खास न्याय करील ! "

झालें ! मेहेरजानचे सर्व उपाय हरले ! मैत्री, भय, करुणा—कोणताही उपाय त्या वृद्ध धूर्ताजवळ टिकला नाहीं ! वृद्ध रहमतखांजवळ तीक्ष्ण बुद्धीच्या मेहेरउन्निसाचा पूर्ण पराभव झाला ! हाय ! आतां एकहि, उपाय राहिला नाहीं. पुढें काय होणार याची मेहेरजानला कल्पनाही होईना !

बराच वेळ विचार करून मेहेरउन्निसा प्रभुत्व सूचक अशा दृढ स्वरानें म्हणाली "सेनापतिसाहेब ! आपण मला अटक करणार कोण ? आपण दिल्लीपतीचे मुख्य सेनापति असाल; परंतु आपणाला बादशहाचा हुकूम आहे, त्याला प्रमाण काय ? तसच, शहानशहांच्या जनान्यांत हजर होण्याविषयीं त्यांचा मला खलिता कुठं आहे ? एखादा सामान्य खेडवळ सुद्धां लेखी खलित्याशिवाय बादशहाच्या दरबारीं हजर होत नाहीं. मग मी तर बादशहाची अर्धांगी—भारत सम्राटाची साम्राज्ञी होण्यासाठीं जाणार—शहानशहांनीं मला उद्देशून अवश्य खलिता लिहिला असला पाहिजे. रहमतखां साहेब ! आहे का तो खलिता आपणापाशीं ? असल्यास हजर करा. नाहीं तर तुमची अटक मी साफ मानित नाहीं. दिल्लीपतीच्या नांवानं आपण मला फसवायलाच आला आहां असंच मी समजेन !"

बुद्धिमती मेहेरजानचा विजय होणार, असें या वेळीं चिन्ह दिसूं लागलें. तिचें हें उद्दाम भाषण ऐकून रहमतखां इतबुद्ध होऊन गेला. त्याच्या मुखमंडलावर चिंतेच्या रेषा विराजमान झाल्या. खरोखर गोष्ट अशी होती, कीं, जहांगीर बादशहानें मेहेरउन्निसाच्या नांवानें मुळींच खलिता दिलेला नव्हता. तसा खलिता लिहिण्याचें जहांगीरला उघडपणें साहसच झालें नाहीं.

आतां काय करणार ? वेळ तर आणीबाणीची होती. पुढें जी बादशहाची अर्धांगी आणि अखिल भारतभूमीची साम्राज्ञी होणार तिच्या उघडपणें विरुद्ध जाणें रहमतखांला साध्य नव्हतें. बरें मेहरजानला आगऱ्याला घेऊन न जावें तर तिच्या रूपानें अगदीं पागल होऊन गेलेल्या जहांगीरानें त्याला खास प्राणदंडाची शिक्षा दिली असती. मेहेरजानला आगऱ्याला न्यावयाचें काम अति-

शय विकट ह्मणून तर जहांगीरानें रहमतखां सारख्या चतुर व अनुभवी सेनापतीची या कामावर नेमणक केली होती. या मोहिमेवर आपणाला खास यश मिळेल, अशी या वेळपर्यंत त्या वृद्ध सेनापतीला आशा होती—परतु मेहेरजानच्या या युक्तीनें त्याजवर मोठा प्रसंग गुदरला! बादशहाचा खलिता खुद्द रहमतखांच्या नांवानें लिहिला होता. "शेर अफगाणाच्या विधवा स्त्रीला मोठ्या सन्मानानें आगऱ्याला घेऊन यावें" एवढाच मजकूर त्या खलित्यांत होता. खलिता मेहेरजानला कसा दाखवावा याचा रहमतखांला मोठा विचार पडला.

शेवटीं तोच खलिता मेहेरजानला दाखवावा असा रहमतखानें पुष्कळ विचार करून निश्चय केला. आपल्या शिरस्त्राणांतून एक लाल रंगाचा कागद काढून त्यानें तिच्या हातीं दिला त्याच्यावर बादशहाचे पंजाचें शिक्का मोर्तब होतें.

मेहेरजाननें तो कागद आद्योपान्त शान्त चित्तानें वाचला; आणि वाचून झाल्यावर तिरस्कारानें हसून तिनें त्या कागदाचा चोळामोळा करून तो दूर भिरकावून दिला! चंचल वायूच्या तरगानें तो कागद दामोदराच्या तटावरील चिखलांत पडून मलिन होऊन गेला.

रहमतखांकडे एक कोपकटाक्ष फेंकून गंभीर स्वरानें मेहेरजान ह्मणाली "सेनापतिसाहेब! मी एक सामान्य स्त्री झालें ह्मणून इतक्या सहजासहजी फसण्याइतकी मी भोळी आहे, असं का आपणाला वाटतं? तो खलिता तुमच्या नांवाचा आहे—त्याच्याशीं मला कांहीं करायचं नाहीं. तेवढयावरून एवढं मात्र मला समजलं कीं, खुद्द शहानशहानींच तुह्माला या कामगिरीवर पाठविलं आहे. परंतु जोंपर्यंत त्यांच्या हातचा मला उद्देशून लिहिलेला खलिता आपण मला दाखविणार नाहीं, तोंपर्यंत मी येथून एक तसूभरहि हालणार नाहीं! खुद्द दिल्लीश्वराच्या निमंत्रणाशिवाय त्याच्या राजधानींत जाणं मला प्रशस्त दिसत नाहीं. रमतखां! अशा खलित्याशिवाय मी आगऱ्यास कधींहि येणार नाहीं—तुह्माला काय वाटेल तें करा!"

रहमतखां मोठ्या अडचणीत सांपडला. कांहीं तरी पोकळ सबब करून बेगमसाहेब वेळ काढित आहेत, हें रहमतखांच्या लक्ष्यांत आल्याखेरीज राहिलें नाहीं. परंतु त्याचा आतां कांहींच इलाज चालण्यासारखा नव्हता. बेगमसाहेबांच्या या युक्तीवर त्याला कांहींच तोड सुचेना! त्या तीक्ष्ण बुद्धिशालिनी रमणीनें आपल्या या युक्तीनें यावेळीं रहमतखांचा पूर्ण पराजय केला.

रहमतखां खिन्नस्वरानें मेहेरजानला ह्मणाला "ठीक आहे. जशी बेगमसाहेबांची आज्ञा होईल त्याप्रमाणें व्यवस्था करावयास हा बंदा तयार आहे. आपल्या नांवानें खलिता नसल्यामुळें येथें मजवर काय संकट आलें आहे. त्याविषयीं सविस्तर हकीगतींचें पत्र देऊन आतां रात्रींच्या रात्रीं आगऱ्याला शहानशहांकडे सांडणीस्वार पाठवितों. त्यांच्याकडून हुकूम येईल त्याचप्रमाणें पुढें मी व्यवस्था करीन. आपण आतां आपल्या वाड्याकडे चलावें—"

"ठीक आहे—सेनापति साहेब!"

"या अधमाधम दासाच्या कसुरीची बेगम साहेबांनीं क्षमा करावी. आपल्या अंतःपुरांत गेल्यावर जें कांहीं आपल्या दृष्टीस पडेल त्यानें बेगमसाहेबांनीं आश्चर्य चकित

होऊन जाऊं नये. आपल्या महालाभोंवतीं यावेळीं स्त्रीसैनिकांचा पहारा चालू आहे "

मेहेरउन्निसा यावर कांहीं न बोलतां मरजीनासह आपल्या निवासस्थानाकडे परतली. दिल्लीश्वराचा वृद्ध सेनापति अतिशय चतुर आहे असें तिच्या चांगलें अनुभवास आलें.

अन्तःपुरांत पोंचल्यावर आपल्या दासीला उद्देशून खिन्नपणानें हसून मेहेरजान ह्मणाली " मरजीना! अखेरीस तुझंच भविष्य खरं झाल!"

---

## प्रकरण तिसरें.

### सेनापति रुस्तम.

आपल्या अतःपुरांत प्रवेश केल्यावर मेह्रजानच्या नजरेस तेथें जो देखावा पडला, त्यानें तर ती हतबुद्धच होऊन गेली! असा विलक्षण देखावा आपल्या अंतःपुरांत आपल्या दृष्टीस पडेल अशी त्या बिचारीची कल्पना देखील नव्हती! आपल्या वर्णानें धुतलेल्या व निखाऱ्यासीहि लाजविणाऱ्या, लालबुद ओंठाच्या, आंखूड कस असलेल्या तार्तार जातीच्या पहारेकरणीचा आपल्या महालाभोंवती कसून पहारा चालला आहे, असें मेहेरउन्नीसाच्या दृष्टीस पडल. त्या तार्तारणीच्या हातांतील पेटलेल्या मशालींचा उजेड त्यांच्या त्या विद्रूप चेहऱ्यांवर पडून त्यांचीं भयंकर तोडें अधिकच भयंकर दिसत होतीं! त्यांच्या हातांतील नागव्या तरवारी मशालींच्या प्रकाशांत लखलखत होत्या. त्या तार्तार ' सुंदरी ' जरी जातीनें स्त्रिया होत्या, तरी कठोरतादि गुणांत त्या पुरुषांनांहि हार जाण्यासारख्या नव्हत्या! अशा राक्षसिणींना आपल्या महालाभोंवतीं पहारा करतांना पाहून सुंदरी मेहेरजान भयानें आणि विस्मयानें थक्क होऊन गेली, यांत नवल काय?

अंतःपुरांत आल्यावर मेह्रजाननें मरजीनाला निजावयास जाण्याचा हुकूम केला व ती आपणही शय्येवर पडली. तिच्या संक्षुब्ध हृदयांत नानातऱ्हेच्या विचार विकारांची तरंगमाला कल्लोळ करूं लागली. दिल्लीश्वराच्या पाशांतून सुटून जाण्यासाठीं आपण कसकसे बेत केले, मरजीनाशीं कडाक्याचा वादविवाद करून दामोदराच्या पार होण्यासाठीं आपण मरजीनाकडून ठरवून ठेविलेल्या नौकेवर जावयास काळ्याकभिन्न अंधःकारांतून वाऱ्याच्या सोसाट्यांतून कसे सिद्ध झालों; परं दुर्दैवान आयत्यावेळीं आपला कसा घात केला, इत्यादि विचारांची तिच्या मस्तकांत सारखीं आवर्तनें होत होतीं. राहून राहून तिला दिल्लीश्वराच्या वृद्ध सेनापतीच्या चातुर्याचें व प्रसंगावधानाचें फार आश्चर्य वाटे! केवळ रहमतखांच्या प्रसंगावधानानेंच आपण दिल्लीश्वराच्या अटकेंत सांपडलों, अशी तिची खात्री झाली. बादशहानें आपल मन वश करून घेण्याच्या अगोदर त्याच्या चतुर सेनापतीनें आपलें शरीर गिरफदार केलें, याचा मेहेरजानला पुनः पुनः खेद वाटे! रहमतखांला आपण नाना तऱ्हेनें राग, लोभ, भीति, दाखवून आपली मुक्तता करण्याविषयीं विनवून पाहिलें—परंतु त्या धूर्त ह्मातार्‍यापुढें शेवटीं, आपणाला हात टेंकावे लागले! आपल्या विलक्षण बुद्धिमत्तेबद्दल आपण बाळगलेली

घमेंड रहिमतखांपुढें व्यर्थ ठरली याचेंहि मेहेरजानला फार दुःख होई !

त्यावेळीं तीन प्रहर रात्र होऊन गेली होती. आकाशांतील तारका समूह बराच म्लान होऊन गेला होता. रात्रीच्या प्रथमार्धांत सृष्टि कांहींशी खवळून गेली होती खरी, परंतु आतां ती बरीच शांत झाल्यासारखी दिसत होती. कांहीं प्रहरापूर्वी सोसाटयानें वहाणारा वायु आपलें उग्ररूप टाकून यावेळीं मंद मंद वाहू लागला होता. पहाटेच्या या शीतल वायूनें शांत होऊन संक्षुब्ध दामोदरानेंहि रात्रीचें आपलें विक्राळ स्वरूप टाकून बरीच मृदुलता धारण केली होती. आसपासच्या वनोपवनांतील रजनीगंध, नागकेशर, चमेली, पारिजातक, इत्यादि नानाविध जातींच्या वृक्ष-वल्लरींचीं पुष्पें अर्धस्फुटावस्थेंत असतांना देखील प्रभातकालाच्या शीतल मृदु वायूला आपल्या स्वर्गीय सुगंधाचा खजिना उदार अन्तःकरणानें समर्पण करीत होती. पक्षी हळूहळू जागे होऊं लागले होते. आपल्या मधुर स्वरानें त्यांनीं जगन्नियंत्याची स्तुति करावयास आरंभ केला होता. तरीही मेहेरउन्निसाला झोंप लागली नाहीं. या कुशीवरून त्या कुशीवर याप्रमाणें तिची सारखी तळमळ सुरू होती! मधून मधून तिला निजेचा चुटका लागे-परंतु त्यांतहि तिला रात्रीं घडलेल्या प्रकारासंबंधानें चमत्कारिक स्वप्नें पडत-त्यामुळें धसक्यानें ती मध्येंच जागी होई !

शेवटीं, एकदांची ती दीर्घ रात्र संपून उजाडलें. मेहरजान कंटाळून आपल्या शय्येवरून उठली. रात्रीं घडलेल्या एकंदर प्रकारानें आणि निद्रेच्या अभावामुळें तिचें सुंदर मुखकमल निस्तेज होऊन गेलें होतें. सर्व प्रातःकृत्यें आटोपून पहिल्यानें तिनें मरजीनाला हांक मारली. धनिणीनें हांक मारल्याबरोबर ती लगबगीनें येऊन तिच्यासमोर उभा राहिली.

बिचाऱ्या मरजीनालाहि चांगलीशी झोंप लागली नव्हती. पूर्व रात्रीं घडून आलेला सर्व प्रकार तिला दुःस्वप्नाप्रमाणेंच वाटत होता. मेहरउन्निसाच्या अंतःपुरामोंवतीं लखलखणाऱ्या शस्त्रांनिशीं पहारा करणाऱ्या तातारणींचीं तीं भयंकर काळीं कभीन्न शरीरें आणि विद्रूप चेहेरे बघून मरजीनाच्या हृदयाचा थरकांपच उडाला होता. आपल्या यजमानिणीची व आपली पुढें काय स्थिति होणार, याविषयीं चतुर मरजीनाची कांहींच कल्पना होईना ! पूर्ण रात्रीं आपल्या धनिणीला वर्धमान सोडून न जाण्याबद्दल आपण जी सल्ला देत होतों ती अगदीं चुकीची होती, हें आतां मरजीनाच्या चांगलें ध्यानांत आलें. अन्तःपुरांतल्या अन्तःपुरांत बंदिवान् होऊन रहाण्यापेक्षा मेहेरउन्निसा वर्धमान सोडून अगोदरच कोठें निघून गेली असती तर फार बरें झालें असतें, असें तिला आतां वाटू लागलें.

मरजीना येतांच मेहेरजाननें तिला मृदु स्वरानें हाक मारली " मरजीना ! "

मेहरजानच्या या मृदु शब्दानें मरजीनाचा खिन्नपणा कांहींसा कमी झाला. ती हात जोडून ह्मणाली " काय आज्ञा आहे बिबिसाहेब ! आपणाला काल रात्रीं झोंप तर चांगली लागली ना ? आपली तब्बेत तर ठीक आहे ना ? "

" झोंप न लागायला मला काय धाड भरली आहे !-पण तें झोंपेचं अन् माझ्या तब्बेतीचं प्रकरण तूर्त बाजूला राहूं दे ! तुला एक माझं काम केलं पाहिजे मरजीना ! "

" काय तें बिबिसाहेब ?—दासीला आज्ञा व्हावी. "

" बरोबर पालखी घेऊन तूं आज काटवाला जा. "

"मोतिबिबिसाहेबांकडे वाटतं? होय ना ?"

" होय तिच्याकडेच "

" पण मोतिबिबिसाहेब अशा या कडक पहाऱ्यांतून इथपर्यंत येणार कशा ह्मणतें मी ? "

" तुला काय त्याची पंचाईत ! ती सारी व्यवस्था मजकडे लागली. काय वाटेल तें करून तूं मोतिला इकडे आण-त्यावांचून मात्र राहूं नकोस "

" ठीक आहे बिबिसाहेब ! त्यांना आणायची माझ्याकडून मी शिकस्त करीन . "

" ह्या घे दहा असरफी ! तुझ्या वाटेच्या खर्चाला, अन् या वीस घे तुला बक्षीस ह्मणून "

मेहेरजानच्या हाताचें चुंबन घेऊन तिच्या आज्ञेप्रमाणें मरजीना तेथून निघून गेली.

मोतिराणी ही राजा गजपतिसिंहाची पत्नी. राजा गजपतिसिंह हा काटवाचा ठाकूर होता. अकबर बादशहाच्या उच्चतम राजनीतीनें जीं अनेक रजपूत घराणीं मोंगल साम्राज्याचा आधारस्तंभ बनलीं होतीं, त्या पैकीं काटवाच्या ठाकुरांचें घराणें प्रमुख होतें. त्यांतूनही राजा गजपतिसिंहाला मोंगल साम्राज्याचा अत्यंत अभिमान आणि दिल्लीश्वराचाही त्याजवर तसाच विलक्षण विश्वास होता. मोतिराणी ही मेहेरजानची अगदीं जीवश्चकंठश्च प्रिय सखी. दोघींचीं शरीरें दोन पण आत्मा एक अशी त्या दोघींत मैत्री होती. लहानपणीं त्यांचा स्नेह जडल्यापासून तो सारखा वृद्धिंगत होत होता. एकमेकींच्या सहवासांत त्यांना अनुपमसुख वाटत असे, पुढें दोघी मोठ्या झाल्यावर जेव्हां त्यांच्यांत सहजच अंतर पडलें, तेव्हांही त्यांचें प्रेम तिळमात्र कमी झालें नाहीं. एकमेकींचा समाचार एकमेकींना कळविल्याशिवाय त्यांचा एक पंधरवडा देखील सुना गेला नसेल ! एकमेकींकडे त्यांचें जाणेंयेणेंही वारंवार होई. संकटप्रसंगीं तर एक दुसरीच्या घरीं वायुवेगानें जावयाची ! मेहेरउन्निसावर आलेलें हें संकट मोतिबिबिला कळणें अत्यावश्यक होतें.

मरजीना गेल्यावर मेहेर आपल्या महालांत विमनस्कपणानें इकडे तिकडे येरझारा करूं लागली. निरनिराळ्या विचारांनीं तिच्या मस्तकांत काहूर करून सोडलें होतें. कांहीं वेळानें तिच्या मनाचा कांहीं निश्चय होऊन मेहेरजाननें महालाचा दरवाजा आंतून खडखडावला.

तत्क्षणीं एक कृष्णवर्ण तातारिणीनें आंत येऊन अत्यंत नम्रतेनें मेहेरला कुर्निसात केला, व हात जोडून आपल्या घोगऱ्या अवाजानें विचारिलें, " बेगम साहेबांचा काय हुकूम आहे ? "

त्या पहारेकरणीची ती कराल मूर्ति व तिचे ते अडाणी हावभाव पाहून आणि तिचा तो विलक्षण स्वर ऐकून त्या मनःस्थितींतहि मेहेरजानला हंसू कोसळल्यावांचून राहिलें नाहीं. आपल्या या दुःखांत आपलें कांहीं तरी समाधान व्हावें ह्मणून दैवानें ही विलक्षण मूर्ति पाठवून दिली आहे, असें मेहेरजानला वाटलें असावें, असें तिच्या किंचित् स्मितयुक्त चेहऱ्यावरून दिसत होतें.

किंचित प्रभुत्वसूचक अशा स्वरानें मेहरजान त्या तातारिणीला उद्देशून ह्मणाली, " तुला ठाऊक आहे का लंवडी:— "

" काय बेगमसाहेब ? "

" तुला एक दिवस दिल्लींत माझ्याच खिदमतींत रहावं लागेल ह्मणून ? मी कोण आहे तें तुला कदाचित ठाऊक नसेल. "

" मला सगळ समजलं आहे बेगमसाहेब ! आपल्या सेवेसाठींच तर आमचा जन्म आणि आमची नेमणूक आहे. "

मेहेरजान पुनः किंचित हंसली व ह्मणाली " तुला हें कळलं आहे, हें एका अर्थीं बरंच झालं ह्मणावयाचं ! बर तर, सरदार साहेब रहमतखां सेनापतींना मी इकडे तावडतोब बोलावतें आहें, ह्मणून सांग जा पाहूं. "

तार्तारीण नम्रभावानें ह्मणाली, " जनाब ! सेनापतिसाहेब यावेळीं इथं नाहींत. काल रात्रींच वर्धमान सोडून ते दुसरीकडे कुठं कसल्याशा महत्वाच्या कामाला गेले आहेत. त्यांच्या हाताखालीं रुस्तमखां ह्मणून दुय्यम सेनापति आहेत, तेच आज मुख्य सेनापतींचें काम पहात आहेत. आणखी दोन तीन दिवस रहमतखां साहेबांनीं वर्धमानला परत येतां येणार नाहीं ह्मणे ! "

सेनापति रहमतखां वर्धमानांत नाहीं हें ऐकून मेहर उन्निसा पुनः विचारांत पडली, आपणाला दैव अनुकूल नाहीं हेंच खरें, अशी तिची खात्री झाली. कांहीं वेळानें ती त्या तार्तार पहारेकरणीला ह्मणाली—"रहमतखां आजच वर्धमान सोडून बाहेर गेले हें बरं नाहीं झालं—त्यांची मला या प्रसंगीं फार जरूरी होती, बरं तर, रुस्तमखांला इकडे पाठवून दे लवकर. "

" जो हूकूम, बेगम साहेब " असें ह्मणून पुनः कुर्निसात करून तार्तारीण निघून गेली.

बेगम साहेबांच्या आज्ञेची वर्दी मिळतांच सेनापति रुस्तम मेहरजानच्या महालांत आला, व येतांक्षणाच त्यानें तिला नम्रतेनें प्रणाम केला. मेहेरकडे त्याची दृष्टि खिळून गेली !

रुस्तमखानें यौवनाच्या समिप्रांतांत नुकताच प्रवेश केला होता. त्याच्या ओंठावर यौवनाचें चिन्ह नुकतेंच प्रगट होऊं लागलें होतें. रुस्तम रूपानें फारच देखणा पुरुष होता. त्याचा तो उंच धिप्पाड बांधा, पिंवळट गौर वर्ण, व उज्वल नयनयुगम लाल ओंठ व सुंदर मुखश्री पाहून निसर्गसुंदरीची त्याजवर फारच बहाल मर्जी असावी, असें कोणालाहि वाटण्यासारखें होतें.

या वेळपर्यंत मेहेरजानची अशी कल्पना होती, कीं सेनापति रुस्तम देखील रहमतखांप्रमाणेंच एखादा पक्वकेश वृद्ध सैनिक असेल, परंतु रुस्तमची ती उद्दाम यौवनवृत्तींनीं परिपूर्ण भव्य मूर्ति पाहून मेहेरची ती कल्पना क्षणार्धांत नाहींशी झाली. रुस्तमला पाहिल्या क्षणापासून, काय असेल तें असो मेहरउन्निसाचा त्याच्याविषयीं फारसा चांगला ग्रह झाला नाहीं हें खास ! खरें ह्मटलें तर रुस्तमच्या गाडस चेहऱ्यांत तिरस्कार वाटण्यासारखें कांहींच नव्हतें; उलट तो फारच उमदा होता. कांहीं असो, त्याला पाहिल्यापासून मेहरला त्याच्याविषयीं एका प्रकारचा तिरस्कार वाटूं लागला हें खरें ! रुस्तमसारख्या तरुण सुंदर पुरुषाशीं एकांतांत भाषण करण्याचा ह्या प्रसंग तिला फारच अवघड वाटूं लागला; परंतु यांत बिचाऱ्या रुस्तमकडे तरी काय दोष ! मेहेरनें आपण होऊन त्याला आपल्या महालांत बोलावून आणिलें होतें. आत कांहीं इलाज

नव्हता. आला प्रसंग कसा तरी पार पाडला पाहिजे असा विचार करून, आपलें सुंदर मुखमंडल आपल्या झिरझिरित निळ्या ओढणीनें अर्धवट झांकून मेहरनें त्याला हळूच हांक मारली. " रुस्तम अली—"

अहाहा! काय गोड स्वर! जणू काय स्वर्गातील एखाद्या परीनें आपल्या वीणेच्या अत्यंत सुस्वर तारा आपल्या मृदु अंगुलींनीं छेडल्यामुळें संगीतध्वनि उत्पन्न होत आहे! तो मधुर संगीतध्वनि जणु काय रुस्तमच्या कर्णरंध्रद्वारानें त्याच्या अंतरंगाच्याही अंतरंगांत शिरून, त्याच्या पंचप्राणाला पूर्णपणें व्यापून टाकून, तेथें एकसारखा घुमत होता! सुंदरीच्या मंजु कंठध्वनीनें बिचारा रुस्तम जडमूढच होऊन गेला! आणि एवढ्यानें कोठें संपत होतें? त्याच्या दुर्दैवानें दुसऱ्याहि कांहीं शस्त्रास्त्रांचा त्या बिचाऱ्यावर सारखा भडिमार सुरू होता! त्या सुंदर अवगुंठनवस्त्राच्या आंतून दोन भयंकर धनुष्यांतून रुस्तमवर सारखा निकराचा शरवर्षाव होऊं लागला! दिल्लीश्वराच्या वतीनें त्याच्या अनेक प्रबल शत्रूंशीं झुंजत असतां रुस्तमवर आजपर्यंत किती तरी वेळ बाणाचा वर्षाव झाला असेल—तो वीर त्या शरवर्षावानें आजपर्यंत एकदा सुद्धां गडबडला नाहीं! परंतु या बाणांच्या प्रहारांनीं त्याचें हृदय—कोण जाणे कां तें—अत्यंत व्याकुळ होऊं लागलें! त्या झिरझिरीत अवगुंठन वस्त्रामधून अस्पष्टपणें दृग्गोचर होणारा मुखचंद्र पाहून वीर रुस्तमखांचें मस्तक कांहीं निराळ्याच वातावरणांत भ्रमण करूं लागलें! पूर्व रात्रीं दामोदराच्या वालुकायम तीरावर मशालींच्या चंचल प्रकाशांत स्पष्टपणें दृष्टीस पडलेलें त्या रमणीचें अतुलनीय सौंदर्य यावेळीं दिवसाच्या ढळढळीत प्रकाशांत जणूं काय पूर्णपणें स्वर्गीय तेजानें तळपत होतें! अहाहा! काय हें परमेश्वराचें अगाध निर्माण चातुर्य! या पृथ्वीवरील रमणी खरोखरच का इतक्या सुंदर असूं शकतात? सेनापति रुस्तमखांच्या हृदयांत अनेक विचार तरंग येऊं लागले. त्या विचारमालिकेंत तल्लीन होऊन मेहेरजानच्या हांकेला प्रत्युत्तर द्यावयाचेंही त्या बिचाऱ्याला बिलकूल भान राहिलें नाहीं!

पुन: मेहेरजाननें कोमल कंठानें हांक मारिली—" रुस्तम अली! "

रुस्तम विचार मालिकेंतून खडबडून जागा झाला! त्यानें कंपित स्वरानें विचारलें " बेगमसाहेबांचा काय हुकूम आहे? "

" काल रात्रीं दामोदराच्या तीरावर सेनापति रहमतखांबरोबर तुह्मीच का होतां? "

" होय बेगमसाहेब! "

" रहमतखां सेनापतिसाहेब कुठं आहेत? "

" काल रात्रीं आपणाला येथें आणल्यावर कांहीं अत्यंत जरूरीच्या कामासाठीं ते कोठें निघून गेले आहेत. "

" कुठं गेले आहेत? "

" तें मला ठाऊक नाहीं बेगमसाहेब! सेनापति साहेबांचे बेत आह्मांला कधींहि कळत नाहींत. "

" मग त्यांच्या जागीं आपणच आहां वाटतं? "

"होय; परत येईपर्यंत खांसाहेबांनीं मला येथील बंदोबस्त नीट ठेवण्याचा हुकूम दिला आहे."

रुस्तमच्या या भाषणानें मेहेरजानला तिच्या स्थितीचें स्मरण ताजें झालें. शेर अफगाणसारख्या बलाढ्य व वैभवशाली सरदाराची आपण धर्मपत्नी! परंतु एका

सामान्य सैनिकांची, बंदिवान या नात्यानें आपणाला त्याची विनवणी करण्याचा प्रसग यावा, यापेक्षां मरण बरें असें तिला होऊन गेलें !

रुस्तमकडे भेदक दृष्टीनें पहात क्रोधकंपित स्वरानें मेहेर ह्मणाली "होय, तुमची मी बंदिवान आहें, हें मला चांगलें कळतें आहे ! माझें वैभव विसरून तूर्त तुमच्या बंदोबस्तांत मला राहिलें पाहिजे हेंहि मला ठाऊक आहे. तुमच्याच कपटानें मला ही स्थिति आली आहे समजलां !"

बिचारा रुस्तम जडमूढच होऊन गेला ! तो नम्रपणें हात जोडून मेहेरजानला ह्मणतो "बेगमसाहेबांनीं या बंद्याला क्षमा करावी. आह्मी शहानशहाच्या हुकुमानें आपणाला साम्राज्ञीपदावर आरूढ करण्याकरतां येथें आलों आहों. याचें बेगमसाहेबांना विस्मरण झालें असावें असें वाटतें. या दासाची यांत कांहीं कसूर नाहीं सरकार !"

"ठीक आहे, मी तुमची राज्ञी होणार आहे हें नीट ध्यानांत ठेवा. तुमच्या या कडक बंदोबस्तामुळें आह्माला फार त्रास होतो आहे. माझ्या आप्तेष्टांना माझी गांठ घेणं दिखील तुमच्या पहाऱ्यामुळं कठिण झालं आहे. बड्या घराण्यांतल्या गोषांत असणाऱ्या माझ्या मैत्रिणींनीं माझी भेट तरी कशी घ्यावी ? वर्धमान सोडून मी आतां कायमची दिल्लीला जाणार आहें. तिकडे जायच्या पूर्वीं माझ्या साऱ्या आप्तांना अन् मैत्रीणींना भेटलं तर पाहिजे ? आलं का तुमच्या लक्ष्यांत हें, रुस्तम अली ?"

पण रुस्तमच्या हें लक्ष्यांत यावयाला त्याचें लक्ष्य जागेवर होतें कोठें ? तें सुंदरी मेहेरउन्निसाच्या मनोहर स्वर्गीय लावण्यपानांत अगदीं दंग होऊन गेलें होतें ! त्याच्या हृदयाच्या अत्यंत गुप्त अशा स्थानीं त्याच्या प्राणांत, त्याच्या नेत्रयुग्मांत, मस्तकांत, जिकडे तिकडे मेहेरचें मोहक स्वरूप खिळून राहिलें होतें ! तिच्या सौंदर्यमदिरेचें पान करून रुस्तम बेहोष होऊन गेला होता—त्याचें मस्तक भडकून गेलें होतें ! त्याला जिकडे तिकडे, समस्त विश्वाच्या प्रतिकेंद्रांत, हृदयाच्या निभृतकंदरांत मेहेरचें निरुपम लावण्य शतगुणित होऊन भरून गेलेलें दिसत होतें. स्वर तरी किती गोड ! आपणाला तिनें हांक किती मिठास स्वरांत मारली—"रुस्तमअली !" मेहेरजानच्या या हांकेनें रुस्तम जडमूढ झाला—त्याचा आत्मा स्वर्गसुखांत पोहूं लागला ! त्याला इहजगताचें भानच नाहींसें झालें—केवळ त्याच्या कर्णरंध्रांत "रुस्तम अली, रुस्तम अली !" एवढीच मेहेरची हांक सारखी घुमत होती !"

आपल्या प्रश्नाला रुस्तमकडून कांहींच उत्तर येत नाहीं, असें पाहून मेहेरनें पुनः त्याला हांक मारली "रुस्तम अली !"

"काय बेगमसाहेब !"

"इतका वेळ मी तुह्माला काय बोलले, तिकडे लक्ष्यच नव्हतं वाटतं ? तुमचा हा कडक पहारा मला फार त्रासदायक होतो आहे."

मेहेरजानच्या अर्धप्रकाशित मुखकमलाकडे नजर लावून रुस्तम जड स्वरानें अडखळत ह्मणाला, "तर मग बेगमसाहेबांनीं काय तो हुकूम द्यावा."

"माझ्या महालाकडे येणाऱ्या पालख्या पहारेकरणींनीं न तपासतां तशाच मजकडे येऊं द्याव्या, अशी व्यवस्था तुह्मी माझ्यासाठीं करा."

"अशक्य !–अगदीं अशक्य !"

मेहेर आश्चर्यानें थक्कच होऊन गेली !

## प्रकरण चवथें.

—:*:—

### रुस्तम बंदिवान् !

आपल्या विनंतीला रुस्तमकडून नकार मिळेल असें मेहेरजानला मुळींच वाटलें नव्हतें. स्वामिभक्त रहमतखांप्रमाणें रुस्तमहि आपल्या बेताला अडथळा घालील अशी तिची कल्पनाच नव्हती ! रुस्तमखां किती झालें तरी अगदीं तरुण होता. रहमतखां इतका जगाचा विशाल अनुभव त्याला असणेंच शक्य नव्हतें. धूर्त रहमतखां जसा आपल्या प्रत्येक डावांतून पार पडला, तसा रुस्तम पडणार नाहीं अशी मेहेरजानची पक्की खात्री होती. आपल्या अवगुंठित मुखाकडे त्याची सारखी दृष्टी लागून राहिली आहे, आपला मुखचंद्र दृष्टीस पडण्याकरितां तो चकोराप्रमाणें अत्यंत उत्सुक होऊन राहिला आहे, हें त्या चतुर रमणीच्या ताबडतोब लक्ष्यांत आल्यावांचून राहिलें नाहीं ! व या गोष्टीचा पूर्ण फायदा घेण्याचा तिनें निश्चय केला.

कांहीं वेळानें मृदु स्वरानें मेहेरजाननें रुस्तमला विचारलें, "काय ह्मणतां सेनापति साहेब ? मजकडे येणाऱ्या पडदानशीन मानकरणींच्या पालख्या तपासल्याशिवाय आंत येऊं देण्याची तुह्मी व्यवस्था नाहीं करीत ?"

रुस्तमची दृष्टि मेहेरच्या मुखमंडलावरून एक क्षणभरहि इकडे तिकडे हालत नव्हती. तो कंपित कंठानें पुनः ह्मणाला, "तशी व्यवस्था होणें बिलकुल अशक्य आहे."

हें ऐकतांच मेहेरउन्निसानें आपल्या चेहऱ्यावरील बुरखा एकदम दूर केला ! तत्क्षणीं रुस्तम चमकून दोन पावलें मागें सरला. कृष्णमेघांच्या पटलांतून पौर्णिमेचा पूर्णचंद्र एकदम प्रगट होताच ज्या प्रमाणें जगत्सृष्टीवर अपूर्व तेज विलसूं लागतें, त्या प्रमाणें मेहेरजानचा मुखचंद्र अवगुंठनवस्त्रांतून एकाएकीं बाहेर पडतांच तिचें अंतःपुर जणुं काय स्वर्गीय तेजानें प्रकाशमान झालें ! मात्र पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें मेहेरउन्निसाचा मुखचंद्र यावेळीं शांत व सुप्रसन्न दिसत नव्हता ! त्याच्यावर क्रोधाची किंचित् रक्तछाया पसरली होती. स्त्रीसुलभ लज्जा व विनय यांचा यावेळीं मेहेरनें मुद्दामच आपल्या कार्यसाधनार्थ त्याग केला होता.

रुस्तमकडे कठोर दृष्टिपात करीत मेहेर क्रोधानें त्याला ह्मणाली, "काय ? अशक्य ? खुद्द दिल्लीपतीचा तुह्मांला असा हुकूम आहे वाटतें ? माझ्या अंतःपुरावर कडक पहारा ठेवून मजकडे येणाऱ्या माझ्या आतेष्टांना अन् माझ्या मैत्रिणीला तुह्मी अडथळा करावा, अशी का दिल्लीच्या बादशहाची तुह्माला आज्ञा आहे. ?"

रुस्तम अडखळत ह्मणाला, "नाहीं बेगमसाहेब ! शहानशहांनीं असा हुकूम आह्माला दिलेला नाहीं. थोड्याच अवधींत दिल्लीच्या उच्च राजपदावर विराजमान होणाऱ्या साम्राज्ञीला लवमात्रहि त्रास पोंचूं नये, अशीच त्यांची इच्छा असणार."

"तर मग तुमचाच का हा हुकूम"

"होय बेगमसाहेब !"

"असा हुकूम तह्मी कां करतां ?"

" दासाच्या कसुरीची माफी असावी, बेगमसाहेब ! आह्माला आमचें कर्तव्य चोख-रीतीनें बजावलेंच पाहिजे. सेनापति रहमतखां येथून जातांना आपल्या अंतःपुरावर कडक पहारा करण्याविषयीं मला बजावून गेले आहेत, आणि त्यांचा हुकूम ह्मणजे प्रत्यक्ष दिल्लीश्वराचाच हूकूम आह्माला वाटतो ! "

स्तम एवढें कसें तरी अडखळत अड-खळत बोलला. पुढें त्याला कांहीं बोलतांच येईना. मेहेरजानच्या अतुल रूपराशिकडे तो अचल दृष्टीनें सारखा पहात उभा राहिला होता. त्याच्या हृदयांत कांहीं विल-क्षणच विकार कल्लोल करूं लागले. त्याच्या शरीराच्या प्रतिशिरेंत जणु काय विद्युत्तरंगाचे झटके बसूं लागले. एका मेहेरउन्निसाच्या स्वर्गीय सौंदर्यानें रुस्तम अगदींच पागल बनून गेला ! या प्रचंड विश्वाच्या अणुरे-णूंत त्याला त्या मनोमोहिनीचें दिव्य मुख-मंडलच दिसूं लागलें. एका अर्धघटकेंत आपली अशी अवर्णनीय स्थिति कां व्हावी हें त्याचें त्यालाच समजेना !

रुस्तमची ही वेड्यासारखी स्थिति मेहे-रच्या चटकन ध्यानांत आली. त्याच्या हृद-यांत चाललेल्या विकारांची खळबळ जणु काय त्या सुंदरीला स्पष्टपणें ऐकूं येत होती ! आपल्या रूपाच्या अभिप्रायाला वश होऊन हा मासा आपल्या जाळ्यांत पुर्णपणें अडक-णार अशी तत्क्षणीं मेहेर उन्निसाची खात्री होऊन चुकली.

तिनें आपल्या विषारी नयनधनूंतून एक तीव्र कटाक्षबाण रुस्तमवर सोडला व विन-यानें ओढणी ओढून आपला मुखचंद्र पुनः अर्धवट झांकून घेतला. हें पाहून रुस्तम अधिकच वेडा बनला ! वक्र दृष्टीनें रुस्तम-कडे पहात अत्यंत कोमल स्वरानें मेहेरजान ह्मणाली, " रुस्तमअली ! माझी एक विनंति तुह्माला मान्य केलीच पाहिजे ! "

" धन्यानें सेवकाला विनंति करावयाची नसते–बेगम साहेबांनीं बंद्याला वाटेल तो हुकूम करावा; तो शिरसा मान्य करायला सेवक तयार आहे. "

" सेनापतीसाहेब ! काटवाहून माझी प्रियसखी मोतीराणी वर्धमानला मला भेटा-यला येणार आहे. "

" ठीक आहे; खुशाल येऊंद्या. बेगम-साहेबांना आपल्या मैत्रिणींना भेटावयाला कोणाचीहि अटक नाहीं. "

" तिची पालखी न तपासतां तिला पहाऱ्यांतून आंत येऊं देण्याची तजवीज तुह्मांला केली पाहिजे. "

रुस्तम पुनः संकटांत पडला. स्वामि-भक्ति व रूपलालसा या दोघांत तुंबळ युद्ध सुरू झालें. मेहरजानला स्पष्टपणें पुनः नकारात्मक जबाब देणें त्याच्या अगदीं जिवावर आलें. इकडे रहमतखांचा हुकूम अमान्य करण्याचें धाडसहि त्याच्या अंगीं नव्हतें. ! बराच वेळपर्यंत तो विचारांत निमग्न होऊन गेला होता. मेहेरला काय उत्तर द्यावें, याचा त्याला कांहींच ठाम नि-श्चय करतां येईना.

आपल्या विनंतीला रुस्तमकडून कांहींच जबाब येत नाहीं, असें पाहून मेहेरउन्निसानें त्याला पुनः विचारलें " रुस्तमअली साहेब ! मग आपला विचार काय ठरला ? माझ्या मैत्रिणीची शिबिका तपासल्या शि-वाय आपण पहाऱ्यांतून आंत येऊं देणार कीं नाहीं ? "

रुस्तम अडखळत अडखळत ह्मणाला' " मला क्षमा करा बिबिसाहेब! या संबंधानें मी आतांच कांहीं निश्चित सांगूं शकत नाहीं. अन आतांच या गोष्टींचा जबाब आपणाला दिला पाहिजे असें मला वाटत नाहीं. राणीसाहेब काटवाहून उद्यां येथें येऊन पोंचतील. आज सायंकाळपर्यंत नीट विचार करून आपणास कायतें मी उत्तर देईन. प्रश्न फार बिकट आहे—यामुळें मजवर मोठी जबाबदारी येणार आहे, तेव्हां आतांच उत्तर न मिळाल्यामुळें बिबिसाहेबांनीं मजवर रागाऊं नये अशी विनंति आहे. कदाचित तोंपर्यंत सेनापती साहेबही येऊन पोंचण्याचा संभव आहे. "

" कांहीं हरकत नाहीं. रुस्तमअली! आपण जा आतां—मात्र सायंकाळ पर्यंत मला काय तें जरूर कळवा. " रुस्तमकडे स्निग्ध दृष्टीनें पहात ती रमणी हंसत हंसत ह्मणाली.

रुस्तम मेहेरजानला नम्रपणें प्रणाम करून हळुहळु तेथून निघून गेला. त्या सुरसुंदरीच्या मधुर सहवासांत आणखीही काल काढण्याचें त्याच्या मनांत होतें—परंतु अतिप्रसंग करणें बरें नव्हे, पहिल्याच भेटीला आपल्या वर्तनानें मेहेरजानचें मन आपणाविषयीं कलुषित होऊं देतां उपयोगी नाहीं, असा विचार करून मेहेरनें निरोप देतांच तो नाइलाजानें तेथून निघून गेला.

परंतु सेनापती रुस्तम मेहेरजानच्या महालांत आला, त्यापेक्षां अगदीं भिन्न मनःस्थितींत तो तेथून निघून गेला. त्याचें हृदय सर्वस्वी मेहेरजानरूप बनून गेलें होतें! शेवटीं निरोप देतांना सुंदरी मेहेरजानच्या ओष्ठांवर जें मोहक मधुर हास्य विलसत होतें, त्यानें तर रुस्तमला अगदींच वेड करून सोडलें! त्या मंद स्मितानें त्याच्या हृदयांत अनेक आशा उत्तेजित झाल्या! त्याला चोहोंकडे त्या देवरमणीची मोहिनी मूर्तिच दिसूं लागली. शेर अफगाणच्या वाड्यासमोर असलेल्या उद्यानांतील नानाविध पुष्पवाटिकांतील मल्लिकादि मनोहर पुष्पांनीं मेहेरच्या सुंदर मुखाची कोमलता चोरून घेतली आहे, असाच पागल रुस्तमला भास होऊं लागला! वर आकाशमंडळांत मेघाला आलिंगन देणाऱ्या पापियांनें जणुं काय मेहेरजानचा कोमल व उच्च कंठस्वर हरण केला आहे, असें त्याला वाटलें! नील गगनाच्या विचित्र वर्णछटेंत त्या सुंदरीच्या सुंदर अवगुंठन वस्त्राची छटाच प्रतिबिंबित झाली आहे, असा रुस्तमला भ्रम होऊं लागला! ज्या नयनधनूंतून त्याजवर कटाक्षशरांचा वर्षाव होत होता, तीं धनुष्यें तरी किती मनोहर! त्या सुंदरीचा स्वर तरी किती मंजुल आणि मिष्ट! तिनें रागानें मान वळून कित्येक वेळां आपणाकडे पाहिलें, तें तरी किती सुंदर! त्या क्रोध दृष्टींतहि एका प्रकारचें माधुर्य होतें! जें पहावें किंवा ज्याचें स्मरण करावें तें तें सुंदरच! ' किमिवहि मधुराणांमंडनं नाकृतीनाम् ' असाच प्रश्न रुस्तमपुढें त्या वेळीं उभा राहिला! परमेश्वरानें असें अलौकिक सुंदर रूप आपल्या दृष्टीस पाडून आपणाला ही जन्माची तळमळ कां लावली? हें दुर्दैव कीं सुदैव, तें रुस्तमला कळेना! दिल्लीश्वराचा नूतन सेनापति याप्रमाणें रूपमोहांत पूर्णपणें सांपडला! त्याच्या सर्वनाशास हें लावण्यरूपी जहाल जहरच कारण झालें! आपण कोण, आपलें कर्तव्य काय, आपणावर आपल्या प्रभूनें ठेविलेल्या विश्वासाचा आपण

समूळ नाश कसा करतों आहों, या सर्वांचा रुस्तमला अजिबात विसर पडला!

त्याला नरकमार्गाशिवाय समोर कांहींच दिसेना! त्याच मार्गानें तो सारखा बेधडक जाऊं लागला. सैतानाची रुस्तमवर पूर्ण मोहिनी पडली—त्याचा तो विकत घेतलेला बंदा गुलाम बनला!

मेहेर उन्निसाच्या महालांतून निघून गेल्यापासून त्या लावण्यलतिकेचें आपणास पुनः दर्शन कधीं होईल, याच गोष्टीचा रुस्तमला सारखा ध्यास लागून राहिला. तिचें दर्शन घ्यावयाचें ह्मणजे पुनः कोणत्यातरी निमित्तानें त्याला तिच्या महालांत जाणें भाग होतें. असें कांहीं निमित्त रुस्तमला शोधूनहि सांपडेना. मेहेरजाननें केलेल्या विनंतीचा जबाब देण्यासाठीं संध्याकाळीं तिच्या महालांत जाण्याचीच कायती संधि त्याला मिळणार होती. अर्थात् सायंकाळ होईपर्यंत मेहेरच्या दिव्यरूपाचें कल्पना चक्षूंनीं निरीक्षण करीत त्याला तसेंच थांबावें लागलें. अत्यंत आतुर हृदयानें तो सायंकालाची मार्गप्रतीक्षा करीत होता. कांहीं केल्या त्याचा वेळ जातां जाईना! एक एक पळ ह्मणजे रुस्तमला युगाप्रमाणें दीर्घ भासूं लागलें! 'प्रणयी पुरुष, वेडा आणि कवि, हे एकाच मालिकेंतील मणि आहेत' असें एका पाश्चात्य कवीनें ह्मटलें आहे, तें अगदीं अक्षरशः खरें आहे. एखाद्या उन्मादग्रस्त वेड्या मनुष्याप्रमाणें रुस्तमच्या कल्पना भलतीकडेसच भरकटूं लागल्या. एक एक असंभवनीय विचारांची व कल्पनांची मालिका त्याच्या मस्तकांत सारखी भ्रमण करूं लागली! दिवसाच्या दीर्घपणाच्या विचारांत रुस्तमला किती तरी वेळ असें वाटलें कीं, सूर्यनारायण आपल्या स्थानावरून आज खास कोठें तरी भरकटला आहे! नाहीं तर अजून संध्याकाळ कां होऊं नये?

रुस्तम दुराशेनें उन्मत्त होऊन गेला होता. मेहेरजानच्या नुसत्या स्मरणानें त्याच्या हृदयाला अनेक वृश्चिकदंशांप्रमाणें भयंकर यातना होऊं लागल्या! आपल्या एखाद्या जिवलग मित्रापाशीं आपल्या दारुण यातनांचा पाढा वाचून हृदय शांत करावें तर अशी निर्लज्जपणाची गोष्ट कोणापाशीं काढावयाला त्याला धीर होईना! आणि होणार तरी कसा? जी सुंदरी अल्पावधींतच समग्र भरतखंडाच्या सम्राटाची पत्नी—भारतेश्वरी होणार—तिच्याविषयीं आपणासारख्या एका क्षुद्र शिपुरड्यानें पापलालसा बाळगून तिचा कोणापाशीं आपल्या तोंडानें उच्चार करावयाचें धाडस रुस्तमसारख्या सेनापतीला कसें व्हावें? मनांत चाललेल्या काहुराविषयीं रुस्तमच्या मुखांतून चकारशब्द बाहेर पडतांच तत्क्षणीं त्याला प्राणदंडच झाला असता! बरें हृदयांतील या यातना एखाद्या मित्राशीं ओकून न टाकाव्या तर धडधड जळणाऱ्या हृदयाची शांति व्हावी कशी? हाय दुर्भाग्य! याला उपाय काय? हतभाग्य रुस्तम प्रतिक्षणीं वाढणाऱ्या दारुण ज्वालांत नखशिखांत जळूं लागला!

रुस्तम अलीच्या वेड्या कल्पनांला बिलकूल न जुमानतां भगवान् सूर्यनारायण दररोजच्या प्रमाणेंच आपला गमनमार्ग शांतपणें हळु हळु आक्रमण करीत होता. नियमित कालीं तो आपला दीर्घ प्रवास संपवून अस्तगिरीवर येऊन ठेपला. शेवटीं, रुस्तम ज्या सायंकालाची इतक्या आतुर हृदयानें वाट पहात होता, तो सायंकाल आला!

रात्रीच्या आगमनाबरोबर रुस्तमची आशाहि सरसावूं लागली. प्रतिक्षणीं मेहेरजानच्या निरोपाची तो चातकाप्रमाणें वाट पहात होता.

रुस्तमला फार वेळ वाट पहावी लागली नाहीं. सायंकाल होऊन काळोख पडण्याच्या सुमारास, आपल्या कृष्ण वर्णानें अंधकारासहि लाजविणारी अशी एक विक्राळ स्वरूपाची तार्तार पहारेकरीण त्याच्या तंबूत येऊन ठेपली. रुस्तमचा आनंद हृदयांत मावेना! 'आपणाला बेगमसाहेबांनीं आतांच्या आतां बोलाविलें आहे.' हे त्या तार्तारणीचे घोगऱ्या आवाजानें उच्चारलेले शब्द त्यावेळीं रुस्तमला अमृतापेक्षांहि मधुर लागले.

तत्क्षणीं रुस्तम विद्युद्वेगानें उठला. आपला ऐटदार जामानिमा करून, आपलें सुंदर रूप पोषाखाच्या टापटिपीनें अधिकच सुंदर करून रुस्तम त्या पहारेकरणीबरोबर मेहेरजानच्या अंतःपुराकडे निघाला. तिच्या महालाच्या एका एकीकडच्या निर्जन खोलींत एका सुंदर पलंगावर मेहेर उन्निसा चिंतेंत निमग्न होऊन बसली आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. त्या सुंदरीचें आळित्याच्या रंगानें लाल केलेलें सुंदर चरणयुगुल पलंगाच्या खालीं अंथरलेल्या एका चित्रविचित्र रंगाच्या उंची गालिच्यावर स्थिरपणानें विराजमान झालें होतें. तिचें मुखकमल एका पिरोजी रंगाच्या तकतकीत रेशमी ओढणीनें अर्धवट झांकून गेलें होतें. अवगुंठन वस्त्राच्या आंत देव मन्मथाचे ते अमोघ विषमय धनुर्बाण सज्ज होते. भ्रमराप्रमाणें काळेभोर असणारे तिचे मोकळे केश त्या सुंदर मुखचंद्राच्या सभोंवार मेघखंडाप्रमाणें पसरले होते. दामोदराच्या बाजूनें मंद मंद वहाणाऱ्या मृदु वायुच्या तरंगांनीं ते चंचलपणानें मधून मधून हलत होते. रुस्तमला तेथें पोंचवून तार्तारीण तेथून निघून गेली.

रुस्तम खोलींत येतांच मेहेरजान आपल्या विचार मालिकेंतून जागी झाली. तिनें एकवार त्याच्याकडे हंसून पाहिलें. तिचें तें स्मित रुस्तमला स्वर्गसुखापेक्षांही अधिक वाटलें. त्यानें तिला लवून तीनदां कुर्निसात केला.

रुस्तमच्या प्रणामाला आपल्या मनोरम ग्रीवाभंगानें उत्तर देऊन मेहेरजाननें त्याला मृदु स्वरानें विचारलें "मग काय रुस्तमअल्ली? आपला काय विचार ठरला? मीं सकाळीं केलेली विनंति आपण मान्य केली असंच मी समजूं ना?"

मेहेरच्या या प्रश्नाला रुस्तमनें कांहीं उत्तर दिलें नाहीं. त्या पापिष्टाच्या मनांत त्या वेळीं कांहीं निराळेच विचार चालले होते. कांहीं विचार स्थिर करून रुस्तमनें चोहोंकडे बारीक नजरेनें पाहिलें. त्याच्या मनावर सैतानाचा पगडा बसला होता., हें त्याच्या कावऱ्या बावऱ्या चेहऱ्यावरून उघड दिसत होतें. खोलींत चिटपाखरूंहि नव्हतें! रुस्तमची ही चलबिचल मेहेरजानच्या लक्ष्यांत आली नाहीं असें नाहीं. परंतु त्याच्या मनांत त्यावेळीं मनुष्यत्वाला लाजविणारे राक्षसी विचार घोळत असतील अशी त्या बिचारीची मुळीं कल्पना देखील नव्हती!

मेहेरनें किंचित् कोपदर्शक स्वरानें विचारलें, "रुस्तम अल्ली? मला तुम्ही उत्तर कां देत नाहीं? तुमचा काय विचार ठरला?"

तरीहि रुस्तमकडून चकार शब्द नाहीं. मनातील भाव त्या सुंदरीपुढें बोलून दाखविण्याचें त्या पापिष्टाला धाडसच होईना.

प्रतिक्षणीं मनांतील गोष्ट तिला सांगून मोकळें व्हावें असें त्याला वाटे; परंतु तोंडांतून शब्दच फुटेना ! जितके वेळ ते शब्द त्याच्या जिव्हाग्रावर येत तितके वेळ रुस्तमचें हृदय आणि जिव्हा दोन्हीहि हीनशक्ति होऊन ते तसेच परत जात !

मेहेरजानला त्याच्या या वर्तनाचा कांहीं अर्थच कळेना ! रुस्तमकडे एकवार क्रोधानें पाहून ती तिरस्कारपूर्ण स्वरानें ओरडली. " रुस्तम अल्ली ! तुह्मी दिल्लीच्या बादशहाचे बडे सेनापती ! तुमचा अधिकार केवढा ! अन् असल्या क्षुल्लक गोष्टीला हो कीं नाहीं जबाब तुह्मांला इतक्या अवकाशानें सुद्धां देतां देऊं नये ही मोठ्या शरमेची गोष्ट आहे ! असल्या क्षुद्र गोष्टीच्या मीमांसेलाच, जर तुह्माला इतका वेळ लागूं लागला, तर तुमच्या हातून कोणतेंहि कार्य कधींहि पार पडायचें नाहीं ! धिःकार असो तुमच्या सेनापतिपणाला !"

इतक्या थरावर गोष्ट गेल्यानंतर रुस्तमला आतां स्तब्ध बसणें शक्यच नव्हतें. आतां कसा तरी धीर केलाच पाहिजे असा विचार करून तो अडखळत ह्मणाला, तसें नव्हे बेगमसाहेब ! ' मीमांसा ' ठरवून मीं प्रत्यक्ष कार्याला हातहि घातला आहे. सकाळपासून मी त्याच गोष्टीच्या विचारांत आणि उद्योगांत आहे. पालख्यांच्या तपासणीसंबंधीं तर राहोच—मी त्याच्याहि पुढच्या गोष्टींचा विचार करून ठेवला आहे—"

" काय तो ? "

" माझ्या कर्तबगारीविषयीं आपणाला जी शंका आतां आली आहे ती माझ्या या धाडशी विचारानें नाहींशी होईल अशी माझी खात्री आहे. "

" तुमचं ह्मणण अजून नाहीं माझ्या लक्ष्यांत आलं ! "

" आपणाला आजच्या आज—सेनापति रहमतखां येथें नाहींत तों—येथून मुक्त करण्याचा मीं विचार केला आहे बिबिसाहेब !"

" अगबाई ! खरं कीं काय ? " मेहेर आश्चर्यानें एकदम उद्गरली !

" काल मध्यरात्रीं दामोदराच्या तीरावर सेनापती रहमतखांशीं आपल्या ज्या गोष्टी झाल्या, त्या सर्व मीं ऐकल्या. दिल्लीपतीचे प्रमुख सेनापति असतांहि रहमतखानाला काल जी गोष्ट करण्याचें धाडस होईना, ती गोष्ट मी एक क्षुद्र सैनिक असतांहि करून दाखविणार आहें. आतां तरी माझ्या कर्तबगारीविषयीं बेगम साहेबांना खात्री पटते कीं नाहीं ? "

रुस्तमच्या भाषणावर मेहेरउन्निसाचा एकाएकीं विश्वासच पटेना ! पटणार तरी कसा ? आपण नाना तऱ्हांनीं विनण्या करून किंवा राग लोभ दाखवूनहि जी गोष्ट रहमतखांकडून झाली नाहीं, ती गोष्ट हा तरुण सेनापती करीन ह्मणतो, ही गोष्ट त्या विचारीला खरी कशी वाटावी ? रुस्तमच्या या आश्वासनानें मेहेर खरोखरीच फार गोंधळून गेली.

रुस्तमकडे भेदक दृष्टीनें पहात मेहेरउन्निसा त्याला ह्मणाली, "सेनापतीसाहेब ! मला अजूनहि तुह्मी ह्मणतां तें खरें वाटत नाहीं. "

" कां बरें बेगमसाहेब ? मजवर आपला विश्वास नाहीं का ? "

" तुह्मी कोणाच्या हुकुमानं माझी मुक्तता करणार ? "

रुस्तम धीर गंभीर स्वरानें ह्मणाला, " माझ्या स्वतःच्या हुकुमानें ! माझ्या

स्वतःच्या शक्तीच्या, हिंमतीच्या आणि इच्छेच्या बलावर मी आपली मुक्तता करीन असें मी आपणाला वचन देतों."

मेहेर आश्चर्यानें ह्मणाली, "काय ह्मणतां सेनापती साहेब ? तुमच्या स्वतःच्या हिंमतीवर तुह्मी माझी मुक्तता करणार ? तर मग माझ्या मुक्ततेबद्दल तुह्माला मजकडून मोबदला तरी काय पाहिजे आहे ?"

मेहेरच्या या प्रश्नानें रुस्तम किंचित् हंसला—परतु त्या हास्यांत खिन्नपणाची विशेष झांक मारीत होती. तो मनांत ह्मणाला, "सुंदरी ! तुजपाशीं मी मोबदला तरी काय मागूं ? जो मोबदला मी मागेन त्याच्याशीं समग्र विश्वाच्या दानाची देखील कधीं तुलना होणार नाहीं !"

"रुस्तमअल्ली ! आपले मजवर फार उपकार आहेत. आपणाला यांत फार धोका."

"होय बेगमसाहेब ! आपणाला कल्पना नाहीं अशीं संकटें आपल्या मुक्ततेमुळें मजवर कोसळणार आहेत. आपल्या मुक्ततेसाठीं मला प्राणत्यागहि करावा लागेल !"

मेहेर कृतज्ञतादर्शक स्वरानें ह्मणाली," केवढे तुमचे उपकार हे ! माझ्यासाठीं आपण मरायलाहि कां बरं सिद्ध झालां आहां ?"

रुस्तमच्या आशा पुनः उत्तेजित होऊं लागल्या ! तो आवेगपूर्ण गद्गदकंठानें ह्मणाला, "आपणाला काय सांगूं बेगमसाहेब ! आपणाकरतां जीवनविसर्जन करावयाचा माझा दृढनिश्चय होऊन चुकला आहे. तो कालत्रयींहि आतां फिरावयाचा नाहीं. आपली जी स्थिति तीच माझी ! आपल्या जीविताशीं माझें जीवित; आपल्या आत्म्याशीं माझा आत्मा दृढपाशानें बद्ध करण्याची मीं प्रतिज्ञा केली आहे ! आपल्या अनुग्रहावर केवळ आत माझ्या जीवितांचें सुखसर्वस्व अवलंबून आहे ! बिबिसाहेब ! आपणापाशीं आतां हृदय उघडें करून दाखविल्याशिवाय गत्यंतर नाहीं. आपण आणि आपल्या या भुवनमनोहर लावण्यानेंच माझा सर्व नाश केला आहे. कालची रात्र ह्मणजे माझ्या आयुष्यांतील दुर्दैवाची सीमा होय. काल जर आपण माझ्या दृष्टीस पडलां नसतां, तर प्रभद्रोही होऊन मला अशा दारुण यातनांत जन्म कंठावा लागला नसता ! आपणाशीं एकजीव झाल्याशिवाय आतां मला जिवंत राहतांच येणार नाहीं !"

रुस्तमच्या मुखांतून यापैकीं एक एक वाक्य बाहेर पडत असतां मेहेरची चमत्कारिकच स्थिति होऊं लागली ! रुस्तमचें प्रत्येक अक्षर तिच्या हृदयाला भयंकर मर्मयातना देऊं लागलें ! त्या पाप्याच्या पापी हृदयाची तिला आतां चांगली ओळख पटली. तिच्या नखशिखांत सर्व शरीराचा क्रोधानें भडका उडाला.—मुखमंडल क्रोधानें लालबुंद होऊन गेलें. तिचें शरीर थरथरां कांपूं लागलें. त्वेषानें बेफाम झालेल्या वाघिणीप्रमाणें उग्र रूप धारण करून मेहेरजान कंपित स्वरानें ओरडली, "नीचा—पापिष्टा—सैताना ! कोणापुढें काय बोलतोस हें ? तुझ्या पापी हृदयांतील पापीलालसा मजपाशीं उच्चारून दाखवितांना तुझ्या त्या नष्ट जिव्हेचे शतशः तुकडे कसे झाले नाहींत ! कावळ्यानें हंसीचें पाणिग्रहण करण्याची इच्छा कशाला धरावी ? जा येथून काळें कर ! कोण आहे ग तिकडे मरजीना !—"

असें ह्मणून मेहेर खोलीच्या दरवाजापर्यंत त्वेषानें गेली.

रुस्तमवर आकाशच कोसळलं ! कामांधपणाच्या भरांत आपण भलतेंच करून बसलों हें आतां त्याच्या चांगलें ध्यानांत आलें. आतां या धाडसाचा परिणाम काय होणार ? कैद–शृंखली, कारागृह, उपास, मरण हीं त्याच्या डोळ्यासमोर स्पष्टपणें दिसूं लागलीं. मृत्यूच्या कल्पनेनें हृदयाला धक्का बसला !

क्षणार्धांत मेहेरच्या मागोमाग धांवत जाऊन तिच्यापुढें पडून त्यानें। तिचे पाय धरले व करुणावाणीनें तो बोलूं लागला "क्षमा करा, बेगम साहेब ! या अधम चांडाळाला क्षमा करा. या पाप्याच्या हातून भयंकर अपराध घडला आहे. माझा भ्रम पार नाहींसा झाला ! कृपा करून ही हकीगत आणि माझा नीचपणा कोणाच्याहि कानांवर न जाईल असें करा. जाईल तर त्यांत दोघांच्याहि नांवाला कलंक आहे. आपण मला क्षमेचें वचन द्याल तर मी येथून जन्माचें काळें करून जातों. माझी पापमूर्ति आपल्या पुनः कधींहि दृष्टीस पडणार नाहीं. वेडाच्या लहरींत मी भलतें सलतें बरळलों, तें सारें विसरून जा आणि मला क्षमेची भिक्षा घाला. मी हें उन्मादाच्या भरांत नीच कृत्य केलें. नाहींतर हा लहान तोंडीं मोठा घांस मीं कां घेतला असता ? बेगम साहेब ! माझ्यासारख्या हतदैवी क्षुद्र मनुष्याला मरणदंड देण्यांत आपल्यासारख्या उच्च दर्जाच्या स्त्रीला काय लाभ ?"

मेहेरचें हृदय या शब्दांनीं द्रवलें नाहीं. ती ओरडून ह्मणाली. "पिशाचा ! आपल्या पापी भाषणानें माझे कान अपवित्र करूं नकोस–जा–चालता हो–पुनः माझ्या दृष्टीस पडूं नकोस—"

पडत्या फळाची आज्ञा घेऊन रुस्तम द्रुत पदानें तेथून निघून गेला. जातांना त्यानें मेहरजानला प्रणाम देखील केला नाहीं. प्राणभयानें आणि अपमानभयानें बिचारा भांबावून गेल्यानें किंकर्तव्यमूढ होऊन गेला होता. शेर अफगाणच्या वाड्याबाहेर पडतांच त्यानें तडक सिबिराची वाट धरली.

या वेळीं रात्र बरीच सरसावली होती. अंधकारानें आपलें साम्राज्य अबाधितपणें चहूंकडे विस्तारलें होतें. रुस्तमच्या तोंडावरही कृष्णतेनें आपली छवि पसरली होती. एखाद्या प्रेताप्रमाणें मलिन मुखानें तो शिबिरांत पोंचला तों–काय दुर्दैव ! स्वतः सेनापति रहमतखां आपलीच वाट पहात तेथें बसला आहे असें रुस्तमच्या नजरेस पडलें.

रुस्तम आलेला दृष्टीस पडतांच रहमतनें कठोर स्वरानें त्याला विचारलें. "रुस्तम ! तूं या वेळीं कोठें गेला होतास ?"

रहमतखांच्या त्या घनगंभीर स्वरानें रुस्तमच्या पापहृदयांत एकदम धस्स झालें. कांपत कांपत त्यानें उत्तर दिलें, "बेगम साहेबांनीं मला बोलावणें पाठविल्यामुळें मी त्यांना सलाम करावयास गेलो होतों.

"कशाला त्यांनीं बोलावलें होतें ?"

"अंतःपुरांत त्यांना भेटायला येणाऱ्या आप्तमित्रांच्या पालख्या पहारेकरणींनीं न तपासतां तशाच सोडाव्या ह्मणून बेगम साहेबांनीं मला विनंति केली."

"मग तूं त्यांना काय उत्तर दिलेंस ?"

"कांहीं नाहीं."

रुस्तमच्या मुखांतून हे शब्द बाहेर पडतात न पडतात. तोंच वृद्ध रहमतखां

एकदम आपल्या जागेवरून उठून त्याच्या जवळ आला. त्या म्हाताऱ्याचें सर्व शरीर क्रोधानें कापूं लागलें. त्याच्या अंगीं या वेळीं तरुणाची शक्ति संचरली ! तो क्रोध स्वरानें ओरडला " हरामखोरा ! विश्वास घातक्या ! तूं दिल्लीश्वराचा सेनापति ! काय तुझी स्वामिनिष्ठा ही? निमकहराम ! सैतान ! तुझीं नीचपणाचीं भाषणें मीं सारीं ऐकलीं आहेत समजलास ? आजपासून तूं पदच्युत झाला आहेस. शहानशहांचा तूं कैदी आहेस ! कोण आहेरे ? बांधा या हराम-जाद्याच्या मुसक्या ! "

रुस्तम काय बोलणार ? बिचारा स्तब्ध-पणें सर्व संकटास तोंड देत होता. त्याचा निस्तब्धपणाच त्याच्या अपराधाचें स्पष्ट प्रमाण होतें.

मुख्य सेनापति रहमतखांच्या हुकुमानें क्षणार्धांत रुस्तमअल्ली चतुर्भुज बनला ! तत्क्षणीं त्याच्या हातापायांत बिड्या पडल्या. पापवासनेनें त्याचा पूर्ण अधःपात झाला. त्याला आंत घेण्यासाठीं नरकद्वार प्रचंड शब्द होऊन उघडलें !

---

## प्रकरण पांचवें.

### दोघी मैत्रिणी.

दुसऱ्या दिवशीं सायंकाळा आपल्या महालांतील एका उघड्या खिडकीशीं उभी राहून मेहेरउन्निसा सायंकालीन गगनाची शोभा पहात होती. सृष्टिसुंदरीनें त्यावेळीं अपूर्व सौंदर्य धारण केलें होतें. सूर्यनारायण नुकताच अस्ताचलावर येऊन ठेपला होता. त्याचे सोनेरी रंगाचे शांत किरण वृक्षावली-च्या पत्रपल्लवांवर पडून सूर्यरूपी जादूगा-राच्या अपूर्व किमियेचा प्रभाव जगाला दर्शवित होतें. नकली सुवर्णाचा रंग हळू हळू जसा नाहींसा होत जातो, तसा कनक किरणांनीं भूषित झालेल्या वस्तूंचा सुवर्ण-हि हळू हळू तेजोहीन होत चालला होता. लोहपात्राप्रमाणें सर्व जगत् कृष्णवर्ण बनत होतें. कान्तसमागमानें प्रमुदित होऊन रात्रीनें पश्चिम दिशेकडे आरक्तवर्ण धारण केला होता, व सर्व जगताला आपणाबरोबर प्रणय-मय व्हावयाचा ती उपदेश करीत होती. नानाविधी जातींचे लहान मोठे पक्षी नील आकाशाच्या खालून द्रुतगतीनें इकडून तिकडे स्वच्छंदानें उडत होते व इत-क्या उंच आकाशांत आह्मांप्रमाणें ज्यांना विहार करतां येत नाहीं, ते या जगतांतील खरोखर अति क्षुद्र जंतु होत, असेंच जणुं काय आपल्या नानातऱ्हेच्या चीत्कारांनीं सुचवीत होते. मेघाच्या विलाससमुद्रांत पुनःपुनः बुड्या मारमारून ते पक्षी मनुष्यांप्राण्यापेक्षां निराळ्याच सुखांत दंग होऊन गेले होते. ही सर्व शोभा पाहण्यांत मेहेरउन्निसा अगदीं रंगून गेली होती. तिच्या उद्विग्न मनाला या सृष्टि-सौंदर्य निरीक्षणापासून बराच आनंद वाटत असावा असें स्पष्ट दिसत होतें. सभोंवतालच्या शांत व प्रसन्न सृष्टिसुंदरीचें प्रतिबिंब मेहे-रच्या मुखरूपी दर्पणांत बहुतेक उमटलें होतें. असें ह्मणावयास हरकत नाहीं.

मेहेर सृष्टिसौंदर्य पाहण्यांत याप्रमाणें अगदीं गढून गेली आहे, इतक्यांत मागून हळूच कोणी मृदु स्वरांत हाक मारली. " मेहेरजान ! "

'मेहरजान' हांक ऐकतांच एकदम चमकली! पुनः त्या अदृष्ट व्यक्तीनें मृदु स्वरानें हांक मारली—" प्यारी मेहेर ! "

मेहेरजान ! प्यारी मेहेर ! कोणाची ही गोड हांक ? मेहेर उन्निसाला या शब्दांनीं संबोधणारें प्रेमाचें मनुष्य कोणीच नव्हतें. 'बिबिसाहेब !' 'बेगमसाहेब !' वगैरे शब्दांनीं तिला संबोधणारीं मनुष्यें बरींच होतीं.—परंतु या शद्बांत मनाची व उच्च दर्जाची जितकी कल्पना होती, तितकीच त्यांत खऱ्या निर्हेतुक प्रेमाचा व आदराचा अभावही ढळढळीत दिसून येण्यासारखा होता. 'मेहेरजान' व 'प्यारी मेहेर' या शब्दांनीं मेहेरउन्निसाचा मृत प्रियपति शेरसाहेब, तिला मोठ्या प्रेमाने संबोधित असे. तर मग त्याचेच का हे गोड शब्द. मृत मनुष्यें कबरेंतून उठून आपल्या प्रियजनांस परिचित शब्दांनीं हांका मारून, त्यांना दुर्दैवानें लोपलेल्या प्रेमाचें स्मरण कधींपासून करून द्यावयाला लागलीं ? मेहेरजाननें मागें वळून पाहिलें, तों स्मित मुद्रेनें आपणाकडे पहात असणारी 'मोतीराणी' तिच्या दृष्टीस पडली.

आपल्या चिरप्रिय सखीला पहातांच मेहेरला अवर्णनीय आनंद झाला. ती आनंदानें धांवतच मोतीराणीच्या जवळ गेली. प्रेमानें तिचा हात धरून मेहेरनें तिला आपल्या पलंगावर आणून बसविलें.

मेहेरजानच्या शरीराकडे पाहून मोतीला कससेंच वाटलें. तिचें स्वर्गीय मोहक सौंदर्य बरच काळें ठिक्कर पडलें आहे असें तिच्या दृष्टीस पडलें. तिचे सुंदर केश, बिलकूल काळजी न घेतल्यमुळें अस्ताव्यस्तपणानें तिच्या मुखा सभोंवतीं विखुरले आहेत; तसेंच सदा सर्वदा प्रफुल्ल असणारें, रसानें नेहमीं आर्द्र व सरस दिसणारें तिचें ओष्ठयुगल तीरस व शुष्क होऊन क्षणोक्षणीं कंप पावत आहे, असेंहि मोतीबिबीला दिसून आलें.

आपल्या प्रीय मैत्रिणीच्या शेजारीं पलगावर बसून मोतीच्या गळ्यांत गळा घालून मेहेरजान गहींवर रडरडरडली. वर्षानदीचा अवरूढ प्रवाह मधील बांध फुटून जणूं काय खुला झाला, असें त्यावेळीं मोतीला वाटलें. वेगानें वहाणारा तो नदीप्रवाह आतां कोणत्याही प्रतिबंधाला जुमानीसा झाला. थांबण्याची त्याची इच्छाच दिसेना ! कधीं तरी तो मागें फिरतो कीं नाहीं, याचीच तिला आतां काळजी वाटूं लागली.

मोती बिबीनें आपल्या मैत्रिणीला बराच वेळपर्यंत तसेंच रडूं दिलें. यावेळीं अश्रूंच्या रूपानें तिचें दुःख वाहूं देणेंच सर्वथैव इष्ट आहे असें तिला वाटलें. परंतु सर्व गोष्टींला शेवट हा आहेच. तसा कांहीं वेळानें मेहेरचा अश्रपूर हलुहळू ओसरला—स्फुंदणें कमी झाल. मेहेरच्या दुःखानें मोतीचें हृदय अगदीं द्रवून गेलें.

मेहेरचें स्फुंदणें थांबल्यावर तिला अगदीं जवळ घेऊन तिच्या पाठीवर भगिनी प्रेमानें हांत फिरवीत फिरवीत, मोती तिला मृदु भावानें ह्मणाली, " मेहेर ! इतक्या दूरवर पल्ला जाईपर्यंत तूं मला कां बरं नाहीं कळविलंस ? वेडे ! अगदीं जिवाच्या सखीला सुद्धां जर मनांतलं दुःख अगदीं गळ्याशीं येईपर्यंत कळवायाचं नाहीं, तर मग दोघीं मधला तो नांवाचा स्नेह तरी काय कामाचा ?"

मोतीराणाच्या या प्रश्नाला मेहेरकडून उत्तर मिळालें नाहीं. ती पुनः स्फुंदून स्फुंदून रडूं लागली. तिच्या कोमल गंडस्थल मार्गानें

नेत्रवाटे पुनः अश्रुप्रवाह वाहूं लागला. पावसाच्या सरीनें भिजलेल्या गुलाब पुष्पाप्रमाणें त्या रमणीच्या मुखाचें सौंदर्य तिच्या अश्रुवर्षावानें अधिकच खुलून दिसूं लागलें! सुंदर वस्तू सर्व स्थितींत नेहमीं सुंदरच दिसावयाच्या!—विकृतीनें जणूं काय त्यांचें सौंदर्य अधिकाधिक वाढत असतें!

यावेळीं मात्र मेहेरचें सांत्वन केल्याशिवाय मोतीला राहवेना. आपल्या बहुमूल्य वस्त्राच्या पदरानें मेहेरजानचे अश्रु पुसून तिची सखी आश्वासनपर शब्दांनीं तिला ह्मणाली, "मेहेर! मेहेर! आतां किती वरं तूं असा शोक करशील? जें व्हायचं होतं, तें दैवबलानं घडून आलं. जें फिरविण्याचं आपणाला परमेश्वरानं सामर्थ्य दिलं नाहीं, त्याच्यासाठीं उगीच शोक करून फायदा काय? आतां नको गडे पुनः डोळ्यांतून पाणी काढूंस! आपणाला आतां पुढला विचार केला पाहिजे. मजपुढं बसून तूं अशी डोळ्यांतून टिपं गाळलेली पहायाला का तूं मला इतक्या दूर बोलावून आणलंस?"

मोतीराणीच्या या मायेच्या भाषणानें तर मेहेरला अधिकच भडभडून आलें—ती स्फुंदत स्फुंदत ह्मणाली, "मतिया! प्रियसखे! तुझ्यासारख्या जिवलग मैत्रीणीपुढं बसून माझ्या हृदयांतील यातनांची करुण कहाणी सांगत टिपं गाळूं नको, तर कुणासमोर गाळं? तूंही मला अशी झिडकारूं लागलीस तर मला आश्रय तरी कुणाचा? मतिया! मी मोठ्या संकटांत पडलें आहे—त्यांतून आतां मला तारणार तूंच आहेस. मला अभागिनीला आग्र्याला घेऊन जाण्यासाठीं बादशहाचं सैन्य इथं आलं आहे—मी कुठं पळून जाईन ह्मणून वाड्याभोंवतीं त्यांचा कडक पहारा पडला आहे."

मेहेरजाननें सांगितलेल्या या हकीगतीनें मोतीराणीवर फारसा परिणाम झाल्याचें तिच्या मुखावरून दिसलें नाहीं किंवा तिला फारसें आश्चर्यही वाटलें नाहीं. राजा गजपतीसिंहाकडून अगोदरच तिला सर्व हकीगत कळली होती.

ती मेहेरजानला उद्देशून ह्मणाली, "मला अगोदरच तिकडून तुझी सारी हकीगत कळली आहे. आग्र्याहून बादशहाकडून वर्धमानला फौज रवाना होतांच काटवाला आह्मांस ही वातमी कळली. मेहेर! मला जर तूं खरं खरं विचारशील, तर तुला आतां आग्र्याला गेल्यावांचून गत्यंतरच नाहीं असं मला वाटतं. खुद्द दिल्लीपतीकडून आमंत्रण आल्यावर आग्र्याला गेल्यावांचून कसं चालेल? त्याला दुसरा उपायच नाहीं."

मेहेरउन्निसा दृढ स्वरानें ह्मणाली, "मतिया! काय वाटेल तीं संकटं मजवर येवोत—मी आग्र्याला जाणार नाहीं. मीहि प्रतिज्ञा केली आहे कीं, वाटेंत जातां जातां मला मरण आलं तरी पुरवलं, परंतु मी ह्मणून कांहीं त्या मेल्या पाषाणहृदयी बादशहाची विलासदासी होऊन अपमानांत जिणं कंठणार नाहीं."

"मेहेर! मेहेर! हें तूं काय भलतंच बोलते आहेस असं? तूं त्या दिल्लीपति बादशहाची विलासदासी होणार ह्मणून कुणीं मेल्यानें तुला सांगितलं? तूं दिल्लीश्वराची पट्टराणी होऊन त्याच्याबरोबर दिल्लीच्या मणिखचित सुवर्णसिंहासनावर विराजमान होशील. एके दिवशीं समग्र हिंदुस्थान तुझ्या एका कटाक्षपातानं थरथरां कांपूं लागेल! दिल्लीच्या

साम्राटाची भारतेश्वरी होण्यापेक्षां वैभवाच्या श्रेष्ठतेची दुसरी कल्पनातरी आहे कां ?"

मोतीराणीच्या या आश्वासनपर भाषणाचा तिच्या कल्पनेपेक्षां मेहेरजानवर उलटच परिणाम झाला. तिच्या सुंदर नेत्रयुगुलांत पुनः अश्रुबिंदु चमकूं लागले. ती सकरुण दृष्टीनें मोतीराणीकडे पहात ह्मणाली, "मतिया ! प्रियसखी ! असलीं छद्मी भाषणं बोलून माझ्या आधींच तापलेल्या हृदयावर आणखी डागण्या तूं कां बरं देतेस ? मागच सारं प्रेम आणि स्नेह विसरून तूं देखील मजविषयीं निष्ठुर झालीस ना ? तूं तरी बाई कां फिरणार नाहींस ? दैवच फिरलं ह्मणजे जिवाचे जिवलग मित्र दिखील फिरतात ह्मणतात तें कांहीं खोटं नव्हे. या संकटांत मला धीर देण्यासाठीं, मला सल्ला मसलत देण्यासाठीं, मी तुला मुद्दाम इथं बोलावून आणली. तूं असं भलतं सलतं कांहीं मला सांगूं नकोस गडे ! मला जीवाची मैत्रिण समजून—पाठची बहीण समजून—या संकटांतून उद्धरण्याचा मार्ग सांग. मणिखचित सिंहासनावर बसल्यानें साऱ्या जन्माला लागणारा डाग नाहींसा होईल कां ?"

मोतीराणी गंभीरस्वरानें मेहेरला ह्मणाली. "मेहेर ! मी हिंदुधर्मांत, हिंदु आईबापांच्या पोटीं जन्म घेतला आहे. आह्मा हिंदु लोकांचा अदृष्टावर फार भरंवसा असतो, त्याप्रमाण माझाहि आहे. तुला जे इतके भयंकर कष्ट पडले—तुझी जी इतकी दुर्दशा झाली, या सर्वाला तुझं अदृष्टच कारण होय अस मला वाटतं. या कारणानं आमच्या शास्त्राप्रमाणं मनुष्याच्या सर्व बऱ्या वाईट कर्मांची—पापापुण्याची नीट उपपत्ति लागते. अन् ह्मणूनच आमचा अदृष्टावर पूर्ण भरंवसा बसला आहे—"

"मतिया ! तुझ अदृष्टपुराण नको गडे"

"पण नुसत्या अदृष्टालाच तरी दोष देऊनहि उपयोग नाहीं. तुला हल्लींची कष्टमय स्थिति प्राप्त व्हायला स्वतः अकबर बादशहाच मुख्यतः कारण झाला. युवराजाच्या अन् तुझ्या प्रेमांत जर तो मुद्दाम आडवा न येता, तर तूं त्याच वेळीं कुमार सेलिमाची अंकलक्ष्मी होऊन राहिली असतीस. पण अदृष्टाच्या पुढं कोणाला जातां येणार ? अकबर हिंदुस्थानचा सार्वभौम होता ह्मणून अदृष्टाला का त्याच्यानं कधीं अडथळा करवणार आहे ? तूं दिल्लीच्या सिंहासनावर बसणार—भारत साम्राज्ञीचं उच्च पद तुला प्राप्त होणार, असंच तुझ्या अदृष्टांत लिहिलेलें आहे. ती अदृष्ट लिपी पुसून टाकण्याचं कुणाच्या अंगीं सामर्थ्य आहे ?"

मेहेरजानला मोती बिबिचा हा अदृष्टवाद बिलकुल रुचला नाहीं. ती गर्वोद्धत वाणीनें मध्येंच ह्मणाली, "माझ्या अंगीं तें सामर्थ्य आहे. तुझ्या त्या अदृष्टाच्या सामर्थ्याला मी स्वतः प्रतिबंध करीन."

"त्या नुसत्या बोलायच्या गोष्टी आहेत. देवापुढ कोणाचही सामथ्य चालायचं नाहीं. वेडे ! असे दैवाला आळा घालणारे वीर आजपर्यंत किती तरी लटपटून गेले."

"तूं पहाशील मतिया ! माझ्या नशीबीं दिल्लीचं सिंहासन आहे असं तूं ह्मणतेस, परंतु त्या सिंहासनाला अन त्याबरोबर हिंदुस्थानच्या साम्राज्ञीपणालाही मी असं दूर ढकलून देईन. माझ्या स्वामीशीं मी बेइमान होणार नाहीं. माझे प्रियकर आतां स्वर्गांत आहेत खरे—परंतु त्यांची पवित्र स्मृति माझ्या हृदयपटावरून कधींहि नाहींशी होणार नाही, ही तुझी खात्री असूं दे."

" मेहेर ! नीट विचार करून काय बोलावयाचं तें बोल. तुझी ही प्रतिज्ञा शेवटपर्यंत टिकेल अशी तुझी खात्री आहे ना ? "

" माझी इच्छा माझ्या स्वाधीन आहे आणि माझी प्रतिज्ञा माझ्या इच्छेच्या स्वाधीन आहे. ज्या मार्गानं इच्छेला मी चालवीन त्याच मार्गानं तिला चाललं पाहिजे, अन ती चालेल अशी माझी खात्री आहे. सर्व स्त्रियांचं हृदय अतिशय दुर्बल असतं, असा तर तुझा समज नाहींना मतिया ? "

मोतीराणी किंचित् स्मित करून ह्मणाली, " मेहेर ! तुला ह्मणावं तरी काय, तेंच मला समजत नाहीं. ज्याचं तुजवर इतकं निष्कलंक प्रेम आणि ज्यानं तुझ्या प्राप्तीसाठीं इतका अट्टाहास चालविला आहे, त्याचं तूं दर्शन दिखील घेणार नाहीं ह्मणतेस ? शाबास ! मग तुला कृतज्ञतेची चांगली ओळख आहे ह्मणायची ! मी तुला सांगतें, मेहेर ! बादशाही सैन्य ज्याअर्थी तुला न्यावयाला वर्धमानपर्यंत आलं आहे, त्या अर्थी तुला आग्र्याला गेलंच पाहिजे. आग्र्याला पोंचल्यानंतर जेव्हां तूं मोतीमहालांत जाशील आणि तुला मोठ्या आदरानं भेटायला जेव्हां खुद्द शहानशहा तिथं येतील, तेव्हां तूं काय करशील मेहेर ? दिल्लीश्वराच्या प्रेमाची अन् आदराची तूं तेव्हां उपेक्षा करणार काय ? "

मेहेर उत्तेजित स्वरानें ह्मणाली, "त्याच्या प्रेमाची मी नुसती उपेक्षाच करून रहाणार नाहीं मतिया ! संधि मिळाली तर त्याच्या वक्षःस्थलावर लत्ताप्रहार देखिल करायला मी मागं पुढं पहाणार नाहीं समजलीस ? शिवाय, त्याची कटु शब्दांनीं अतिशय निर्भत्सना करून शेवटीं मी त्याला ह्मणेन, " तूं दुनियेचा बादशहा असलास, फार काय, स्वर्गाचा राजा असलास, तरी दिखील तूं नीच आहेस. तुझं मुखावलोकनहि मला करायला नको. भलत्याच मोहाला वश होऊन, पापसागरांत उडी घेऊन, आपल्या सुखासाठीं तूं एका असहाय्य अबलेचा सर्वस्वी नाश केलास ? धिःक्कार असो तुझ्या मोठेपणाला अन् वैभवाला ! "

प्रत्यक्ष भरतखंडाच्या सांप्रतच्या सम्राटाच्या निंदेनें भरलेलें मेहेरजानचें हें भाषण मोतीराणीला बिलकूल आवडलें नाहीं, दिल्लीश्वराच्या वक्षःस्थलावर लत्ताप्रहार करण्याच्या मेहेरच्या वल्गनेनें तर ती बिचारी भिऊनच गेली ? तिचें हें उद्दाम भाषण कोणाच्या सहज कानावर गेलें तर तिच्यावर आणि आपणावर काय अनर्थ ओढवेल याची कल्पना होऊन तिच्या हृदयाचा थरकंप उडाला ! मेहेरजानच्या तोंडावर हात देऊन ती स्वर खाखरून तिला ह्मणते " मेहेर ! मेहेर ! असं बोलूं नये गडे ! अशा गोष्टींचा तोंडातून उच्चार देखील कधीं करूं नकोस. वेडे ! भिंतीला दिखील कान असतात ! वर्धमानांत चोहोंकडे बादशहाचे लोक पसरले आहेत. त्यांतून कुणाच्या कानांवर यापैकीं एक शब्दहि जर सहज गेला, तर आमचा सर्वनाश झालाच ह्मणून समज ! "

इतक्यांत महालाच्या दाराच्या मागून कोणी मोठ्यानें म्हणालें " बेगमसाहेबांनीं बादशहाच्या वक्षःस्थलावर प्रत्यक्ष लत्ताप्रहार केला तरी देखील त्यांना भय नाहीं. मग त्यासंबंधानें गोष्टी बोलायला तर कुणाचंच भय नाहीं. कारण, बेगमसाहेबांच्या कोमल चरणयुगलाचा जहांगीर बहशहाशहा बंदा गुलाम आहे. "

हे शद्ब ऐकतांच मेहेरजान व मोतीबिबी दोघीहि चमकून उठल्या व महालाच्या दरवाजाकडे निघाल्या. इतक्यांत एक अपरिचित स्त्री हंसत हंसत त्या दरवाजानें मेहेरजानच्या महालांत येऊन ठेपली.

---

## प्रकरण ६ वें.

—:*:—

### पियारी बेगमेची दासी.

'भिंतीला देखील कान असतात,' असा मोतिबिबिनें मेहेरजानला साहजिकपणें जो थोडया क्षणांपूर्वी इषारा दिला होता, त्याचा पूर्ण प्रत्यय त्यांना अगदीं तावडतोब आला! कधीं कधीं बोलाफुलाला विचित्र रीतीनें गांठ पडत असते ती अशी! मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें ती परकी स्त्री ध्यानीं मनीं नसतां एकदम आपल्या अगदीं एकांत महालांत आलेली पाहतांच मेहेरजानला किती आश्चर्य वाटलें असेल, याची कल्पना करण्याचें काम वाचकांवरच संपविलेलें बरें! त्या स्त्रीला पाहून बिचाऱ्या मोतिराणीच्या हृदयांत भयानें धडकीच भरली. मेहेरनें थोडया वेळापूर्वी बादशहाला अनुलक्षून जे शद्ब उच्चारिले होते, ते जर या स्त्रीच्या कानांवर गेले असतील, तर त्याचा काय भयंकर परिणाम होईल याची तिला कल्पनाहि करवेना! स्वतः मेहेरजानला या गोष्टीविषयीं फारशी फिकीर वाटत नव्हती, परंतु मोतिराणी तिच्या अल्लड सखीपेक्षां अधिक दूरदर्शी असल्यामुळें तिची साहजिकपणेंच पुढील परिणामांवर फार दूरवर नजर पोंचत होती.

जी स्त्री मेहेरजानच्या महालांत आगंतुक रीतीनें यावेळीं घुसली होती, ती खरोखरच फार सुंदर होती. यौवनाची भरज्वानी तिच्यांत नुसती मुसमुसत होती. तिच्या सुंदर व सुकुमार मुखावर एका प्रकारची स्वर्गीय कांति विराजमान झाली होती. तिचा पोषाक हलक्या दर्जाचा—परंतु अगदीं भिकार नव्हता. भपक्यापेक्षां त्यांत साधेपणाच विशेष दिसून येत होता आणि सूक्ष्म दृष्टीनें पहाणाऱ्याला तो साधेपणा कृत्रिम—मुद्दाम आणलेला आहे असें दिसून येण्यासारखें होतें. पोषाकावरून ती कोठल्या तरी पादशाही जनानखान्यांतील दासी असावी असें दिसत होतें. परंतु तिचा तो मनोहर मुखचंद्र दृष्टीस पडतांच ती फारच उच्च दर्जाची अशी कोणी तरी बेगम किंवा एखाद्या राजाची किंवा सरदार दरकदाराची पट्टराणी असावी असा पहाणाऱ्याचा उघड तर्क होण्यासारखा होता. आपलें रूप आणि त्यावरून ध्वनित होणारा उच्च दर्जा लपविण्याचा तिचा जरी मुद्दाम प्रयत्न चालला होता, तरी एखाद्या मार्मिक रसिकाला त्यामुळेंच तीं दोन्ही स्पष्ट दिसण्याचा संभव होता.

ती स्त्री आंत येतांच तिच्याजवळ त्वरेनें जाऊन मोतिराणीनें तिला सूक्ष्म रीतीनें नखशिखांत न्याहाळून पाहिलें, व विस्मयपूर्ण स्वरानें तिला विचारलें, "कोण ग तूं? इथं यावेळीं तूं कां ह्मणून?"

"मी दासी आहे बिबिसाहेब!—"

"दासी? कुणाची दासी?"

"पियारी बेगमसाहेबांची!"

"कोण तुझी ही पियारी बेगम?"

मोतिराणीचा हा प्रश्न ऐकतांच दासीनें आपला रक्ताधर किंचित जोरानें चावला तिच्या मुखावर क्रोध, इर्षादि मनोविकारांचि छाया पसरली. मोतिराणीकडे वक्र दृष्टीनें पाहून ती ह्मणाली, "दिल्लीच्या पियारीबेगमसाहेब–एवढया प्रसिद्ध बेगमसाहेब आपणाला ठाऊक सुद्धां नाहींत वाटतं ?"

"असेल कुणी तरी झालं–! ती इराणाहून नवीनच आली आहे दिल्लीला, तीच कीं नाहीं तुझी पियारीबेगम ?"

"होय बिबिसाहेब !"

"तर मग तूं इकडे कशाला आली आहेस ?"

"काय सांगू बाईसाहेब आपणाला माझ्या कर्माची कहाणी ? इराणहून बेगमसाहेबांनीं मला आपणाबरोबर दिल्लीला आणलं अन् अशा परक्या ठिकाणीं मला संकटांत लोटून दिलं–माझा कांहीं अपराध नसतां त्यांनीं आपल्या नोकरीवरून दूर केलं. बाईसाहेब ? त्यावेळीं मजवर केवढं भयंकर संकट कोसळलं असेल याची आपणच कल्पना करावी. आश्रयहीन होऊन मी अनाथासारखी रस्त्यांतून वणवण फिरूं लागलें. मला अभागिणीला कुठंहि आश्रय मिळेना. शेवटीं, निराश होऊन माझा एक चुलत काका इकडेच वर्धमानाजवळ आहे, असं कळल्यावरून त्याचा शोध करीत करीत मी त्याच्या घरीं येऊन पोंचलें. त्याच्या घरींच मी तेव्हांपासून आहें. परंतु अनाथ अपंगाला आश्रय देणं कुणाला आवडतं आहे बाईसाहेब ? अन् त्यांतून तो पडला माझा दूरचा काका ! शेवटीं त्याच्यापासूनहि मी दूर जाण्याचा विचार केला आहे. आजच मी असं ऐकलं, कीं, शेरसाहेबांच्या बेगमसाहेब शहानशहांच्या पट्टराणी होण्यासाठीं दिल्ली आगऱ्याकडे जात आहेत. त्यांच्याकडे तरी एखादी नोकरी चाकरी मिळाल्यास पहावी ह्मणून मी इथं आलें आहे बेगमसाहेब !"

पियारी बेगमेच्या दासीच्या या हकीगतीवर मोतिराणीचा बराच विश्वास बसला असावा असें दिसलें. मेहेरजानच्या महालांत ती दासी येतांच मोति बिबिला जें आश्चर्य वाटलें होतें, तें आतां बरेंच कमी झालें. तिच्या मनांत त्या दासीविषयीं पहिल्यानें जो संशय आला होता, तोहि आतां बराच कमी झाला होता.

मोतिराणीनें तिला किंचित मृदुस्वरानें विचारलें "पण तुझी चाकरी कां गेली ! पियारी बेगमेनं तुला आपल्या नोकरीवरून कां काढलं ?"

दासी खाली मान घालून ह्मणाली "काय सांगायचं बेगमसाहेब ! बादशाही झनानखान्यांतील चाकरी ! कुठं पानाला चुना कमी झाला, कीं गेली बेगमसाहेबांची तब्येत ! बेगमसाहेबांची प्रकृति फुलासारखी नाजुक ! त्यांची मर्जी जायला हो कसलं आलं आहे कारण !"

बादशाही झनानखान्यांतील बेगमांचा व इतर बड्या बड्या स्त्रियांचा स्वभाव किती चंचल व लहरी असतो, त्यांची तब्येत किती क्षुद्र कारणांमुळें नोकराचाकरांच्या आणि दासीलवडीच्या नोकऱ्या–किंबहुना त्यांचे जीवितहि किती क्षणभंगुर असतें, याची मोतिराणीला व मेहेरजानला चांगली कल्पना होती. अर्थात् पियारी बेगमेच्या दासीच्या या भाषणावर त्या दोघींचाहि चांगलाच विश्वास बसला

आणि तिजबद्दल त्यांच्या मनांत थोडीशी दयाही उत्पन्न झाली.

मोतिराणी तिला उद्देशून ह्मणाली " तुजबद्दल आह्माला खरोखर वाईट वाटतं. पण काय ग, थोड्या वेळांपूर्वी आह्मा दोघांत ज्या कांहीं गोष्टी चालल्या होत्या त्या तूं ऐकल्यास का ?

दासी हात जोडून म्हणाली, ' क्षमा करा बेगमसाहेब ! मी त्या मुद्दाम ऐकल्या नाहींत. माझ्या त्या सहज कानांवर आल्या. "

" पण तूं त्या ऐकल्यास का ह्मणून ? आल्याबरोबर तूं आह्माला ताबडतोब वर्दी कां नाहीं दिलीस ! तूं बादशाही झनान्यांत नोकरी केली आहे ह्मणतेस, मग तुला असले शिष्टाचाराचे सामान्य नियमसुद्धां का माहित नसावेत ? कां आपलं तूं आह्माला कांहीं तरी खोटंच रचून सांगतें आहेस ? "

काय असेल तें असो—मोतिराणीचे हे शब्द ऐकतांच दासीचा चेहेरा खरकन् उतरला. बराच वेळ ती स्तब्ध होती.

मोतिराणी कांहीं वेळ वाट पाहून तिला ह्मणाली " अशी घाबरूं नकोस तूं ! तुला काय सांगायचं असेल तें नीट सांग. "

मोतिराणीच्या या शब्दांनीं त्या दासीला बराच धीर आला असावा असें दिसलें. मोतिबिबिच्या मुखाकडे खिन्नपणें टक लावून ती दासी हात जोडून ह्मणाली, " बिबि-साहेब ! मी अगदीं खरं खरं सांगतें. आपल्या गोष्टी कांहीं मी मुद्दाम ऐकल्या नाहींत. थोरल्या बेगमसाहेब आपल्या महालांत एकट्याच असतील असं मला वाटलं होतं—अन याच समजावर मी इथपर्यंत आलें. परंतु इथ आल्यावर आपल्या अन् त्यांच्या कांहीं गोष्टी चालल्या आहेत असं मला आढळून आलं. आपल्या हितगुजांत मध्येंच येऊन आपला विरस करावा असं मला वाटेना. कांहीं वेळानं बेगमसाहेब मला एकट्याच भेटतील या आशेनं मी तशीच बाहेर तिष्ठत उभी होतें, परंतु मी वाट पहा-पहा पाहिली तरी तशी संधि मला मिळेना ! शेवटीं काय होईल तें होवो, बेगमसाहेबांना राग आला तर तो शांत करतां येईल, असा विचार करून, मनाचा धडा करून, मी महालांत शिरलें—याबद्दल मी पहिल्यानें क्षमा मागितलीच आहे—"

" मी तुला कांहीं सांगितलं तर तूं ऐकशील ? "

" काय तें बिबिसाहेब ? "

" मघाशीं जें तूं कांहीं ऐकलंस त्यापैकीं एक शब्दही तुझ्या तोंडून बाहेर फुटतां कामा नये. समजलीस ? "

त्याबद्दल आपणाला मुळींच काळजी नको बेगमसाहेब ! बादशाही रंगमहालांतील आह्मां दासींच्या तोंडून गुप्त गोष्टींचा स्फोट प्राणांतींही व्हावयाचा नाहीं. अशीं शेंकडों रहस्यें आह्मांला नेहमींच पोटांत घालून ठेवावीं लागतात. उथळ तोंडाच्या दासीला रंगमहालांत एक दिवसही टिकतां यायचं नाहीं. शिवाय अशीं गुप्त रहस्यें आम्ही जर पोटांत ठेवलीं नाहींत, तर दररोज आम्हांला सतरा वेळ मरावं लागेल. "

दासीचे हे शब्द ऐकून मोतिराणीच्या जीवांत जीव आला. आपल्या कमरेला खोंवलेल्या एका किनखापी पिशवींतून एक असरफी बाहेर काढून मोतिबिबीनें दासीच्या

हातीं दिली. एखाद्या गरीब दासीप्रमाणें नम्रपणें प्रणाम करून दासीनें ती असरफी घेतली.

दासीच्या हातीं असरफी देऊन मोती बिबि तिला किंचित् अधिकारसूचक स्वरानें म्हणाली, "नीट ध्यानांत ठेव! माझी ही प्रिय सखी आतां लवकरच साऱ्या हिंदुस्थानची स्वामिनी—भारतसाम्राटाची अर्धांगी होणार आहे. तिच्या एका शब्दानं सर्व भरतखंड थरथरा कापेल! तिच्यासंबंधानं एक शब्दही जर कुठं तुझ्या तोंडून फुटला असं आम्हांला कळल, तर तुझीं शंभर वर्षें भरलींच म्हणून समज!

"जशी बेगमसाहेबांची मर्जी? मजविषयीं आपण तिळमात्र काळजी करूं नये." "अजून आग्ऱ्याला कधीं जायचं तें नक्की ठरलं नाहीं, सात आठ दिवसांनीं पुनः एकदां तूं इथं ये, म्हणजे तुझ्या नोकरीची कुठं व्यवस्था होते कीं नाहीं तें पाहूं—मात्र तुझ्या कानांवर आलेल्या गोष्टींपैकीं एक ब्रहि तुझ्या तोंडून निघतां कामा नये. समजलीस?"

"बेगमसाहेबांना ईश्वर सदैव सुखांत ठेवो!"

दासी पुनः त्या दोघींना नम्रपणें प्रणाम करून तेथून हळुहळु निघून गेली, मोतिराणी आणि तिची अल्लड मैत्रिण—मेहेरउन्निसा—दोघीजणीहि त्या पापिष्टेच्या सोंगाला आणि कांगावाला पूर्णपणें भूलून गेल्या! पियारीबेगमेची दासी मेहेरच्या महालांतून जातांना एखाद्या धूर्त मनुष्यान जर तिच्या चेहेऱ्याकडे सूक्ष्म रीतीनें पाहिलें असतें तर त्याला त्यावर विजयाच्या हास्याची छटा पसरली आहे असें दिसून आलें असतें! मोतीराणीच्या व मेहेरच्या हें मुळींच लक्ष्यांत आलं नाहीं.

मेहेरच्या महालांतून निघून पियारी बेगमेची दासी हळुहळु शेर अफगाणच्या वाड्याबाहेर हास्य मुखानें बाहेर पडली. वाड्यापासून कांहीं अंतरावर गांवाच्या बाहेर एका तळ्याच्या कांठीं एक सुंदर मेणा होता, त्याच्यांत ती बसली. ती मेण्यांत बसतांच भोई मुकाट्यानें चालू लागले. मोतिराणीनें दिलेली असरफी तिनें वाटेंत भेटलेल्या एका भिकाऱ्याला देऊन टाकली!

"बिबिसाहेबांचे हेतु परमेश्वर पूर्ण करील" असा भिकाऱ्यानें दिलेला आशीर्वाद ऐकून मेण्यांत सुखासीन झालेली पियारीबेगमेची दासी किंचित हंसली, व आपणाशींच पुटपुटली "तेवढ्यासाठीं तर हा माझा खटाटोप!"

* * *

पियारी बेगमेची दासी महालांतून निघून गेल्यावर मोतीराणी मेहेरजानला घेऊन पुनः आपल्या ठिकाणीं येऊन बसली, मध्येंच आलेल्या या आगंतुक विघ्नामुळें दोघींचीहि मनें बरींच अस्वस्थ झालीं होतीं. कांहीं वेळ दोघीजणी अगदीं स्तब्ध बसल्या. मेहेरजान जणू काय कांहींच अनिष्ट प्रकार मध्यंतरी घडला नसावा, अशा तऱ्हेनें पूर्ण बेफिकीर दिसत होती—परंतु खरोखरच ती तशी होती किंवा नाहीं, याविषयीं संशयच होता.

पियारी बेगमेच्या त्या रूपवती दासीबद्दल प्रस्तुत प्रसंगीं चर्चा करणें इष्ट नव्हे असें मोतीराणीला वाटत होतें. आणि चर्चा करून भावी अनिष्ट परिणाम मुळींच वारण्यासारखाच नव्हता.

काहीं वेळानें मोतीराणी मेहेरला ह्मणाली " मग काय तुझा विचार ठरला मेहेर? शहानशहांनीं पाठविलेल्या सेनापतिबरोबर तूं आगऱ्याला जाणार, कीं वेड्या सारखा भलताच हट्ट धरून साऱ्या जन्माच्या कल्याणाला मुकणार ? "

मोतीबिबीच्या या प्रश्नानें मेहेर आपल्या विचारमालिकेंतून एकदम जागी झाली. आपल्या प्रियसखीकडे तीक्ष्ण नजरेनें पहात, आपला अधरोष्ठ किंचित कोपानें चावून ती निश्चयसूचक स्वरानें ह्मणाली, " मतिया या देहांत प्राण आहे तो मी आगऱ्याला जाणार नाहीं समजलीस? रहमतखांच्या हातून माझी सुटका होण्याविषयीं मी शक्य ते प्रयत्न करीन-नाहींच ते साधलें, तर रस्त्यांत विष खाऊन प्राण त्याग करीनः— "

मोतीराणी हंसत हंसत ह्मणाली " वेडी कुठली! तूं मरणार कां ह्मणून ? अन् तुला मरूं तरी कोण देणार आहे ? "

हें ऐकून मेहेर खिन्नपणें किंचित हंसली व आपल्या कोमल करांगुलींतील बहुमूल्य हिऱ्याची आंगठी आपल्या मैत्रिणीच्यापुढें करून ह्मणाली " ही पाहिलीसका माझी अंगटी मतिया ! हिच्या खड्यांत जालीम विष भरल आहे. रहमतखांच्या हातून माझी मुक्तता कोणत्याहि उपायानं होत नाहीं, असं ठरल्यावर या अंगठीचा हिरा मी गिळीन ! बादशहाला माझी दया आली नाहीं तरी हिच्या खड्यांतल्या विषाला माझी खास दया येईल मतिया ! मी जीवंतपणीं आगऱ्याला जाणार नाहीं. माझा मृतदेह आगऱ्याला पोंचेल ! अन् तो पाहून जहांगीर बादशहा आपल्या पराक्रमाचें कौतुक करील ! "

मेहेरचे हे भयंकर विचार मोतिराणीला ऐकवत ना ! प्रेमभरानें मेहेरचा हात आपल्या हातीं घेऊन ती ह्मणाली " मेहेर ! मेहेर ! असं भलतच काय बोलावं माणसानं? तूं आत्मघात केलास तर जहांगीर बादशहाचं त्यांत काय मोठसं नुकसान होणार आहे ?— छी ! वेडी कुठली! अशा गोष्टी मनांत सुद्धां आणूं नकोस ! माझं तुला असं आग्रहाचं सांगणं आहे, कीं, तं यावेळीं आगऱ्याला जा. तिथं गेल्यावर बादशहाचं तुजवर जर अंतःकरणपूर्वक प्रेम आहे असं तुला दिसलं, बादशहाकडून तुझा जर तिथं यथायोग्य प्रेमाचा आदर झाला, तर दिल्लीच्या सिंहासनावर जाहांगीर बादशहाबरोबर बसायला तूं मागं पुढं पाहूं नकोस. परंतु तिथं जर तुला जाहांगिराचं खरं प्रेम दिसून आलं नाहीं, तुझ्या ठिकाणीं केवळ त्याची रूपलालसाच दिसून आली, किंवा तिथं तुझा कांहीं अनादर दिसून आला तर तूं खुषाल विष प्राशन कर. माझी त्याला बिलकुल आडकाठी नाहीं. तूं इथून निघून गेल्यावर काटवाहून लवकरच खुद्द स्वारीला बरोबर घेऊन मी आगऱ्याला येणार आहें, तसाच प्रसंग आला तर मी स्वतः तुझ्या तोंडाशीं विषपात्र धरीन ! पण इथं तूं असं कांहीं भलत सलतंच करून मरूं नकोस !— "

मोतिराणीचा हा युक्तिवाद मेहेरजानला बराच पटला. तिचें भरकटलेलें मन मोतीराणीच्या भाषणानें किंचित् ताळ्यावर आल्यामुळें ह्मणा किंवा इतर कांहीं कारणामुळें ह्मणा, मोतिराणीची ही सल्ला तिला मानवली. आपणाला आत्महत्याच करावयाची असली तर कधींहि करतां येईल-असा विचार करून मेहेरजाननें मोतिबिबिच्या सल्या प्रमा-

गेंच वागावयाचा मनांतल्यामनांत निश्चय केला.

आपल्या भाषणाचा पुष्कळच इष्ट परिणाम मेहेरवर झाला असावा, असें धूर्त मोतीबिबीनें आपल्या मैत्रिणीच्या चेहेऱ्यावरून तेव्हांच ओळखलें. याच वेळीं अधिक नेट केल्यास मेहरचा मनोरूपी दुर्ग आपणास ताबडतोब सर करतां येईल, असा विचार करून मोतिराणी मधुर स्वरानें मेहेरला म्हणाली " मेहेरजान ! प्रियसखि ! आमच्या शास्त्रांत असं सांगितलं आहे, कीं हा मनुष्य-जन्म आपणाला वारंवार मिळत नसतो—मनुष्य जन्म मिळवावयाला प्राण्याला खडतर तपश्चर्या करावी लागते. शेकडों जन्मांच्या पुण्याईनें त्याला मनुष्यजन्म प्राप्त होतो. मनुष्य जन्म प्राप्त झाल्यावर त्याचं खरं खरं सार्थक झालं पाहिजे, नाहीं तर ईश्वराच्या घरीं आह्मी अपराधी नाहीं कां ठरणार ? अनेक पुण्य तपस्येनें मनुष्यत्व मिळाल्यावर मनुष्य प्राण्याला परमेश्वरानें जीं जीं कर्तव्यें ठरविलीं आहेत, तीं तीं त्याच्या हातून निर्विघ्नपणें पार पडतात, तो खरा धन्य होय. आमच्या आर्य शास्त्रकारांनीं आत्महत्येला मोठं पातक ठरविलें आहे. तें याच करितां ! मेहेर आत्मघात करून तुझं कर्तव्य तूं चुकविणार काय ? परमेश्वराची इच्छा मोडून आत्महत्या केल्यानं तरी यातना चुकतील असं तुला वाटतें तरी कसं? शुष्क मरुभूमींत क्वचित् जन्माला येणारे फूल तें कुठं फुलूं लागतं न लागत, तोंच कबरेंत टाकण्यांत शहाणपण कुठलं ? या भरतखंडाची तूं साम्राज्ञी झालीस तर तुला लोकहित किती करतां येईल याचा तूं नीट विचार कर. हजारों गोर गरिबांचं तुझ्या एका शब्दानं कोट कल्याण होईल इतकी शक्ति तुला संपादन करण्याची ही संधि तुला प्राप्त झाली आहे. हिचा तूं अव्हेर करूं नकोस. शिवाय पुनर्लग्न करण्याची धर्मांतहि मुळींच आडकाठी नाहीं.

मोतिराणी इतकें बोलून स्वस्थ बसली. आपल्या प्रिय सखीला आत्महत्त्येपासून परावृत्त करण्याची तिनें आपल्याकडून शिकस्त केली होती. इतकें करूनहि जर मेहेर उन्निसानें आपला हट्ट सोडला नाहीं तर आपला कांहींच इलाज नाहीं, असा विचार करून मोतिराणी खिन्नपणें स्वस्थ राहिली.

मेहेर उन्निसानें मोतिबिबीला कांहींच उत्तर दिलें नाहीं. तिचा युक्तिवाद मेहेरला पूर्णपणें पटला असल्यामुळें तिला कांहीं उत्तर देतां येईना ! मेहेर आपल्याशींच ह्मणाली, " मतिया मोठी युक्तिवान खरी. तिच्या उपदेशानं माझ्या नकळतच माझं मन केलेल्या निश्चयापासून हळु हळु ढळ लागलं आहे. तिच्या सल्ल्याप्रमाणं चालायला मला आतां कांहींच हरकत दिसत नाहीं. निर्वाणीचा उपाय तर माझ्या हातीं आहेच. मतियाच्या ह्मणण्याप्रमाणं आपण मुकाट्यानं आगऱ्याला जावं अन् तिथला रागरंग पाहून मग काय करायचं तें करावं हेंच तूर्त बरं ! "

कांहीं वेळानें मेहेरजानला उद्देशून मोतिराणी ह्मणाली, " मेहेर ! मला आतां गेलं पाहिजे. याप्रसंगीं इथं मी राहायची नाहीं अन् तूंहि मला रहाण्याचा आग्रह करूं नकोस—"

मेहेरजानच्या नेत्रांत खळकन् अश्रु आले. मोतिबिबीसारख्या प्रियसखीची इतक्या दिवसांनीं भेट झाली आणि तीहि घटका-

भरच ! आतां पुनः तिच्या भेटीचा योग कधीं येईल कोण जाणे, असे विचार मनांत येऊन मेहेरजानचं हृदय अगदीं भरून आलें. आपल्या प्रियसखीच्या खांद्यावर मान टाकून ती सारखी अश्रुविसर्जन करूं लागली. मोतिराणीचं मुल्यवान वस्त्र मेहेरच्या दुःखाश्रुंना ओलें झालें.

सद्गद कंठानें मेहेर म्हणाली " मतिया ! प्रियसखी !—"

" काय गडे ? "

" या प्रसंगीं तूं इथं रहा असं मी तुला कधींहि सांगणार नाहीं—पण—"

मेहरच्या दुःखाश्रूंनीं मोतीराणीचेंहि हृदय भरून आलें. अश्रुपूर्ण लोचनांनीं मेहेरकडे पाहून तिनें विचारलें—"मग काय म्हणतेस तूं मेहेर ? "

" पुनः आपली कधीं भेट होणार?—"

" पण मला अगोदर सांग—तूं रहमतखां बरोबर आगऱ्याला जाणार कीं नाहीं? आपलाच हट्ट धरून तूं आत्महत्याच करणार असलीस तर ही शेवटची—"

मोतिराणीच्या तोंडावर हात देऊन मेहेर अडखळत अडखळत म्हणाली—" नाहीं गडे ! तुझ्यासारख्या जिवलग मैत्रिणीचा उपदेश मी कसा ऐकणार नाहीं? मी रहमत बरोबर आगऱ्याला जाणार—"

मोतिबिबी किंचित स्मित करून म्हणाली " आतां मात्र तूं माझी प्रियसखी मेहेरजान खरी ! तूं आगऱ्याला पोंचतेस तो खुद्द स्वारीला घेऊन मी आगऱ्याला येतें. "

मेहेर कांहींच बोलली नाहीं. उत्तरादाखल तिनें एक दीर्घ निश्वास सोडला !

मेहेरला आपल्या हृदयाशीं घट्ट अलिंगन देऊन मोतीराणी म्हणाली, " मेहेर आजपर्यंत जितके वेळ मी इथं आलें तितके वेळ मी इथून जातांना हंसत हंसत तुझा निरोप घेतला, परंतु आजची ही स्थिति पाहून माझं हृदय फाटून जातें. माझा पाय इथून निघतां निघत नाहीं—पण गेले हें पाहिजेच. तुला माझा आशीर्वाद आहे मेहेर ! तूं चिरकाल विपुल सौख्य भोगशील—" पुढें मोतीबिबीच्या तोंडून शब्द फुटेना ! शोकावेगानें तिचा कंठ रुद्ध झाला !

डोळे पुशीत पुशीत मोतीराणी आपल्या मेण्याकडे निघाली. मेहेरजानहि तिला पोंचवित पोंचवित बाहेर आली. मोतिबिबि मेण्यांत बसतांच भोई चालूं लागले. साश्रु नेत्रांनीं मोतिराणी म्हणाली " येतें मी मेहेर ! आतां आगऱ्यांत—"

मेहेरजान खिन्न अंतःकरणानें महालांत परत आली. तेथें येतांच आपल्या दासीकडून तिनें मोंगल सेनापति रहमतखांला " शहानशहांच्या दुसऱ्या हुकमाचं आतां कारण नाहीं. उद्यां सकाळीं आगऱ्याला जावयाला निघणार, नीट बंदोबस्त ठेवा—" असा निराप पाठविला.

मेहेरजानचा हा निरोप एकून वृद्ध रहमत आश्चर्यानें चक्क होऊन गेला !

═══

## प्रकरण सातवें.

### वसंतोत्सव.

बादशाही रंगमहालाचें यथायोग्य वर्णन करतांना एखाद्या प्रतिभासंपन्न, विशाल बुद्धिमत्तेच्या कवीचीही मति शिणून जाईल ! मग आमच्या लेखणीसारखी क्षिण लेखणी, क्षुद्र कार्यक्षमता, आतिशय स्वल्प, सीमाबद्ध—अस्फुट कल्पना या साधनांनीं आगऱ्याच्या बादशाही जनानखान्याचें योग्य वर्णन कसें होणार ? ' आरबी भाषेंतील सुरस गोष्टींतील रंगमहालाचें वर्णन ज्यांनीं वाचलें असेल, त्यांना विपुलैश्वर्यशाली मोंगल बादशहांच्या रंगमहालाची अस्फुट अशी कांहीं कल्पना करतां येईल. आह्माला आगऱ्यांतील रंगमहालाचें यथार्थ वर्णन करतां येणें सर्वथैव अशक्य आहे हें आह्मीं वाचकांजवळ प्रांजलपणें कबूल करतों. बादशाही जनानखान्याचा केवढा विस्तार ! तो निर्माण करण्यासाठीं किती कुबेरांचें ऐश्वर्य आणि या भरतखंडाला ललामभूत असलेल्या अशा कितीतरी शिल्पी कारागिरांचें अतुलनीय कौशल्य खर्च झालेलें ! नाना तऱ्हेचीं हिरेमाणकें आणि इतर रत्नें रंगमहाल निर्माण करण्यांत किती उपयोगांत आलीं असतील याची कल्पना देखील करतां येत नाहीं. सुवर्ण रौप्याच्या किती खाणीच्या खाणी हा जनानखाना निर्माण करण्यांत आणि त्याचें भरणपोषण चालविण्यांत गडप झाल्या असतील कोण जाणे ! आजपर्यंत पृथ्वीवरील निरनिराळ्या देशांत अनेक कविश्रेष्ठ व विख्यात कादंबरीकार होऊन गेले आहेत. त्यांनीं आपापल्या काव्यांतून आणि कादंबऱ्यांतून अनेकविध सुंदर सुंदर नायिकांचीं वर्णनें केलीं आहेत तीं वर्णनें ज्यांना अक्षरशः लागू पडतील अशा अनेक तरुण रूपसुंदरी बादशाही रंगमहालाला आपल्या वास्तव्यानें सदासर्वदा वसन्तशोभा अर्पण करीत होत्या! या सुंदरी अरबस्तान, इराण वगैरे निरनिराळ्या देशांतून आणलेल्या होत्या. राजांना राणी शोभण्यासारख्या असंख्य सुंदर दासी रंगमहालांत वास्तव्य करणाऱ्या या रूपसुंदरींची सुश्रूशा करण्यासाठीं नियुक्त झाल्या होत्या. सर्व पृथ्वीवरील राजांत सर्वांत विलासी असे जे मोंगल बादशहा त्यांचे रंगमहाल निर्माण करण्यांत आणि त्यांना शृंगारण्यांत किती तरी कारागिरांचीं आयुष्यें खर्च झालीं होतीं. रंगमहाल निर्माण करण्यांत बादशहांनीं श्रमाकडे, कौशल्याकडे आणि पैशाकडे बिलकूल पाहिलें नव्हतें ! अशा रंगमहालाचें यथार्थ वर्णन आमच्यानें का होणार आहे ?

आगऱ्याच्या रंगमहालांतील एका दालनांत वसन्त पौर्णिमेनिमित्त आज अनेक रूप सुंदरींचा समुदाय जमला होता. या सुंदरींना ' असूर्यंपश्या ' हें विशेषण अगदीं अक्षरशः लागू पडण्यासारखें होतें ! बादशाही जनानखान्यांत प्रवेश झाल्यापासून या रमणींचीं मुखकमलें सूर्यनारायणाच्या कधींहि दृष्टीस पडलीं नव्हतीं, असें ह्मटलें असतां अतिशयोक्तीचा दोष येणें फारसें संभवनीय नाहीं ! रसिकांच्या नेत्रांना आनंद देणारें विस्तृत नील नभोमंडल मोकळेपणें त्यांच्या कधीं दृष्टीस पडलें नव्हतें. रमणीय सृष्टिसुंदरीचे खुलें मनोहर रूप त्यांना कधीं पहावयास सांपडलें नव्हतें. आपल्या मधुर हसण्यानें सृष्टीला हसविणाऱ्या भगवान् रजनीनाथानें आपल्या शी-

तल करांनीं त्यांचीं मुखमंडलें मोकळेपणानें कधींहीं कुरवाळलीं नव्हतीं ! महालाच्या वातायनांच्या द्वारानें येणारा नाना तऱ्हेच्या पुष्पांच्या सुगंधानें दरळवलेला मलयसमीरणच काय तो नाहीं ह्मणावयाला त्या सुंदरींच्या सुंदर मृदु केशगुच्छांशीं क्रीडा करीत असे. परंतु हें सुखहि त्या पंजरबद्ध युवतींना कांहीं फुकटचें मिळत नसे ! त्याबद्दल त्यांना भरपूर किंमत द्यावी लागे. त्यांच्या सुगंधि निश्वासांची चोरी करून वायु आल्या वाटेनें परत जाऊन बाहेरच्या उद्यानांतील पुष्पांच्या सुगंधांत त्यांना अचुक सोडून देई ! कधीं कधीं त्या सुंदरींजवळच्या गुलाब, इस्तंबूल वगैरे अत्यंत सुगंधि द्रव्यांचा मधुर सौरभहि तो हरण केल्याशिवाश रहात नसे !

त्या रूपसुंदरींचा मेळा आज ज्या महालांत जमला होता, तो अगोदर फारच रम्य होता. त्यांतूनही आज तो विशेष रीतीनें शृंगारला असल्यामुळें त्यांची शोभा फारच रमणीय दिसत होती. नाना प्रकारच्या कृतिम हिरव्याचार लतापल्लवांनीं भूषविलेल्या त्या विस्तीर्ण महालांत मधून मधून लहान लहान लहान फुलझाडांच्या कुंडया ठेविल्या होत्या. त्या झाडावर सुवर्णाच्या चौकटींत बसविलेले, निरनिराळ्या आकृतींचे लहान लहान बिलोरी आरसे मधून मधून लटकावले होते. त्यांत तेथें लाविलेल्या असंख्य दीपांची प्रतिबिंबें पडून सर्व महाल नुसता दीपमय झाल्याचा भास होई ! या स्तंभावरून त्या स्तंभावर फुलांच्या माळांच्या झालरी सोडण्यांत आल्या असून त्यांच्यांत मध्यें मध्यें मौक्तिकांनीं खचलेल्या लाल, निळ्या, पिरोजी, गुलाबी, बदामी इत्यादि नाना तऱ्हेच्या रंगाच्या लहान लहान पताका फडकत होत्या. त्या पताकांपैकीं एखादीवर हाफिज कवीच्या प्रणय—काव्यांतील एखादा चरण, दुसरीवर फर्दुसी कवीची लहानशी तेजोमय कविता, तिसरीवर अमीर खुसरूचा प्रेममय चुटका, चवथीवर गुलेस्तानमधील बहुमूल्य उपदेशाचा लहानसा फटका सुंदर लखलखीत अक्षरांनीं लिहिलेला होता. कोठें कोठें स्वर्णपात्रांत नागकेशराचे गुच्छ ठेवण्यांत आले होते; मधून मधून सुवर्णाचें नक्षीदार काम केलेल्या रौप्यपात्रांत गंधराज आणि गुलाब यांच्या राशीच्या राशी पडल्या होत्या. कोठें कोठें वाघाचें मुख असलेल्या सुवर्णाच्या कारंजामधून मधुर शीतल गुलाब पाण्याचे फवारेच्या फवारे उडत होते. सारांश, स्वर्गीय सुगंधाचें भांडारच तेथें खुलें झालें होतें, असें ह्मटलें तरी चालेल. मध्यें मध्यें सुवर्णाच्या दांड्यावर बसून मृदंग, भीमराज, पापिया, पोपट, मैना, काकाकुवा इत्यादि अनेकविध पक्षी स्वच्छंदानें किलकिलाट करीत होते.

महालाच्या मध्यभागीं फारसें मोठें नाहीं, व फारसें लहानहि नाहीं, असें एक मध्यमाकृति संगमरवरी दगडांचें कारंजें होतें. त्यांतून निरनिराळ्या रंगाच्या पाण्यांचे फवारे उडत होते, ते पाहून संतप्त हृदयहि शांत होत असे. त्यावेळीं वसंतऋतु सुरू होता. प्रखर ग्रीष्मापासून होणाऱ्या त्रासाची शांति करण्यासाठीं कांहीं सुंदरी त्या कारंजाच्या कांठीं बसून आपल्या कोकिलातुल्य कंठांनीं मधुर आलाप घेत होत्या; कांहीं प्रेममय पद्यें गुणगुणत होत्या. व कांहीं रमणी कारंजाच्या खालच्या शीतल संगमरवरी दगडी चबूतऱ्यावर आपल्या ‘ अलसलुलित ’ देहांचा भार टाकून खुषाल गायन ऐकत

पडल्या होत्या व जणूकाय हाताला कांहीं तरी काम पाहिजेच या हेतूनें आपल्या वेटाळें घालुन बसलेल्या सर्पिणीप्रमाणें शोभणाऱ्या काळयाकुट्ट वेण्यांतून गुलाबाच्या पाकळ्या मधुन मधून कारंजाच्या पाण्यांत फेंकीत होत्या. कारंजाच्या पाण्याच्या हेलकाव्यांनीं त्यांच्या हृदयालाहि हेलकावे मिळत होते! कांहीं सुंदरी नुसत्या गप्पाष्टकांतच अगदीं दंग होऊन गेल्या होत्या. त्यांना गायनाची विशेष गोडी नव्हती ह्मणा किंवा गायनापेक्षां त्यांना गप्पांतच विशेष गोडी वाटत असल्यामुळें ह्मणा, त्यांचें इतर रमणींच्या गायनाकडे मुळींच लक्ष्य नव्हतें. कांहीं सुंदरी हीं गप्पाष्टकें ऐकत खुशाल पडल्या होत्या. गायनाच्या रंगांत निमग्न झालेल्या सुंदरी या रमणींना पक्क्या अरसिक समजून त्यांना तिरस्कारानें हसत होत्या! कांहीं ललना मैना, पोपट, काकाकुवा इत्यादि पक्ष्यांशीं खेळण्यांत गुंग होऊन गेल्या होत्या.

आगऱ्याच्या राजप्रासादांतील रंगमहालांत त्या रात्रीं खरोखर सौंदर्याचें प्रदर्शनच भरलें होतें असें ह्मटलें असतां चालेल. ती वासन्ती पौर्णिमेची रात्र! या पौर्णिमेच्या उत्सवानिमित्तच आज इतक्या सुंदरी या महालांत एकत्र जमल्या होत्या. महालाच्या उघडया खिडक्यांतून मधून मधून पूर्णकलायुक्त चंद्राचे पिठासारखे पांढरे शुभ्र किरण आंत पडल्यामुळें महालांत लाविलेल्या चित्रविचित्र दीपावलीच्या प्रकाशांत हा एक निराळाच नैसर्गिक प्रकाश मिसळून गेला होता! दीपावलीच्या मिश्र रंगाच्या प्रकाशांत महालांत जमलेल्या सुंदरींची मुखमंडलें अधिकच उज्वल दिसत होतीं. हा सर्व देखावा सत्य सृष्टींतला नसून स्वप्न सृष्टींतील होय. असा एखाद्यास भास होण्यासारखा होता. आपल्या अतुल रूपप्रकाशानें चमकणाऱ्या या सौदामिनी या कलंकित पृथ्वीवरील नसून स्वर्ग लोकच्याच असाव्या! त्या वासन्ती पौर्णिमेच्या रात्रीं महालाच्या बाहेरील उपवनांतील प्रस्फुटित किंवा अर्धविकसित कलिकावृंद मलयसमीराच्या एखाद्या मृदुशीतल झुळकेनें ज्या प्रमाणें आनंदानें बेहोष होऊन जाई त्याप्रमाणेंच या सुंदरींहि—कोण जाणें कां तें—मधून मधून आनंदानें अगदीं बेहोष होऊन जात व त्यांच्या हास्याच्या प्रचंड ध्वनीनें सारा महाल हादरून जाई!

या महालांतील सर्व सुंदरी दिल्लीश्वर जहांगीशहाच्या आदरास्तव अगदीं भुकेलेल्या होत्या. बादशहाच्या प्रेमाचीच त्यांना भिक्षा पाहिजे होती! वासन्ती पौर्णिमेनिमित्त शहानशहा आज रात्रीं येथें येऊन आपला आदर करतील, आपल्यावर प्रेमाचा वर्षाव करतील आपल्याशीं प्रेमालाप, हास्यविनोद करून आपणाला सर्व सुंदरी समुदायांत धन्य करतील, निदान शेवटीं, आपणाकडे आज शहानशहा एखादा तरी प्रेमकटाक्ष फेंकतील, या आशेनें तेथील प्रत्येक रमणीचें हृदय आज उत्तेजित होऊन गेलें होतें. वर्षांवर्षांत एखादा दिवसहि आपल्या प्रिय पतीचें दर्शन न घडलेल्या अनेक बेगमा केवळ दिल्लीपतीच्या दर्शनाच्या लालसेनेंच आज तेथें जमल्या होत्या. कांहींजणीं आपल्या करुण कहाणी बादशहाला सांगण्यासाठींच तेथें आल्या होत्या. आपल्या सवतींवर जडलेलें आपल्या प्रियकराचें मन कांहीं तरी युक्ती करून आपण आज आपणावर खास ओढून घेऊं या आशेनें किती तरी बेगमा आज तेथें आल्या होत्या. परंतु दैव तरी किती निष्ठुर पहा! एखादी प्रबल आशा

आपण मनांत धरून, केवळ तिच्यावरच आपण सारी भिस्त ठेवून राहिलों, कीं, दैव तेथें आडवें यावयाचेंच! त्याप्रमाणें तेथेंहि घडून आलें. बादशहा येण्याची वेळ केव्हांच टळून गेली. सर्वजणींचें लक्ष महालांतील दरवाजाकडे लागून राहिलें होतें. या स्थितींत एक घटका गेली, दोन गेल्या, चार गेल्या—बादशहाचा कोठें ठिकाणा नाहीं! महालांत चाललेलें गाणें, गप्पाष्टकें, हास्यविनोद हळुहळू सारीं बंद होत आलीं. या स्थितींत जाणारें एक एक पळ बेगमांना अतिशय कंटाळवाणें वाटूं लागलें. तरीहि दिल्लीश्वराचा कोठें पत्ता नाहीं! बरें, 'आज वसन्त-मेळ्याला मी येत नाहीं.' असाहि त्याच्याकडून निरोप येईना. बिचाऱ्या सर्व रमणी अगदीं मेटाकुटीस येऊन गेल्या. तेथून जावें तरी पंचाईत, न जावें तरी पंचाईत अशी त्या बिचाऱ्यांची अनुकंपनीय स्थिति होऊन गेली. आपण कंटाळून येथून गेलें आणि दैवयोगानें शहानशहांची स्वारी मेळ्याला आली तर आपण मात्र सर्व सुखाला आंचवूं; आपले हेतु साध्य न होतां, इतरांचे मात्र होतील असा विचार करून जी ती बेगम तशीच टेंक धरून महालांत बसली होती व जाणारें एक एक पळ कसें तरी कंठित आपल्या दुर्दैवाला दोष देत होती!

अशा स्थितींत बराच वेळ गेला. रात्र सरून पहाटेचा अंमल व्हावयाला आला. महालाच्या उघडलेल्या खिडक्यांतून डोकावणारे चंद्रकिरण हळु हळू म्लान होत आले! जणुं काय सुंदरींच्या मुखमंडलाबरोबर चंद्रहि निराशेनें म्लान होऊन गेला होता! महालांत टांगलेल्या पुष्पमालांचा मनोहर सुगंध कमी कमी होत आला! कोमल सरस पुष्पकलिका हळु हळू नीरस होऊं लागल्या! सुवर्णाच्या पिंजऱ्यांत व सुवर्णाच्या दांड्यांवर असलेले शुकसारिकादि पक्षी आपली किलबिल बंद करून निद्रेनें अगदीं मरगळून गेल्यामुळें स्वस्थ बसले होते! लतिकावरील सुंदर सुंदर पुष्पें कोमेजुन जाऊन खालील गालिच्यावर पडूं लागलीं. तरीहि जहांगीराचा कोठेंहि पत्ता नाहीं, आतां वसन्त-मेळ्याला यावयाचा बादशहाचा वेळ खास टळून गेला असें आपसांत ठरवून निद्रावश होऊं पहाणाऱ्या बेगमा निराशहृदयानें आपापल्या महालाकडे चालत्या झाल्या आजच्या सारखा निराशेचा प्रसंग त्या बिचाऱ्यांवर कधींहि आला नसेल! सर्व रमणी बादशहाला दोष देत तेथून निघून गेल्या खऱ्या तरीहि तेथें शेवटपर्यंत दोघीजणी रहतां राहिल्याच! एक सोफिया बेगम व दुसरी इराणची नूतन सौंदर्यशालिनी बेगम पियारी!

पियारी बेगम जागरणानें व हसण्याखिदळण्याच्या श्रमांनीं फारच क्लान्त होऊन गेली होती. तिनें प्राशन केलेल्या वारुणीची निशा या वेळीं तिला फारच चढली होती. नेत्र अगदीं धुंद होऊन गेले होते. शरीरांत—विशेषत: नेत्रांत—फार चंचलता आली होती. स्वर जड होऊन गेला होता. सर्व रमणीवृंद महालांतून निघून गेल्यावर स्खलन पावणाऱ्या पायांनीं, हेलकावे खात खात ती मध्यभागीं असलेल्या कारंजाच्या हौदाच्या काठाशीं येऊन बसली. तिच्या मागोमाग सोफिया बेगमाहि तिच्या शेजारीं येऊन बसली. सोफियाचा चेहरा आज आनंदानें विशेष खुललेला दिसत होता. तिच्या अधरोष्ठांवर मृदु हास्य विराजमान झालें होतें. पियारी बेगमेप्रमाणें सोफिया

आज मद्यासवानें तुंद होऊन गेलेली दिसत नव्हती.

जवळ बसलेल्या सोफिया बेगमेच्या खांद्यावर हात टाकून पियारी ह्मणाली " सोफिया ! गडे, मला आणखीं एक प्यालाभर सिराजी दे पाहूं. मेली किती प्यालें तरी तृप्ती ह्मणून कशी ती होतच नाहीं ! सिराजी भरून देण्याचं-दासीचं-काम तुला सांगितलं ह्मणून मजवर रागावूं नकोस हो गडे ! इथं कुणी लंवडी नाहीं, ह्मणून तुला हें काम सांगितलं !"

" रागावायचं काय त्यांत पियारी ? एकमेकींसाठीं एकमेकींनीं अशीच तसदी घेतली पाहिजे—नाहीं तर आह्मी बहिणी बहिणी कसल्या ? " सोफिया हसत हसत ह्मणाली.

दुसरा एखादा प्रसंग असता तर सोफियाला पियारीच्या विनंतिचा खरोखर राग आला असता व असें दासीजनाला योग्य असणारें काम करायाला ती कधीं उठलीहि नसती ! परंतु आजचा प्रसंग निराळा होता आज पियारीजवळ तिचें कांहीं काम होतें. पियारी जवळून तिला कांहीं एक गोष्ट आज करून घ्यावयाची होती. शोधतां शोधतां आज सोफियाला अशी नामी संधी सांपडली होती. शिवाय, सिराजीनें पियारी जितकी गाफील होऊन जाईल तितकें सोफियाच्या पथ्यावरच पडणार होतें. याच उद्देशानें आज रात्रीं अतिशय आग्रह करकरून सोफियानें पियारीला सिराजीचे प्यालेच्या प्याले विण्यास लाविलें होतें. आपलें काम नीट व्हावें ह्मणून आजच्या वसन्तोत्सवांत सोफियेनें मद्याला स्पर्शही केला नव्हता, असें ह्मटलें तरी चालेल. सोफियाचा उद्देश आज पूर्णपणें सिद्धीस गेला. पियारी सिराजीनें बेहोष होऊन गेली !

पियारीच्या विनंतीप्रमाणें सोफिया उठणार, इतक्यांत पियारी पुनः अडखळत अडखळत ह्मणाली " दे गडे, दे मला एक प्यालाभर सिराजी—गळ्याला फार शोष पडला आहे—"

" जरा क्षणभर थांब—ही मी सिराजी घेऊन येतें. "

असें ह्मणून सोफिया उठून महालाच्या एका कोपऱ्यांत गेली. तेथें ठेवलेल्या सिराजीच्या सुरईतून सुवर्णाच्या एका लहानशा प्याल्यांत तिनें सिराजी ओतून घेतली व पियारीजवळ येऊन तिनें तो प्याला तिच्या ओठाशीं धरला.

इतक्यांत कांहीं आठवण होऊन पियारीनें विचारलें " पण यांत गुलाब इस्तंबूल कांहीं घातलं आहेस का सोफिया ? "

" नाहीं—विसरलें. "

पुनः सोफिया उठली. कपाळाला आंठ्या घालून तिनें त्या सुवर्णचषकांत थोडें गुलाबपाणी ओतलें, थोडा इस्तंबूलहि मिसळला तो प्याला पियारीच्या तोंडाशीं धरतांच एका सपाट्यास तिनें आंतील सिराजी पार केली ! सोफिया हास्यमुखानें तिकडे पहात राहिली.

याप्रमाणेंच सोफिया बेगमनें भरून दिलेले सिराजीचे दोन तीन प्याले पियारीनें हां हां ह्मणतां उडविले. हळुहळु ती अगदीं खुलून गेली. तिच्या मुखमंडळावर हास्य विलसूं लागलें. तिच्या हृदयावर नेहमीं जो एक प्रचंड पाषाणाचा जड भार होता, तो क्रमाक्रमानें नाहींसा झाला. तिची अन्तर्वृत्ति अत्यंत प्रसन्न झाली ! तिच्या हृदयांत अपूर्व स्फूर्ति उत्पन्न झाली !

एक दीर्घ निःश्वास टाकून पियारी स्वतःशींच पुटपुटली " काय करावं बरं ? खास येतों असं सांगून शेवटीं स्वारी आली नाहीं ती नाहींच ! अजनहि येईल का स्वारी ? छेः ! आतां कसली आशा ! ' वसन्तोत्सवांत तुझं गाणं मनसोक्त ऐकायाचं, बरं का पियारी ! असं मला नुकतंच ह्मणायचं झालं होतं-झालं वाटतं त्याचं विस्मरण ! मेला पुरुषांचा स्वभावच का असा विसराळु ? नाहीं तर काय आज नामी संधि आली होती ! गाण्यानं खाविंदांना आज अगदीं प्रसन्न करून टाकलं असतं ! छेः अगदीं वाईट गोष्ट झाली. "

पियारीचे हे शब्द अस्पष्टपणें सोफियाच्या कानांवर गेल्याशिवाय राहिले नाहींत. ती विषादपूर्ण हृदयानें स्वतःशींच ह्मणाली " असं का बाईसाहेब ! आज मोठा डाव साधून आह्मा सर्वांवर मात करावयाचा तुझा विचार होता तर ! पण आमच्या सर्वांच्या नशीबानं तो फसला ह्मणायचा ! परमेश्वर करो अन् तुझे सर्व डाव असेच फसोत ह्मणजे झालं ! नाहीं तर आम्हा सर्वांचं वाटोळें करायला तूं कधींहि चुकयची नाहींस ! शहानशहानीं इराणहून तुला इथं नाहीं आणून ठेवलं, तर एका अत्यंत जहाल विषारी नागिणीला आणुन ठेवलं असं, ह्मटलं पाहिजे. परमेश्वराच्या कृपेनं रंगमहालांतून कधीं एकदा तुझी धिंडका निघेल ती खरी ! "

नंतर पियारी बेगमला उद्देशून ती ह्मणते " पियारी—"

" काय गडे ? काय ह्मणतेस ? "

" आतां शहानशहा कांहीं येत नाहींत. ती आशा आपणाला आतां सोडून दिली पाहिजे. आजची वासन्ती पौर्णिमा ! अशी ही नेहमीं न येणारी वासन्ती पौर्णिमेची रात्र मेली कंठायची तरी कशी गडे ? "

पियारीनें उत्तरादाखल एक दीर्घ निःश्वास सोडला. बराच वेळ ती खाली मान घालून स्तब्ध बसली होती.

सोफियानें पुनः विचारले " पियारी ! तूं अशी स्तब्ध कां ? मी काय विचारलं इकडे तुझं लक्ष्यच का नव्हतं मुळीं ? ही वासन्ती पौर्णिमेची रात्र अशीच का कंठायची आह्मी ? "

" त्याला आतां काय इलाज सोफिया ? स्वारीनं शेवटीं आह्मांला फसविलं यांत शहानशहांशिवाय दोष तरी द्यायचा कुणाला ? मला बीन तरी आणून दे. ह्मणजे शहानशहाऐवजीं तुलाच माझं गाणं ऐकवितें. गायनांत आपण ही रात्र कंठूं ह्मणजे झालं ? "

" छः गडे ? अशा वेळीं तुझं गाणं अन् बीन का गोड लागणार आहे ? स्वारींची गोष्ट आपली निराळी होती. संगीताला तरी वेळ अवेळ पहावी लागतेच की नाहीं ? "

" बरं तर मग काय करायचं ? "

" तें राहूं दे सारं ! पण काय ग- पियारी ! सरकार स्वारी आज वसन्तोत्सवाला कां बरं आली नसेल ? हळूच लपून छपून स्वारी मेहेरजानच्या महालाकडे तर नसेल गेली ? "

" अशक्य ! अगदीं अशक्य ! "

" कां बरं ? "

" ती गोष्ट मुळींच संभवनीय नाहीं. तिकडचा रस्ता शहानशहांना अजिबात बंद झाला आहे, हें नाहीं का तुला ठाऊक सोफिया ? "

" नाहीं बाई ! मेहेरकडचा रस्ता स्वारीला बंद कां ह्मणुन ? " सोफियानें बळेंच आश्चर्यमुद्रेनें विचारलें.

पियारी हसत हसत ह्मणाली " कां ह्मणून ! अग तें सारं माझं कसब ? त्या मेलीचा सर्वनाश मीं पूर्णपणें करून टाकला आहे ! "

तूं मेहेरचा सर्वनाश केलास ! काय ? पियारी ? तूं ह्मणतेस तरी काय हें ? "

" होय. या पियारीनेंच तिचा सर्वस्वी घात केला. हें सांगायला मला मोठा अभिमान वाटतो ? "

" तूं तिचा सर्वनाश केलास ? तो कां ह्मणून पियारी ? त्या बिचारीनें तुझा अपराध तरी काय केला होता ?"

या वेळीं पियारीचें मस्तक सिराजीनें पूर्णपणें चढून गेलें होतें. तिची सर्व सारासार विचारशक्ति या वेळीं अगदीं नाहींशी झाली होती. तिचा दिल या वेळीं पूर्णपणें खुलून गेला होता. या वेळीं सोफियाशीं अमुक गोष्ट सांगूं कीं नको, अमुक रहस्य तिच्यापाशीं सांगणें इष्ट, कीं, अनिष्ट हा विचार तिच्या हृदयाला बिलकूल शिवला नव्हता. !

ती गर्वोद्धत स्वरानें ह्मणाली "तिनें माझा अपराध काय केला होता ? पण मी कुठें ह्मणतें, कीं, माझा तिनें कांहीं अपराध केला होता ह्मणून ?"

" तर मग ?"

" तर मग काय ? मेहेरनें माझा कांहीं अपराध केला नाहीं. ती अपराधी नाहीं--पण तिचें सौंदर्य अपराधी आहे ! मेहेर बिलकूल अपराधी नाहीं—पण जहांपनाहांचे डोळे अपराधी आहेत ना ? इराणाहून मी नुकतीच आल्यापासून सरकारस्वारीकडून माझा जो आदरसन्मान होत होता, मजवर स्वारीचें जें प्रेम बसलें होतें, त्यांत ती अवदसा तिच्या अप्रतिम सौंदर्यामुळं कांटा होणार हें मला कळून दिखिल का तिचा मी नाश करूं नये सोफिया ?"

पियारीचें हें भाषण ऐकून सोफियाच्या अंगावर काटाच उभा राहिला. वरून अतिशय सुंदर दिसणाऱ्या पियारी बेगमेचें अंतःकरण इतकें काळेंकुट्ट असेल अशी तिची कल्पना नव्हती !

कांहीं वेळ दोघीजण स्तब्ध बसल्या होत्या. थोड्या वेळानें सोफियानें पियारीला विचारलें " तूं मोंगीरला कशालाग गेली होतीस पियारी ?"

" डोंगराळ प्रदेशाच्या हवेनं मला गुण येईल असं हकीमांनीं सांगितल्यावरून सरकारांनीं मला तिकडे धाडलं होतं. मला मध्यंतरीं बरं वाटत नव्हतं हें नाहींका तुला माहीत ?"

सोफिया हसून ह्मणते " तें आहेग सारं मला ठाऊक ! पण मोंगीराहून दासीचा वेष घेऊन तूं वर्धमानाला कशाला गेली होतीस ? का दासी बनून वर्धमानची हवा खायला दिखिल तुला हकीमांनीं किंवा जहांपनाहांनीं सांगितलें होतं ?"

सोफियाचे हे शब्द ऐकून पियारी चमकली ! तिचें हृदय भीतीनें धडधडूं लागलें. आपली आतां धडगत नाहीं असें वाटून तिचा मुखचंद्र निस्तज झाला.

शुष्क कंठानें पियारीनें सोफियाला विचारलें " तुला ग हें कसं कळलं, सोफिया "

सोफिया बळेंच क्रुद्धभाव दर्शवून तिला ह्मणाली " छेः छेः गडे ! हें अगदीं वाईट बरं ! मजवर देखील का तुझा इतका अविश्वास ? मग मला आपली प्राणांची सखी

ह्मणतेस तें कशाला ? माझ्याशीं तर मग तूं कपटानंच वागत असतेस ह्मणायची! ठीक ! टीक !"

पियारी घाबरून ह्मणाली "छेग ! तसं नव्हे गडे ! खरंच तूं माझ्या जिवाची सखी आहेस;–"

सोफिया मध्येंच रागानं ह्मणते "आहे टाऊक सारं ! तूं स्वतःच ही सारी हकीकत मला एक दिवस नव्हती का सांगितलीस ?"

पियारीच्या मुखावर हास्य दिसूं लागलें. ती हसत ह्मणाली "मला क्षमा कर गडे ! अलीकडे माझं मन असं भरकटून गेलं आहे, कीं, कांहींहि गोष्ट आतांशीं माझ्या ध्यानांतच राहीनाशी झाली आहे!"

"तर मग तूं वर्धमानला कां गेली होतीस तें सांग."

"अग हें पहा, दासीच्या वेषानं मी जर वर्धमानला गेलें नसतें, तर इतक्या लवकर अन् इतक्या सहज रीतीनं माझं कार्य सिद्धीस गेलं असतं असं वाटतं का तुला?"

"कसलं आलं आहे तुझं काम ?"

"मेहेरचा सर्वनाश !"

"तो तुला कसा करतां आला बरं ?"

"शहानशहांच्या वक्षःस्थलावर मी लत्ताप्रहार करीन, असं मेहेर वर्धमानांत आपल्या प्रिय सखीजवळ–मोतीराणीपाशीं–ह्मणाली होती, हेंहि मीं तुला एकदा सांगितलं आहे, असं मला आतां आठवतं; होय ना?"

"होय; असं कायसं तूं मला सांगितलं असावंस असं मला आठवतं खरं."

"झालं तर ! ती लत्ताप्रहाराची गोष्ट चांगलं तिखट मीठ लावून मी शहानशहांना सांगितली. दुसऱ्याहि अशाच कांहीं मेहेरबद्दलच्या गोष्टी मी स्वारीला कळविल्या."

"हो का ? मग स्वारी काय ह्मणाली ?"

"लत्ताप्रहाराबद्दलची गोष्ट ऐकून स्वारीच्या अंगचा नुसता तिळपापड होऊन गेला ! मानी भारतेश्वर असल्या बटकुराचे असले अपमानास्पद शब्द का मुकाट्यानं ऐकून घेणार आहेत ?"

"तरी कांहीं स्वारीचा मला विश्वास येत नाहीं. शहानशहांचं मन ह्मणजे समुद्रावरचा वारा ! कधीं झंझावाताच्या रुपानं वहावयाचा–तर कधीं अगदीं शांत–कुठं त्याचा अगदीं मागमूस देखिल नसायचा !"

"मला नाहीं तसं वाटत–अन् स्वारीचं मन [illegible] चंचल असलं तरी त्या अवदसेबद्दल [illegible] कांहीं तिकडचं मन फिरायचं नाहीं [illegible]स !"

"पण स्वारीचं हें वर्तन कुणालाच [illegible] नाहीं. मेहेर इथं आल्यापासून ज्या [illegible]तींत दिवस कंठित आहे, त्या स्थितीचं [illegible] ऐकलं ह्मणजे पाषाणाला देखील [illegible]र फुटतील ! मग आपण तर काय [illegible]च आहों. एखाद्या क्षुद्र दासीला इथं [illegible]मान असतो, तो देखील त्या बिचारीला [illegible]त नाहीं ह्मणे ! शेरखानासारख्या [illegible]वशाली उमरावाची ती पत्नी, परंतु दैव [illegible]ल्यामुळं बिचारीची काय स्थिति झाली [illegible] पहा ! परमेश्वर करो अन् स्वारीचं मन मेहेरबद्दल लवकरच विरघळो !"

"हो, परमेश्वर कांहीं इतका तुझ्यासारखा वेडा नाहीं बनला अजून !"

पियारी मानवीस्त्रीरूपानें सैतानीच अवतरली आहे अशी सोफियाची पुरी खात्री झाली ! खरोखर राक्षसाचें किंवा सैतानाचें तरी हृदय इतकें कठिण असेल किंवा नाहीं, याची तिला शंकाच आली. तो विषयच बदलण्याच्या हेतूनें सोफि-

यानें पियारीस विचारलें, " पण मी ह्मणतें याला एक पुरावा आहे. मेहेर इथें आल्यानंतर दुसरेच दिवशीं गुप्तपणें तिच्या महालाकडे गेली नव्हती का स्वारी ? "

विकट हास्य करून पियारी ह्मणाली:— " होय, स्वारी तिला भेटायला गेली होती. परंतु, तिकडे गेल्यावर स्वारीचं स्वागत कसं छान झालं तें नाहीं का तुला ठाऊक ? ती चांडाळीण नुसती उठून उभी दिखील राहिली नाहीं. गर्वानं ती स्वारीशीं दोन शब्दही बोलली नाहीं ! मेहेरबद्दल मी ज्या गोष्टी तिकडे कळविल्या होत्या, त्या अगदीं खऱ्या असल्याबद्दल स्वारीची ताबडतोब खात्री होऊन चुकली. मेहेरचा हा अहंकार आणि दर्प जहांपनांहांना बिलकुल सहन झाला नाहीं. स्वारीनं पुनः तिचं कधीं मुखावलोकनही केलं नाहीं. बोलतां बोलतां या गोष्टीला एक वर्ष झालंच ह्मणावयाचं ! "

आग्र्याच्या राजप्रासादाच्या सिंहद्वारावरील देवडीवरून उषःकालचा नगारा सुरू झाला. पियारी तेथेंच मदिरेच्या धुंदींत लवंडली. एका दासीला हांक मारून पियारीची व्यवस्था तिजवर सोंपवून, सोफिया आपल्या महालाकडे निघून गेली.

## प्रकरण आठवें.

### पिंजऱ्यांतील पक्षीण.

भवितव्य ! खरोखर, भवितव्य ही एक मोठी विलक्षण शक्ति आहे. त्या शक्तीच्या पाशानें एकूण एक मनुष्यप्राणी—केवळ मनुष्यप्राणीच नव्हे, तर देवगंधर्व, पशुपक्षी, स्थिरचर—फार काय, सारें विश्व दडपून झालें आहे ! दैव श्रेष्ठ, कीं प्रयत्न श्रेष्ठ, हा वाद पुरातन काळापासून सर्व राष्ट्रांत—सर्व देशांत, सर्वकालीं चालत आला आहे. परंतु त्याचा समाधानकारक निकाल होणें शक्यच नाहीं ! प्रयत्नवादी तत्वज्ञमंडळ उच्चकंठानें प्रयत्नाच्या श्रेष्ठत्वाचें कितीही समर्थन करो, त्यांचा तत्ववाद सर्वसाधारण लोकांना फारसा रुचत नाहीं व पटतही नाहीं ! उलट, कधीं कधीं असे चमत्कारिक प्रसंग येतात, कीं,या तत्वज्ञमंडळालाही दैवाचें श्रेष्ठत्व, नाइलाजानें कां होईना, पण कबूल करावें लागतें ! प्रयत्नतत्व श्रेष्ठ असो,कीं दैवतत्व श्रेष्ठ असो, दैववादानें मनुष्याच्या मनाचें समाधान होतें, ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. भवितव्याचें सामर्थ्य अगाध आहे, त्यापुढें मानवी प्रयत्नांचें कांहींही चालावयाचें नाहीं, या समजुतीमुळें मनुष्याला पंगुता येते ही गोष्ट जितकी खरी आहे, तितकीच, या समजुतीनें त्याच्या मनाला एक प्रकारचें समाधान असतें ही गोष्टही खरी आहे. आमच्या नायिकेची स्थिति अशीच झाली होती.

मनुष्याच्या अदृष्टाच्या मागें लपून राहून कोणाच्याही नकळत अत्यंत गुप्तपणानें भवितव्य आपल्या अलक्षित हस्तानें अत्यंत अस्पष्ट अक्षरांत त्याच्या ललाटीं काय लिहून ठेवीत असतें, हें जर त्याला कळण्याचा कांहीं मार्ग असता तर मानवी प्राण्याला दुःख असें कधींच भोगावें लागलें नसतें ! या मृत्युलोकाचें दारुण भीषण रूप बदलून जाऊन त्याचा स्वर्ग बनला असता; झोंपड्यांचे राजवाडे झाले असते; साऱ्या पृथ्वीवर करुण क्रंदन, हृदयविदारक आर्तनाद, शोकाच्या कर्णकठोर आरोळ्या, यांचा कोठें मागमूसही लागला नसता ! " तेव्हां गंधर्वमुखीं जिकडे तिकडेहि

तननन तननम्!" या मयूरकवीच्या आर्याघोंनेंच जगतावरील मधुरानंदाचें सदा सर्वदा कविवरांना वर्णन करावें लागलें असतें. मनुष्याच्या कल्पनांनीं अतिशय सुंदर, नयनरम्य, मोहक व मधुर अशीं बन विलेलीं भव्य उद्यानें निराशेच्या अत्यंत तीव्र, प्रखर दवानलानें होरपळून गेलीं नसतीं!

जहांगीर बादशहाच्या हुकुमानें मेहेरउन्निसाला आग्र्याला आणावयाला मोंगल सेनापति रहमतखां व रुस्तमखां जेव्हां ससैन्य वर्धमानाला गेले होते, त्या वेळीं त्यांजबरोबर जाऊन बादशहाची पट्टराणी—समग्र भारतवर्षाची सम्राज्ञी होण्यापेक्षां—विषप्राशन करून आत्मविसर्जन करावयाला मेहेरउन्निसा तयार झाली होती. परंतु तिच्या प्रिय सखीनें—मतियानें—नानाप्रकारें तिची समजूत करून आग्र्याला जाण्याविषयीं तिचें मन मोठया प्रयासानें वळविलें हें वाचकांना ठाऊकच आहे. मोतिराणीच्या मधुर भाषणाला वश होऊन ज्या कांहीं गोष्टी मनांत आणून मेहरजान वर्धमान सोडून आग्र्याला आली, त्या सर्व गोष्टींची निष्टुर दैवानें अगदीं उलटपालट करून टाकली! मतियाच्या उत्तेजनानें मेहेरच्या मनांत ज्या कांहीं आशा उत्पन्न झाल्या होत्या त्यांपैकीं एकही आशा पूर्ण होण्याचें लक्षण आग्र्याला आल्यावर तिला दिसून येईना! तिची पूर्ण निराशा झाली! तिचें भविष्यद्गगन काळ्याकुट्ट निराशेच्या घनांनीं पूर्णपणें व्यापून गेलें. आशासूर्याचा एकही किरण त्यांतून बाहेर पडून मेहेरजानच्या हृदयकमलाला प्रफुल्ल करीना! आपल्या नशिबीं काय आहे, हें तिला आतां—आग्र्याला आल्यानंतर बऱ्याच दिवसांनीं—हळूहळू कळून येऊं लागलें. जणूं काय, एका प्रकारच्या प्रज्ञाबलानेंच तिच्या अदृष्टांतील तीं अस्पष्ट, अस्फुट अक्षरें मेहेरजानला आतां हळूहळू वाचतां येऊं लागलीं! ती वर्धमानला असतां हें पुढलें भविष्य जर तिला यत्किंचित् तरी ठाऊक असतें, किंवा मतियाला ही अदृष्टलिपी पुसटपुसट तरी वाचतां आली असती, तर आग्र्याला येऊन अशा रीतीनें जीवनभार कंठण्यापेक्षां मेहेरजाननें विषप्राशन करून प्राणत्याग केला असता आणि मोतिराणीनेंही मोठ्या आनंदानें तिच्या ओठांशीं त्या जहरी विषाचें पात्र धरलें असतें! परंतु हाय! भवितव्य! "लिखितमपि ललाटे प्रोज्झितुं कः समर्थः" हेंच खरें!

मृतपतीच्या चिंतनानें आणि दुसऱ्या अनेक काळजींनीं ती कोमलांग सुंदरी मेहेरउन्निसा अगोदरच फार कृश आणि अशक्त झाली होती. तिची अनिंद्य कांति अगदीं लुप्तप्राय झाली, तिच्या मनाचा उल्हास पार नाहींसा झाला. त्यांतूनही आपली भावी स्थिति तिला जेव्हां हळूहळू कळून येऊं लागली, तेव्हां तर मेहेरउन्निसाची स्थिति अधिकच शोचनीय झाली! तिची कृशता अधिकच वाढली. तिच्या मादक नेत्रांतील त्या उज्ज्वल तेजाचा कोठें मागमूसही नाहींसा झाला. तिच्या एकंदर स्थितींत इतकें परिवर्तन झालें, कीं, तिची जीवाची सखी मतिया जर ह्या वेळीं येथें अकस्मात् आली असती, तर आपली प्रिय मैत्रीण मेहेर ती हीच काय, असा तिलाही भ्रम पडला असता! आणखी एके दिवशीं असा एक चमत्कार झालाच!

वर्धमानला असतां मेहेरउन्निसाच्या खास दिमतीला मरजीना नांवाची एक चतुर,

स्वामिनिनीष्ठ अशी पुष्कळ दिवसांची दासी होती, हें वाचकांस माहीत आहे. मरजीनाचें तिच्या धनिणीशी नुसतें दासीचेंच नातें होतें असें नव्हे, तर मेहेरजान तिला आपल्या विश्वासू मैत्रिणीसारखी वागवीत असे. तिची सारीं हितगुजें आणि हृदयांतील सर्व गुप्त गोष्टी मरजीनाला पूर्णपणें ठाऊक होत्या. मरजानाही अगदीं योग्य अशीच दासी होती. आपल्या धनिणीच्या यत्किंचित् दुःखानें तिला अतिशय दुःख आणि थोडयाशा आनंदानें अतिशय आनंद होत असे. मेहेरजानच्या पायांला एखादें कुसूं लागलें तर मरजिनीला अपरिमित दुःख होत असे. संकटाच्या आणि आपत्तीच्या प्रसंगीं मरजीनाचाच मेहेरच्या मनाला सर्वस्वीं आधार होता. मरजीना जर तिच्या दिमतीला नसती, आणि दिमतीला असूनही जर एखाद्या मातेची आपल्या मुलीच्या सुखसर्वस्वावर ज्याप्रमाणें प्रेमाची नजर असते, त्याप्रमाणें तिची आपल्या धनिणीवर नसती, तर मेहेरउन्निसानें केव्हांच विषप्राशन करून बेहेस्त गांठला असता—जहांगीरच्या कारकीर्दीचा हल्लीं आहे यापेक्षां कांहीं निराळाच इतिहास इतिहासकारांना लिहावा लागला असता! आणि प्रस्तुतचें कथानक वाचकांना सांगण्याकरतां आह्माला आमची क्षुद्र लेखणीही चालवावी लागली नसती!

मतियाच्या अतिशय आग्रहावरून मेहेरउन्निसा वर्धमानहून आग्र्याला आली, त्या वेळीं मरजीनाही तिच्याबरोबर आली, हें वाचकांना निराळें सांगण्याची जरूर नाहीं. आग्र्याच्या रंगमहालांत मेहेरची स्थिरस्थावर नुकती कोठें होते आहे, न होते आहे तोंच मरजीनाचा धाकटा भाऊ करीम हा अतिशय आजारी असून मृत्युशय्येवर केवळ आपल्या मातृसम भगिनीच्या दर्शनाची वाट पाहात आहे, असें मरजीनाला कळलें. बिचाऱ्या करीमला अगदीं बालपणांतच मातृपितृवियोग झाला होता. त्याचें सर्व संगोपन अतिशय ममतेनें व प्रेमानें अगदीं लहानपणापासून मरजीनानेंच केलें होतें. आपल्या लहान भावाची मृत्युशय्येवर तरी भेट घेण्याची मरजीनाला अगदीं तळमळ लागून राहावी हें अगदीं सहज आहे. दुसरा एखादा प्रसंग असता तर आपल्या धनिणीला सोडून ती या वेळीं कधींच कोठें गेली नसती; परंतु प्रस्तुतची वेळ अगदींच निराळी होती. आपल्या बंधूचें शेवटचें दर्शन घ्यावयाला जाण्याची मरजीनानें आपल्या धनिणीला साश्रुनयनांनीं परवानगी विचारली. बिचारी मेहेर तरी काय करणार? या वेळीं ती मरजीनाला नाहीं कसें ह्मणणार? अल्पावकाशांतच मरजीना आपल्या गांवीं निघून गेली.

सुदैवानें, मरजीनाच्या आर्त विनवणीचा परिणाम होऊन परमेश्वरास तिची दया आल्यामुळें ह्मणा किंवा भवितव्यच तसें होतें म्हणून ह्मणा, मरजीनाचा भाऊ त्या जीवावरच्या भयंकर दुखण्यांतून उठला. परंतु त्याला पूर्ण गुण यावयाला बरेच दिवस लागले. सुमारें सहा महिन्यांनीं मरजीना आग्र्याला परत आली.

मरजीना मेहेरच्या महालांत आली तेव्हां ती एका खिडकीपाशीं विमनस्कतेनें कांहीं विणकाम करीत बसली होती. मेहेरचें रूप—रंग—आकृति—कांति यांत सहा महिन्यांच्या अवकाशांत इतका विलक्षण फरक पडला होता कीं, मरजीनाला मेहेरची बिलकुल ओळख पडली नाहीं! आपल्या धनिणीच्या निकट परिचयाची

कोणी तरी स्त्री तिच्या महालांत तिची वाट पाहात बसली आहे असें तिला वाटलें.

त्या वेळीं मेहेरच्या इतर दासीही महालांत नव्हत्या. मरजीनानें कांहीं वेळ आपल्या धनिणीची वाट पाहिली. शेवटीं मेहेरजवळ जाऊन तिनें गंभीर स्वरानें विचारलें, "आपणाला बाईसाहेबांना का भेटावयाचें आहे ? त्या इथं नाहींत."

मेहेरनें तोंड फिरवून समोर पाहिलें तों मरजीना !

किंचित् हास्य करून मेहेर म्हणाली, "कोण मरजीना ? कधीं आलीस तूं ? बाईसाहेब कोण ? इथं कोण नाहीं ? तूं ह्मणते आहेस तरी काय मरजीना ? तुला वेड तर नाहीं लागलं ?"

मरजीनाला क्षणार्धांत धनिणीची ओळख पटली ! मेहेरचे पाय धरून त्यांवर अश्रुवर्षाव करीत मरजीना स्फुंदत स्फुंदत ह्मणाली, "कायहो बाईसाहेब आपली ही दशा !–" मेहेरनें मरजीनाला वर उचलून पोटाशीं धरलें व तिच्याबरोबर तीही नीरव अश्रु ढाळूं लागली !

* * *

शेरखानाच्या मृत्यूबरोबर आमच्या चरित्रनायिकेच्या नशिबानें पूर्णपणें उलट खाल्ली असें निदान तिला तरी वाटणें या वेळीं अगदीं साहजिक होतें. आग्र्याच्या विशाल व विपुल ऐश्वर्यशाली बादशाही रंगमहालाच्या अगदीं एकीकडल्या निर्जन भागांतील एक भिकार महाल त्या मानी स्त्रीच्या दिमतीस देण्यांत आला होता. एखाद्या मनुष्याची जगांत जितकी उपेक्षा होणें शक्य आहे, तितकी उपेक्षा तिच्या वांट्यास आली होती. तिचा सर्वत्र अनादर होत होता. मर्मवेदना आणि चिंता यांनीं तिच्या हृदयाला अगदीं जर्जर करून टाकलें होतें. तिच्या सुंदर नेत्रयुगुलाचें पाणी पार नाहींसें झालें होतें. मेहेरच्या सदासर्वदा प्रफुल्ल असणाऱ्या गंडस्थलावरील लाली नाहींशी होऊन तेथें पांडुरतेनें आपलें ठाणें कायमचेंच दिल्यासारखें वाटत होतें. तिच्या सरस ओष्ठद्वयावर आणि नेत्रयुग्मांत कालिमा पसरली होती.

सारा वेळ चिंता–दारुण चिंता ! दुसरें कांहीं नाहीं ! जणूं काय, जगांतील सर्व प्राण्यांच्या नशिबीं असलेली चिंता मेहेरच्या एकटीच्या नशिबीं या वेळीं आली होती. या भयंकर चिंतेचें भ्रमण सुरू असतां मेहरजानचा दिवस कसा ना कसा तरी निघून जाई–परंतु कांहीं केल्या दीर्घ काळरात्र मात्र सरत नसे ! दिवसां तिच्या दासींपैकीं कोणी ना कोणी तरी तिच्याजवळ असे. त्यांच्या प्रयत्नांनीं मेहेरच्या मनाचें थोडें तरी रंजन होई. बादशाही रंगमहालांत घडून येणाऱ्या अनेकविध व्यापारांपैकीं कोणत्या ना कोणत्या तरी एखाद्या व्यापारामुळें मेहेरचें मन साहजिकपणें वेधलें जाई. त्यामुळें तिच्या नकळत कां होईना–तिच्या मनाला चिंतेचा थोडा तरी विसर पडून तेवढ्यापुरती तरी तिला शांति प्राप्त होत असे. परंतु रात्रीची स्थिति अगदीं निराळी. त्या वेळीं तिच्या मनाला विरंगुळा मिळण्याला मदत होईल अशी एकही गोष्ट घडून येत नसे. उलट रात्रीची प्रत्येक गोष्ट मेहेरची चिंता शतपट वाढविण्यास मात्र कारणीभूत होत असे. रात्रीची गंभीर निस्तब्धता व घनांधकार यांनीं तिचा जीव अगदीं गुदमरून गेल्यासारखा होई ! सारी रात्र या कुशीवरून त्या कुशीवर ती सारखी तळमळत असे. परंतु

निद्रादेवी मेहेरजानवर कधीं फारशी सुप्रसन्न होत नसे. रंगमहालाच्या संगमवरी उंच पायाच्या शेजारून हलत-डुलत जाणाऱ्या यमुनेचें उन्मादयुक्त मधुरकलसंगीत ऐकत असतां उघडलेल्या खिडक्यांतून हळूच महालांत प्रवेश करणाऱ्या शीतल आणि मंद अशा पहांटेच्या वायूनें ' अंगाची होणारी लाही किंचित् शांत झाल्यावर मेहेरउन्निसाला एखादे वेळ किंचित् तंद्रा येत असे. नाहीं असें नाहीं. परंतु ती अल्पकालच ! त्या तंद्रेनें तरी मेहेरला सुख व्हावें, तर तेंहि नाहीं ! त्या तंद्रेंतच तिला चमत्कारिक स्वप्नें पडून तिच्या मनाला अधिकच अस्वस्थ करून सोडीत ! सर्व मनश्चिंतांची उपशम करणारी मात्रा जी निद्रा, तिच्यापासूनही बिचाऱ्या मेहेरच्या हृदयाला अधिकच यातना होत ! ' परमेश्वराच्या इच्छेनें कधीं कधीं अमृताचेंही विष होतें !' याप्रमाणें जागृतावस्थेंत दारुण चिंता आणि निद्रेंत चमत्कारिक स्वप्नें या कैचींत बिचाऱ्या मेहेरच्या हृदयाचे तुकडे उडत होते !

मेहेरजानला मधूनमधून एखादे वेळा जी तंद्रा येई, तींत तिला नानातऱ्हेचीं भयंकर स्वप्नें पडत असत. त्यांतही हें स्वप्न तिला वारंवार पडत असे:-गंभीर घनगर्जना करीत चपल वेगानें धांवत जाणारा दामोदर नद जिच्या पदप्रान्ताचें प्रेमानें चुंबन घेत वाहत आहे, त्या रम्य तटभूमीवर दृढपणें उभ्या राहिलेल्या त्या आबराईंतील शुभ्र वाड्याच्या एका अंधकारानें भरून गेलेल्या खोलींत जणूं काय, ती आपल्या गत प्रियपतींचें-शेरसाहेबांचें-चिंतन करीत एकटीच पडली आहे. दामोदर नदाच्या गंभीर आणि गहन अशा गर्भप्रांतांतून काळ्याकभिन्न अंधकाराचे पुंजकेच्या पुंजके निघून, विशाल व अतिशय विस्तीर्ण अशा आकृति धारण करून आपल्या दीपप्रकाशहीन खोलींत जमाव करून-एकजुटीनें प्रवेश करून सर्व खोलीभर पसरत आहेत ! जणूं काय, आत्यंतिक प्रलयकालचे भयंकर आणि अतिशय काळेकुट्ट असे खूब जाडोचे मेघ द्रुतगतीनें भ्रमण करीत असतां दमल्यामुळें अल्पकालपर्यंत विश्रांति घेऊन ताजेतवानें होण्याकरितां आपल्या महालाचा आश्रय घेत आहेत ! तो अंधकाराचा प्रचंड समुदाय आपल्या पलंगाच्या आसपास, दुधाप्रमाणें पांढऱ्या शुभ्र अशा मच्छरदाणीवरून, लोडगिर्द्यांवरून, लाल रंगाच्या मखमालीच्या आवरणवस्त्रावरून, शय्येवरील, खालील, चारही बाजूंच्या अवकाशांत महा-कालभुजंगांप्रमाणें मोठमोठ्यानें भयप्रद फूत्कार टाकीत, एका प्रकारच्या अतिशय वेगानें चहूंकडे उसळणाऱ्या विषारी वायूच्या तरंगांसहवर्तमान सारखें भ्रमण करीत आहे, कधीं मध्येंच पिशाचांची अक्राळविक्राळ रूपें धारण करून एका धांसाबरोबरच आपला पार चट्टामट्टा उडविण्याकरितां आपल्या अंगावर धांवून येत आहे ! हें अत्यंत विलक्षण, हृदयाचा जेथल्या तेथेंच कोंडमारा करून टाकणारें स्वप्न पडतांच अभागिनी मेहेरउन्निसा भयानें घाबरी होई-मोठमोठ्यानें ती ओरडूं लागे ! क्षणार्धांत तिच्या निद्रेचा भंग होई. तिच्या अंगांतून घामाच्या धारा वाहूं लागून अंगावरील सर्व वस्त्रें भिजून ओलीं होत ! बराच वेळपर्यंत आपण स्वप्नांत आहोंत कीं जागृत आहोंत हेंही तिला कळत नसे. कांहीं वेळ गेल्यावर आपण पाहिलें तें स्वप्न-सत्य नव्हे, अशी मेहेरची हळूहळू खात्री होई. नंतर ती पलंगावरून

उठून महालाच्या खिडकीशीं येऊन बसे. तों तेथें थोड्या वेळापूर्वी दृष्टीस पडलेल्या देखाव्याच्या अगदीं उलट देखावा मेहेरजानच्या नजरेस पडत असे. यमुनेच्या कृष्ण जलावर पांढरा शुभ्र चंद्रप्रकाश आनंदानें विहार करीत असलेला पाहून तिच्या मनाची कांहीं विलक्षण स्थिति होऊन जाई. महालापासून कांहीं अंतरावरून वसन्तकालाच्या मृदु मंद वाहणाऱ्या वायूच्या झुळकेबरोबर ऐकूं येणाऱ्या वेळूंचा मंजुळ नाद ऐकून मेहेरजानला नुकत्याच पडलेल्या भयंकर स्वप्नाचा व तिच्या नेहमींच्या दारुण चिंतेचा क्षणमात्र तरी विसर पडे! विमल चंद्रकिरणांबरोबर चहूंकडे आपला करडा अंमल गाजविणाऱ्या गंभीर आणि विराट निस्तब्धतेचा प्रभाव तिच्या व्यथित मनाला किती तरी शांति देत असे! बादशाही अन्तःपुराच्या दूरदूरच्या महालांकडून अस्फुटपणानें ऐकूं येणाऱ्या आमोद प्रमोदाच्या लहरींचा मात्र मेहेरला एका प्रकारचा तिटकारा वाटत असे. परंतु तो असूयेनें नव्हे हें आम्ही खात्रीपूर्वक सांगू शकतों. अशा सुंदर व रम्य निस्तब्धतेचा भंग थोडा तरी व्हावयास त्या प्रमोदलहरी कारण होत असल्यामुळें मेहेरसारख्या एकान्तप्रिय व निसर्गप्रणयिनी रमणीला त्यांचा तिटकारा वाटावा हें साहजिक आहे. यमुनेच्या निसर्गमंजुल कलसंगीतापेक्षां तो कृत्रिम कोलाहल तिला प्रिय कसा वाटावा?

मतियाच्या अतिशय आग्रहामुळें मेहेरउन्निसा वर्धमानहून आग्र्याला आली, त्यास एक वर्षाहूनही कांहीं अधिक दिवस झाले होते. या एका वर्षाच्या दीर्घावधींत, ज्या दिल्लीपतीनें मुद्दाम सेनापति व सैन्य पाठवून मेहेरला आग्र्याच्या बादशाही रंगमहालांत आणविलें होतें, त्यानें—जहांगीर बादशहानें—तिला एकवारही आपलें दर्शन दिलें नाहीं! दर्शनाची गोष्ट तर दूरच राहो, परंतु त्यानें मेहेरचा नुसता एकवार समाचार तरी घ्यावयाचा होता! तिची विचारपूस करून वरवरचा तरी आदर त्यानें दाखवावयाचा होता! जहांगीर बादशहाच्या या उपेक्षेमुळेंच मेहेरच्या हृदयाला अतिशय यातना होत असत.

मेहेरउन्निसा रंगमहालांत आल्यापासून तिला थोडासा सरकारी तनखा सुरू झाला होता. नाहीं असें नाहीं—परंतु तो अगदींच अल्प होता. त्यानें तिची उपजीविका मोठ्या कष्टानें कशी तरी चालत असे. मेहेर एकटी असती तरी तो तनखा तिला चांगल्या रीतीनें पुरला असता कीं नसता याची शंकाच आहे. मग तिच्या तीन चार दासी आणि ती स्वतः यांचा निर्वाह त्या बादशाही तनख्यावर कसा होणार? मेहेरउन्निसा या अपमानानें आणि उपेक्षेनें आंतल्या आंत करपून जात होती—परंतु त्या अभिमानी बायकोनें आपल्या दैन्याविषयीं किंवा उपेक्षेसंबंधानें एक चकार शब्दही कधीं कोणापाशीं काढला नाहीं! ती मनांत म्हणे कीं, "हृदय जळून, खाक होऊन प्राणान्त झाला तरी पुरवला, परंतु आपल्या तोंडानें आपल्या दैन्याचें प्रदर्शन करणें नको."

मेहेरनें आपल्या दीन स्थितीची हकीकत कोणापाशीं सांगितली नाहीं हें खरें, परंतु कितीही चोरून ठेवल्या तरी अशा गोष्टी का कधीं लपून राहातात? या विलक्षण पक्ष्यांना पंख फुटून ते कधीं तरी दूर जावयाचेच! मेहेरजानची ही शोचनीय स्थिति हळूहळू सर्वांना कळून चुकली. जिकडे तिकडे सुष्ट व दुष्ट लोक असावयाचेच; त्याप्रमाणें

आग्र्याच्या बादशाही रंगमहालांतही होतेच. दुष्ट होते त्यांना मेहेरची स्थिति ऐकून समाधान झालें, सुष्ट होते त्यांना फार वाईट वाटलें.

या सुष्ट मंडळींपैकीं कोणी कोणी "खुद्द शहानशहांची भेट घेऊन एकवार आपली हकीकत त्यांच्या कानांवर घाला" असा मेहेरला उपदेश केला. परंतु मेहेर तर प्रत्यक्ष अभिमानाचा अवतार होती. तिला हा उपदेश रुचणार कसा? ती या मंडळीला तोंडावर कांहीं जबाब देत नसे, परंतु मनांत ह्मणे कीं, "या पोटासाठीं असें नीच वृत्ति स्वीकारून, मी भिकारी होऊं? बादशहापाशीं मी उदरासाठीं याचना करूं? त्यापेक्षां भुकेनें हाल हाल होऊन मेलेलें काय वाईट?"

शेवटीं, मेहेरउन्निसानें मनांतल्या मनांत निश्चय केला कीं, आतां पोटासाठीं ह्मणून कोणाच्याही तोंडाकडे पाहावयाचें नाहीं. कोणापाशींही तोंड वेंगाडावयाचें नाहीं. परमेश्वरानें कृपाळू होऊन आपणाला चांगले घट्टेकट्टे दोन हात दिले आहेत. कशिदा आणि जडावाचें काम आपण शिकलें आहों; आपल्याच हातांवर आतां अवलंबून राहून आलेले दिवस कसे तरी कंठावयाचे! परंतु दैवाला हार जावयाचें नाहीं! दिल्लीच्या बादशहाचा क्षुल्लक तनखा घेऊन दिवस घालविण्यापेक्षां स्वतःच्या निढळाच्या घामानें मिळविलेलें अन्न खाणें शतपटीनें सुखदायक होईल. स्वतःच्या श्रमाची कोरडी भाकरीही दुसऱ्यानें कृपाळू होऊन दिलेल्या पंचपक्वान्नाच्या सुग्रास भोजनापेक्षां शेंकडोंपटीनें रुचकर लागेल. या निश्चयानें मेहेरच्या मनाला एक प्रकारचें विलक्षण बल आलें.

'निश्चयाचें बळ—तुका ह्मणे तेंचि फळ' या साधूक्तीची सार्थता मेहेरच्या ठिकाणीं लवकरच चांगली दिसून आली. निश्चय केल्यानंतर मेहेरनें तो तावडतोब अमलांत आणला. कलाकुशल दासी व अन्य परिजन आपल्या पदरीं अधिक ठेवून तिनें जडावाचें, कशिद्याचें व कलाकुसरीचें काम मोठ्या प्रमाणावर सुरू केलें. स्वतः मेहेर त्यांच्याबरोबर दिवस–रात्र खपूं लागली. तिच्या देखरेखीखालीं हीं कलाकुसरीचीं कामें अत्यंत सुबक व नयनाकर्षक होऊं लागलीं. त्या रमणीच्या सुंदर करयुगुलाच्या चंपकतुल्य अंगुली चित्रविचित्र कौशल्याचीं उत्तमोत्तम कामें निर्माण करण्यांत सर्व काल निमग्न होऊन जात असत. मेहेर जीं कामें तयार करीत असे, तीं कामें घेऊन तिची एक दासी आग्र्याच्या बाजारांत जात असे व त्यांची विक्री करून सर्व पैसे मेहेरजवळ देत असे. आपल्या विलक्षण कलाकुसरीचें काम मेहेरजाननें जेव्हां पहिल्यानेंच विकावयास पाठविलें, तेव्हां त्याची जी किंमत येईल अशी तिची अपेक्षा होती, त्याच्या शतपटीनें त्याला किंमत आली! दहा असरफीच्या ऐवजीं हजार असरफी किंमत देऊन तें काम कोणी आग्र्याच्या बाजारांत खरेदी केलें. आग्रा शहरांत कलाकौशल्याचें मर्म समजणारा, ललित शिल्पाच्या सौंदर्याचा उपभोग घेणारा हा उदार पुरुष आहे तरी कोण हें मेहेरला कळेना! त्या उदार पुरुषाला मनांत सहस्र धन्यवाद देऊन मेहेरनें त्या हजार असरफी आपल्या पेटींत ठेवल्या व करुण भावानें परमेश्वराची करुणा भाकली. आपल्या एकनिष्ठ दासींचें वेतन तिनें तावडतोब वाढ-

विलें व त्यांना चांगले पोषाक बक्षिस दिले.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं तिनें रंगमहालाच्या मीर मुनशीला बोलावणें पाठविलें. अल्पावधींतच मेहरच्या महालांत येऊन तो दाखल झाला.

त्याजकडे तीक्ष्ण दृष्टीनें पहात मेहेर ह्मणाली "मुनशीसाहेब! आजपासून माझी रसद तुह्मी बंद करा. तुमच्या भिक्षेच्या अन्नावर दिवस कंठावयाची आतां माझी इच्छा नाहीं!"

बिचारा मीर मुनशी आश्चर्यानें थक्क होऊन तेथून निघून गेला!

## प्रकरण नववें.

### महाराणी जोधबाइ.

आग्र्याच्या रंगमहालांतील आपल्या एकीकडच्या महालांत मेहेरउन्निसा विमनस्कपणें आपलें नेहमींचें कलाकुसरीचें काम करीत बसली होती. अदृष्टाच्या तडाक्यानें झालेल्या आपल्या विलक्षण स्थित्यन्तराबद्दल सवयीमुळें ती आतां फारशी चिंता करीत नसे. "रोज मरे त्याला कोण रडे?" या ह्मणीप्रमाणें मेहेर आपल्या दारुण चिंतेला हळूहळू विसरत चालली होती; परमेश्वरानें तिला ज्या स्थितींत ठेविलें होतें, त्या स्थितींतच ती हळुहळू समाधान मानावयास आपल्या मनाला शिक्षण देत होती. मेहेरच्या प्रयत्नाला चांगलेंच यश चाललें होतें. प्रयत्नानें मनुष्याला काय साध्य होणार नाहीं?

बादशाही अन्तर्महालांत वाटेल तिकडे जावयाला मेहेरला बिलकुल आडकाठी नव्हती. जहांगीर बादशहानें मेहेरला एवढें तरी स्वातंत्र्य ठेविलें होतें. परंतु या स्वातंत्र्यासंबंधीं मेहेर स्वतःच्या इच्छेनेंच बंदिवान् झाली होती! बादशहानें मोठ्या कृपेनें दिलेल्या या स्वातंत्र्याचा मेहेरनें बहुतेक कधींही उपयोग केला नाहीं. होतां होईल तों ती आपल्या महालाच्या दरवाजाच्या बाहेर कधींही पाऊल घालीत नसे. कारण, अंतर्महालातील इतर बेगमांचें व मेहेरचें सख्य जमावयाला त्यांच्यांत कांहीं 'समानशीलव्यसन' फारसें नव्हतें! खरें ह्मटलें तर बहुतेक प्रत्येक बाबतींत बादशाही बेगमा मेहेरच्या अगदीं उलट होत्या. कोणत्याही गोष्टींत मेहेरशीं त्यांचें साम्य नव्हतेंच, असें ह्मटलें असतां फारशी अतिशयोक्ति होणार नाहीं. अर्थात्, अशी वस्तुस्थिति असतां, मेहेर इतर बेगमांकडे जाते कशाला आणि त्या तरी मेहेरकडे येतात कशाला? बादशाही रंगमहालांतील बहुतेक बेगमा मेहेरचा मनापासून द्वेषच करीत होत्या! ती रंगमहालांत आल्यामुळें त्यांचें महत्व कमी झालें होतें. तिच्या अप्रतिम सौंदर्यापुढें त्या सर्वजणी अगदीं फिक्या पडून गेल्या होत्या. इराणची नूतन पियारी बेगम हिच्याच वर्गांत त्या सर्वांची गणना होण्यासारखी होती. पियारी विशेष मत्सरी व फार धाडशी असल्यामुळें तिनें आपल्या द्वेषाला प्रत्यक्ष कृतीनें रूप दिलें होतें व इतर बेगमा तितक्या धाडशी नसल्यामुळें त्या मेहेरवर नुसत्या बोटें मोडून स्वस्थ राहिल्या होत्या, इतकेंच काय तें पियारींत व इतर बेगमांत अंतर! बादशहाच्या जनानखान्यांतील दोघीजणी देवरमणी मात्र मेहेरकडे स्नेहपूर्ण दृष्टीनें पाहाणाऱ्या होत्या. एकजण, त्या पुण्यश्लोक महानुभाव अकबरशहाची गर्भधारिणी,

महापुण्यवती, वृद्ध, पक्ककेश—वीरपत्नी—वीरमाता हमीदाबानू बेगमसाहेब व दुसरी, जोधपूरची राजकुमारी—जहांगिराची पट्टराणी जोधबाई ! हमीदाबानू बेगमसाहेब या वेळीं कडक उन्हाळ्याचा फार त्रास होत असल्यामुळें पंजाबांतील एका हवाशीर डोंगराळ प्रदेशांत हवा पालटण्यासाठीं निघून गेली होती. हल्लीं आग्र्याच्या त्या विशाल बादशाही रंगमहालांत मेहेरउन्निसाची केवळ एकच हितचिंतक मैत्रीण (अथवा दुसरें कांहीं नांव द्या) होती—आणि ती महाराणी जोधबाई ही होय. परंतु राणी जोधबाईही आज आज कित्येक दिवस झाले, मेहेरच्या महालांत आली नव्हती. आपल्या एकच हितचिंतक मैत्रिणीचें बरेच दिवसांत दर्शन न झाल्यामुळें मेहेरजानला अगदीं काळजी लागून राहिली होती. परमेश्वराच्या कृपेनें या राक्षसपुरींत आपणाला जोधबाई ही देवरमणी मैत्रीण मिळाली होती, तीही दैवदुर्विलासानें आपणास अंतरली कीं काय या विचारानें तिच्या हृदयाचा अगदीं थरकांप उडत असे. महाराणीचा आपल्या हातून न कळत एखादा अपराध घडला आहे कीं काय, नर्मपरिहासांत आपणाकडून तिचा अपमान झाला असेल कीं काय, आपण कधीं लहान तोंडीं मोठा घांस घेऊन जोधबाईला कधीं दुखावलें तर नसेल, इत्यादि शंकाकुशंकांनीं आज कित्येक दिवस मेहेरच्या मनाला भेडावून सोडलें होतें.

या वेळीं महालाच्या एका उघड्या खिडकीजवळ बसून जोधबाईविषयींच्याच विचारांत मेहेर अगदीं निमग्न होऊन गेली होती. तिचें सारें लक्ष्य या प्रसंगीं महाराणीच्या चिंतनांत गढून गेलें होतें, मेहेरच्या सर्व दासी या वेळीं आहार करावयास गेल्या असल्यामुळें महालांत मेहेरशिवाय कोणीही नव्हतें. एकान्त मिळाला कीं मनुष्याच्या विचारांला नुसता पूर येत असतो ! एकांताचा भंग करावयाला कोणी तरी जवळ असलें ह्मणजे मनुष्याचें मन तेवढें विचारांत भडकत नाहीं. या नियमाला अनुसरूनच या वेळीं मेहेरचें मन विचारांत फार भडकून गेलें होतें. महाराणी जोधबाई, साध्वी हमीदाबानू बेगमसाहेब, व प्रिय सखी मतिया यांचीच मेहेरला आज विशेष आठवण होत होती. मध्यान्हकाल झाला होता. सूर्याच्या तापाचा प्राणिमात्राला फार त्रास होत होता. त्वचेंतील छिद्ररूपी असंख्य नेत्रांनीं प्राणी घर्माश्रुबिंदु ढाळीत होते. परंतु मेहेरचें या त्रासाकडे मुळीं लक्ष्यही नव्हतें असें ह्मटलें असतां चालेल. तिच्या विशाल ललाटप्रदेशावर मौक्तिकांप्रमाणें शोभणारे असंख्य घर्मबिंदु चमकत होते. परंतु ते पुसून काढण्याचेंही तिला फारसें भान नव्हतें. घर्मबिंदूंचा प्रचंड जमाव होऊन ते खालीं ठिपकूं लागले ह्मणजे मात्र मेहेर एखादे वेळीं ते पुसून काढी ! ती खिडकीजवळ एकटीच बसून, आपलें सुंदर मस्तक अवनत करून हातांनीं एक कौशल्याचें काम करण्यांत गढून गेली होती. तिची दृष्टि हातांतील कामाकडे अगदीं खिळून राहिली होती व हात तें काम करण्यांत सारखी धांवपळ करीत होते. मधून एकदा सुद्धां मेहेर वर मान करीत नव्हती, इतके तिचे डोळे त्या कामाकडे लागून राहिले होते. परंतु मन मात्र मतिया व जोधबाई यांच्याकडेच धांव घेत होतें.

मेहर आपल्या विचारांत व हातांतील सुंदर शिल्पकामांत अगदीं गढून गेली आहे, इतक्यांत तिच्या महालाच्या बाजूचें दार हळूच उघडलें व दारावरचा पडदा बाजूला सरून कोणी तरी बिलकुल आवाज न करतां हळूच आंत आलें. त्या 'कोणी तरी' चे अळत्याच्या रंगानें लाल झालेले चरण इतके कोमल होते, कीं, त्यांचा कठीण जमिनीवरही शब्द होणें फारसें संभवनीय नव्हतें! त्यांतूनही त्या 'कोणी तरी'नें मुद्दाम शब्द न होण्याची काळजी घेऊनच मेहेरच्या महालात प्रवेश केला होता. तें 'कोणी तरी' ध्वनि न होण्याविषयीं फार काळजी घेऊन एकेक पाऊल फार जपून टाकीत होतें. त्याची गति इतकी संथ व चंचलताहीन होती कीं, तिच्याकडे कोणाचेंही लक्ष्य जाणें फारसें संभवनीय नव्हतें. त्यांतून 'कोणी तरी' आल्याचें मेहेरच्या लक्ष्यांत आलें असतें, परंतु तिचें लक्ष्य या वेळीं ठिकाणावर नसून विचाराकाशांत भ्रमण करण्यांत गुंग होऊन गेलें असल्यामुळें तिच्या तें बिलकुल लक्ष्यांत आलें नाहीं, यांत नवल तें काय?

ती हळूच पाय न वाजवितां आंत प्रवेश करणारी, हंसगतीनें चालणारी व्यक्ति एकेक पाऊल जपून टाकीत टाकीत हळू हळू मेहेरच्या मागें जाऊन उभी राहिली. मेहेरच्या हें ध्यानांतही आलें नाहीं. स्निग्ध दृष्टीनें एकवार मेहेरच्या मुखाकडे पाहून त्या व्यक्तीनें आपल्या कमलतुल्य हातांनीं तिचे डोळे मागून हळूच झांकले. अगदीं ध्यानींमनीं नसतां आपल्या महालांत कोणी शिरून सहसा त्यानें डोळे झांकलेले पाहून मेहेर एकदम चपापली! परंतु ती अत्यंत प्रसंगावधानी असल्यामुळें भिऊन ओरडली नाहीं! महालांत आपल्या नकळत हळूच प्रवेश करून आपले डोळे झांकण्याइतकी सलगी दाखविणारी व्यक्ति कोणी तरी आपल्या मित्रवर्गांपैकींच असली पाहिजे, हें मेहेरजानच्या ध्यानांत यावयाला बिलकुल वेळ लागला नाहीं! त्या व्यक्तीनें डोळे झांकण्याच्या वेळीं मेहेर आपल्या प्रिय सखी मतियाबद्दल विचार करीत होती. मतियाची बरेच दिवसांत भेट झाली नाहीं, इतकेंच नव्हे तर तिच्याकडून कुशल वर्तमानही कळलें नाहीं, याबद्दल मेहेरला फार आश्चर्य वाटत होतें. तीच तर यावेळीं आपणाला भेटावयाला आली नसेल ना? असा विचार मेहेरच्या मनांत एकाएकीं आला. डोळे झांकणाऱ्या व्यक्तीचे हात तिनें चांचपून पाहिले, तों ते मतियाच्या हातांप्रमाणेंच मेहेरला कोमल भासले; तेव्हां तर ती व्यक्ति मतियाच आहे अशी तिची खात्री झाली.

मेहेर हर्षभरानें एकदम उद्गारली:— "कशाला आतां उगीच डोळे धरतेस? मी तुला केव्हांच ओळखलं!"

हें ऐकून ती व्यक्ति किंचित् हंसली मात्र! परंतु तिनें मेहेरचे डोळे सोडले नाहींत किंवा ती एक शब्दही बोलली नाहीं!

मेहेर पुनः म्हणाली;—"मी तुला ओळखलं! सोड माझे डोळे! तूं मतिया— मतिया! प्रिय सखी! शेवटीं तुला इतक्या दिवसांनीं माझी आठवण झाली म्हणावयाची!"

ती डोळे झांकणारी व्यक्ति जर मुळीं मतिया नव्हतीच, तर ती उत्तर कां म्हणून देईल? सर्व महालाला प्रकाशित करणारें मृदु हास्य तिच्या मुखकमलावर विराजमान

झालें. तिनें मेहेरचे डोळे अजूनही सोडले नाहींत!

मेहेर हंसत ह्मणालीः–" मतिया! गडे! माझ्या डोळ्यांना कळा लागल्या हो! आतां ओळखल्यावर माझे डोळे तूं कां ह्मणून धरतेस बाई?"

ती व्यक्ति आपला स्वर बदलून हंसत ह्मणालीः–" हो का? तूं मला चांगलंच ओळखलंस ह्मणायाचं! मी कांहीं तुझी मतिया नव्हे हो! मी कोण तें सांग पाहूं! मी कोण तें सांगितल्याशिवाय मात्र तुझे डोळे कांहीं सुटावयाचे नाहींत. मग त्यांना किती कळा लागावयाच्या असतील त्या लागोत!"

त्या व्यक्तीनें आपला स्वर बदलण्यांत जरी बरेंच कौशल्य दाखविलें होतें, तरी तिचा तो प्रयत्न सफळ झाला नाहीं! तिचा तो कृत्रिम स्वर मुळीं देखील लपला नाहीं! मेहेरनें तत्क्षणीं तो ओळखून काढला!

त्या व्यक्तीची ओळख पटतांच मेहेरच्या अंगावर हर्षाचे रोमांच उभे राहिले. तिच्या हातांची तिला न कळतच एकदम अंजली रचली गेली. सद्गदित कंठानें मेहेर एकदम ह्मणालीः–" अगबाई! आपण का आलां आहां? माझ्या मघांच्या शब्दांबद्दल मी आपणांजवळ क्षमा मागतें. मतिया समजून मी ते बोललें होतें. शेवटीं आज आपण आलांत! फार उत्तम झालं. आपल्या आजच्या भेटीनं मला किती आनंद झाला आहे, तें आपणांला काय सांगूं? इतक्या दिवस आपलं मला कां बरं दर्शन झालं नाहीं? माझ्या न कळत माझ्या हातून आपला कांहीं अपराध किंवा अपमान तर नसेलना झाला? या आशंकेनें माझ्या मनाला इतके दिवस कशी सारखी हुरहूर लागून राहिली होती! आपली भेट घेऊन आपल्याला याविषयीं विचारून आपली क्षमा मागावी असा विचार केला; परंतु आपल्या महालांत जाऊन आपली भेट घ्यायचा मला धीर होईना! आपणांला काय सांगूं! या विचारांनीं माझ्या हृदयांत आज अगदीं काहूर करून सोडलं होतं. आज कसंही करून मी आपली भेट घेण्याचा विचार केला होता!–आज या महालांत मला एकट्यानं रहायचा अगदीं कंटाळाच आला होता."

उभयतांमधील विनोदरहस्य संपलें! मेहेर बोलत असतां त्या सुंदरीनें तिच्या डोळ्यांवरील आपले हात काढून घेतले व प्रसन्न मुद्रेनें हंसत हंसत ती मेहेरसमोर येऊन उभी राहिली. त्या सुंदरीच्या उसळणाऱ्या सौंदर्याचे तरंग, मोकळा सुटल्यामुळें तो पाठीवर स्वच्छंदानें रुळणारा घनकृष्ण केशकलाप, तें मदिरेप्रमाणें चमकणारें सुंदर विशाळ नयनयुगुल, ती सदासर्वदा प्रफुल्ल असणारी नलिनीप्रमाणें शोभणारी सरस मुखकान्ति, तो बिंबाप्रमाणें आरक्त दिसणारा चिक्कण अधर हीं सर्व मूळच्या शतपटीनें मधुरता धारण करून मेहेरजानच्या समोर प्रकट झालीं!

मेहेरच्या निष्प्रतिभ मुखमंडलावर क्षीण हास्याची रेखा विराजमान झाली. त्या सुरसुंदरीकडे भक्तिपूर्ण दृष्टीनें पहात, हात जोडून मेहेर तिला ह्मणालीः–"'बंदगी–बंदगी, बादशहा–बेगम! आपल्या चरणकमलांच्या मृदु रेणूंनीं माझा हा क्षुद्र महाल खरोखरच आज परमपवित्र झाला आहे. आपल्या देवतातुल्य दर्शनलाभानें आज मी धन्य झालें आहें! खरोखरच आज माझं मह-

द्भाग्य उदयाला आलं आहे! आज सकाळीं उठल्याबरोबर मीं कुणाचं मुख पाहिलं होतं, कोण जाणे! जोधपूरच्या पवित्र रजपूतकुलांत, पवित्र मातापितरांच्या पोटीं आपण जन्म धारण केला, अन् सर्व भरतखंडाचे शहानशहा दिल्लीश्वर यांच्या आपण अर्धांगी! या दीन दासीवर खरोखरच आपली मेहेरबानीची नजर आहे ह्मणायची! या दीन दासीला आपणाशिवाय या साऱ्या जगांत कोण आहे बरं? आईबापांनीं टाकली, आप्तेष्टांनीं दूर केली, पतीनीं त्याग केला—शेवटीं जीवाची मैत्रीण मतिया देखील मला विसरून गेली—परंतु या दीनेची आपणाला विस्मृति पडली नाहीं. तो दयामय आपणाला सदासर्वदा पूर्ण सुखांत ठेवो, एवढाच आशीर्वाद मी आपणांला देतें. याहून दुसरं मजपाशीं आपणांला द्यायला काय आहे?" बोलतां बोलतां मेहेरचे डोळे अश्रूंनीं भरून आले!

मेहेरच्या या शब्दांनीं जोधबाईचें अंतःकरण भरून आलें. आपल्या महामूल्य वस्त्राच्या पदरानें तिनें मेहेरचे डोळे पुसले. मेहेरचे डोळे पुसतां पुसतां तिला एक दोनदां स्वतःचेही डोळे पुसल्यावांचून राहावेना!

मेहेरनें केलेल्या तिच्या या प्रशंसेनें महाराणी जोधबाई अगदीं अन्तःकरणापासून लज्जित होऊन गेली. ती जात्याच फार सद्गुणशालिनी असल्यामुळें कोणीही तिची स्तुति केली तर तें तिला पसंत पडत नसे. राणी जोधबाई ही काटवाचा ठाकूर गजपतिसिंह, याची पत्नी—मोतिराणी, हिची अगदीं बालपणापासून जीवाची मैत्रिण होती. दिल्लीच्या महाराज्ञीपदावर आरूढ झाल्यावरही त्या दोघांचा स्नेह पूर्वीप्रमाणेंच निष्कंटक रीतीनें अव्याहत सुरूच होता. मेहेरउन्निसावर जोधबाईचा एवढा लोभ जडावयाला, ती मतिराणीची प्रिय सखी हेंही एक कारण होतें. मेहेरजान एक वर्षापूर्वी जेव्हां आग्र्याच्या रंगमहालांत आली, त्यानंतर कांहीं दिवसांनीं मोतिराणी आग्र्याला येऊन जोधबाईला भेटली व या भेटींतच तिनें मेहेरजानवर मेहरनजर ठेवण्याविषयीं तिला विनंति केली होती. मोतिराणी व जोधबाई यांमध्यें नेहमीं जो पत्रव्यवहार होत असे, त्यांमध्यें मेहेरबद्दलच विशेष हकीकत लिहिलेली असे. मोतिराणीकडून महाराणीला नुकतेंच पत्र आलें होतें, त्यांत मोतिराणीनें जोधबाईला पुढील आशयाचा मजकूर लिहिला होताः—" राणीसाहेब! मेहेरजान ही माझा ' जान ' आहे असें समजा. मजवर जसें आपलें प्रेम आहे, तसें किंबहुना त्याहीपेक्षां जास्त मेहेरउन्निसावर आपलें प्रेम असूं द्या. कारण ती आग्र्याच्या रंगमहालांत निःसहाय आहे. जिवाच्या दोन गोष्टी सांगेल अशी तिची तेथें एकही मैत्रिण नाहीं—ह्मणूनच विशेषतः आपणांला ही विनंति करावयाची आहे. मेहेरला तेथें कांहीं कमी पडेल असें करूं नका." जोधबाई ही आधींच उदारहृदय होती. त्यांतून मतियाचा असा आग्रह. या कारणानें मेहेरबद्दल तिला अतिशयच प्रेम वाटूं लागलें. मेहेरउन्निसाचे स्वतःचे सद्गुणच असे होते, कीं, कोणत्याही सहृदय मनुष्याचें तिजवर तत्काल प्रेम बसावें. सरल व सदय हृदयाची जोधबाई मेहेरवर अतिशय प्रेम करूं लागली. मेहेर तिच्या महालांत जात नसल्यामुळें तीच मेहेरच्या महालांत वारंवार येऊं-जाऊं लागली. रंगमहालांतील इतर

बेगमांच्या ठिकाणीं असणाऱ्या जालीम मत्सराचा अंश देखील जोधबाईच्या हृदयांत वास करीत नव्हता! रजपूतकन्या प्रायः कधींही नीच होऊं शकत नाहींत.

कांहीं वेळ स्तब्ध राहून राजराजेश्वरी जोधबाई मेहेरला उद्देशून ह्मणाली:—"कसं काय चाललं आहे मेहेरजान? अजून कांहीं तुझ्या डोळ्यांतलीं टिपं थांबलीं नाहींत, हें आजही माझ्या अनुभवास आलं. बरं, राहू दे ती नेहमींची कर्मकटकट! त्या दिवशीं रात्रीं रंगमहालांत मला शोधण्यासाठीं तूं गेली होतीस ह्मणे! मला ही बातमी नुकतीच लागली. मी स्वतःच्या निराळ्या महालांत असतें हें तुला माहीत नाहीं का अजून? रंगमहाल हा इतर सटरफटर बेगमांकरितां—बादशहाच्या पट्टराणीकरितां नव्हे कांहीं!" असें ह्मणून जोधबाई खदखदा हंसूं लागली.

महाराणीच्या या शब्दांनीं मेहेरजान किंचित् गोंधळून गेली. जोधबाई हाच नेमका प्रश्न विचारील असें तिला वाटलें नव्हतें. ती अस्फुट वाणीनें ह्मणाली:—"ती माझी चुकीच झाली बेगमसाहेब! आपला महाल स्वतंत्रच असतो, हें मला अजूनही कळूं नये ह्मणजे मी अगदींच वेडी ह्मणायची! मला आपल्या महालांत जायला धीर होईना. ह्मणून रंगमहालांतच मी वेडी आपणांला शोधायला गेलें होतें. मला आपलं वाटलं होतं कीं, आपली भेट कदाचित् तिथं होईल ह्मणून! मला कीं नाहीं, अलीकडे अगदीं बिलकुल चैन नाहींसं झालं होतं. मतियाही बरेच दिवसांत इकडे आली नाहीं. इतकंच नव्हे, तर तिच्याकडून बरेच दिवसांत पत्रसुद्धां नाहीं. अन् सात—आठ दिवसांत आपली स्वारीही कुठं इकडे फिरकली नाहीं. ह्मणून मी आपल्या भेटीसाठीं फारच अधीर होऊन गेलें होतें. आपली स्वारी इतक्या दिवसांत इकडे कां बरं आली नाहीं?"

"कांहीं विशेष कारण होतं असं नाहीं. शहानशहांची तब्येत अलीकडे किंचित् नादुरुस्त होती. तिकडच्याच शुश्रूषेंत सारा वेळ जात असे अन् थोडीशी माझीही पण प्रकृति ठीक नव्हती. ह्मणून नाहीं झालं येणं इतक्या दिवसांत. मनुष्याचे दिवस नेहमीं सारखे का जात असतात? कधीं कधीं अशा अडचणी या यायच्याच! मीं चार—सहा दिवसांत भेटलें नाहीं ह्मणून तूं अशा काळजींत का रहावं वेडे?"

जोधबाईचें हें आपणांवरील निःसीम प्रेम पाहून मेहेरच्या मनांत तिच्याबद्दल वसत असलेली पूज्यबद्धि शतपट वाढली. ती कृतज्ञताप्रदर्शक स्वरानें ह्मणाली:—"बेगमसाहेब! जन्मोजन्मीं आपली सेवा केली तरी देखील आपले हे उपकार कधींही माझ्या हातून फिटायचे नाहींत—"

"हां खबरदार मेहेर! असले शब्द तोंडावाटे कधींही काढूं नको ह्मणून मीं तुला किती वेळ बरं बजावलं आहे? असंच जर तुला माझ्याशीं नेहमीं बोलायचं असेल तर ही मी निघून जातें पहा. फिरून मी तुझ्या महालांत कधीं पाऊलही टाकणार नाहीं बघ—"

जोधबाईला तिची स्तुति केलेली आवडत नाहीं, ही गोष्ट मेहेरला चांगली ठाऊक होती. यापूर्वी असेच एक—दोन प्रसंग येऊन आपली स्तुति केल्याबद्दल जोधबाई मेहेरला रागें भरली होती. परंतु या प्रसंगीं कृतज्ञताप्रदर्शनाच्या भरांत ही गोष्ट तिच्या मुळींच लक्ष्यांत राहिली नाहीं.

महाराणी रागावलेली पाहून मेहेरजान किंचित् वरमली व हात जोडून बळेंच कृत्रिम हास्य करून ती जोधबाईला म्हणाली:- "क्षमा करा, राणीसाहेब ! ही गोष्ट माझ्या हातून केवळ चुकून झाली—माझ्या हें लक्ष्यांत राहिलं नव्हतं—"

"पुरे पुरे; इतकं कांहीं नको अगदीं गयावया करायला !"

असें हंसत हंसत म्हणून जोधबाई पुन: मेहेरजवळ बसली. महाराणीची तब्बेत पुन: पहिल्याप्रमाणें सुप्रसन्न झालेली पाहून मेहेरच्या जीवांत जीव आला.

मेहेरजाननें नुकतेंच एक अत्यंत सुंदर व कुशलतेचें शिल्पकाम तयार केलें होतें. महामूल्य मखमालीवर हिऱ्यांचें व मोत्यांचें काम त्यांत फारच कुशलतेनें गुंफलेलें होतें. जवळच्या पेटींतून तें शिल्पकाम बाहेर काढून मेहेरउन्निसानें तें जोधबाईच्या हातीं दिलें व ती हात जोडून नम्रतेनें तिला म्हणाली:-"या दीन दासीचा हा हीन दीन सामान्य उपहार आपणांसारख्या भारतेश्वरीच्या योग्यतेला बिलकुल साजेसा नाहीं, हें मला ठाऊक आहे. परंतु माझं—मतियाच्या प्रिय सखीचं—स्मृतिचिन्ह म्हणून आपण हें नाहीं का ग्रहण करणार ? प्रेमाला मोल नाहीं म्हणतात, हें मी आपणांला सुचवावं असं नाहीं."

मेहेरजानचं तें अप्रतिम, रम्य शिल्पकाम पाहून जोधबाई अगदींच मोहित होऊन गेली. मेहेरच्या अंगीं इतकें विलक्षण शिल्पनैपुण्य असेल अशी तिची कल्पनाही नव्हती. मखमालीवरच्या त्या चित्राकडे जोधबाई नुसती पाहातच राहिली. मेहेरजान स्वत: अनिंद्य सुंदरी, तसेंच तिचें शिल्पही अतिशय सुंदर होतें ! आणि सर्वांपेक्षां तिचा अभिमान तर फारच सुंदर असून तिच्या सौंदर्याची माधुरी अधिकच खुलवीत होता !

मेहेरजानच्या या शिल्प-चित्राची कल्पनाच अगोदर फार हृदयंगम होती. त्या चित्रपटांत एक लहानसें सुंदर सरोवर दाखविलें असून, एक हंस त्यांतील एक सुकुमार मृणालिनी उपटून दूर फेंकून देत आहे असें चित्र रेखलें होतें. सुचतुर जोधबाईला मेहेरच्या त्या काव्यमय शिल्पकामाच्या कल्पनेचें रहस्य तेव्हांच कळून आलें ! मेहेरच्या कल्पनेची व चतुराईची तिला फार धन्य वाटली व असल्या सुरम्य मृणालिनीचें कौतुक करावयाचें सोडून अरसिकपणानें तिला दूर फेंकून देणाऱ्या अरसिक अपंडित हंसाचा तिला फार रागही आला. तिच्या हृदयांत करुणा, तिरस्कार इत्यादि विकारांच्या लहरी उचंबळूं लागल्या. मेहेरसारख्या रमणीचें कष्ट व दु:खें तिच्या 'समानशीलव्यसन' अशा जोधबाईसारख्या उदारहृदय रमणीलाच कळून यावयाचीं व त्यांतील मर्म तिलाच समजावयाचें ! अशा सुरूपसद्गुणशाली रमणीरत्नाला उकिरड्यावर फेंकून देणाऱ्या जहांगीर बादशहाला काय म्हणावें हें तिला कळेना. जोधबाईच्या हृदयांत खळबळ उडविणारे करुणादि मनोविकार तिच्या नेत्राच्या वाटेनें अश्रूंच्या रूपानें वाहूं लागले. ते मेहेरच्या लक्ष्यांत आल्यावांचून राहिले नाहींत.

जोधबाईची अश्रुसिक्त मुखकमलाकडे नजर लावून विनम्रभावानें मेहेरनें तिला विचारिलें:—"मतियाकडून आपणांला कांहीं

वर्तमान कळलं आहे कां ? तिच्याकडून पत्र आलं होतं अलीकडे?"

"होय, आलं होतं."

"आग्र्याकडे यायचं आहे का तिच्या मनांत ?"

"होय—ती इकडे येणार आहे."

"कधीं बरं ?"

"बहुधां ती इतक्यांच—चार–आठ दिवसांत—इकडे येणार आहे, थोड्याच दिवसांनीं शहानशहांच्या जन्मोत्सवाला आरंभ होणार आहे. हल्लीं राजा गजपतिसिंह बंगाल्यांत पठाणांचा बंदोबस्त करायाला जहांपनाहांच्या हुकुमानें गेले आहेत खरे, परंतु जन्मोत्सवाचे प्रसंगीं त्यांना आग्र्याला यायलाच पाहिजे. खाविंदांचा तसा राजेसाहेबांना हुकूमच गेला आहे. जन्मोत्सवाला राजेसाहेबांबरोबरच राणीसाहेबही आग्र्याला यायच्या आहेत, असं त्यांच्या पत्रावरून दिसतं खरं."

जोधबाईनें सांगितलेल्या या वार्तेनें मेहेरच्या खिन्न मलिन मुखावर आनंदाची व हास्याची किंचित् छटा दिसूं लागली. ती राणीला म्हणाली:—"आपण सांगितलेल्या या वृत्तान्तानं मला फार समाधान वाटूं लागलं आहे. आपण कृपा करून या दीन दासीला मधूनमधून असंच दर्शन देत असावं, अशी आपणाला विनंति आहे. या अवाढव्य बादशाही रंगमहालाच्या एका एकीकडच्या कोंपऱ्यांत बंदिनीप्रमाणें एकटंच कोंडलेलं रहाणं आतां मला सहन होईनासं झालं आहे. माझं आतां कांहीं इथं काम नाहींच—तर मग मला आतां इथं उगीच कशाला ठेवली आहे ? मला सोडून द्या—तो दीनदयाघन प्रभु जिकडे मला वाट दाखवील तिकडे मी जाईन !"

बादशहा-बेगम जोधबाई प्रेमभरानें मेहेरजानची हनुवटी धरून हंसत हंसत म्हणाली:—"या वेळीं तुझ्या तोंडीं असे हे निराशेचे उद्गार कां म्हणून वेडे ? त्या दयाघन ईश्वरावरच तुझा दृढ विश्वास असूं दे—मी तर मधूनमधून तुला भेटायला नेहमीप्रमाणं येईनच—परंतु भतिया आली तर पुढील खेपेला आम्ही दोघी तुला भेटायला येऊं बरं ! आज तर मग मी तुझा निरोप घेतें."

असें म्हणून प्रेमानें मेहेरला दृढालिंगन देऊन जोधबाई ललित हंसगतीनें हळूहळू तेथून निघून गेली. ती गेल्यावर त्या बाजूकडे एक दीर्घ निःश्वास टाकून मेहेरजान म्हणाली:—"रजपूतकुललक्ष्मी ! तुझी ही दया मेहेर कधींही विसरणार नाहीं. तुझ्या या अमृत स्रवणाऱ्या गोष्टींचं मला कधींही विस्मरण पडणार नाहीं—मी जिवंत असतां तर नाहींच नाहीं !—परंतु मेल्यावरही तुझी मला विस्मृति होणार नाहीं ! माझं तर सर्व कांहीं नाहींसं झालं आहे. एक तूंच काय ती हितचिंतक मैत्रिण शिल्लक आहेस ! भारतेश्वरी होण्याला तूंच योग्य आहेस ! ईश्वर तुझं सदैव कल्याण करो !"

## प्रकरण दहावें.

### मात्रा लागू पडली !

आग्र्याच्या झनानखान्यांतील खुद्द पट्टराणीचा—बादशहा बेगमेचा—महाल तो ! तेव्हां त्याचें अधिक वर्णन काय करावयाचें आहे ? रत्नमुक्ता वगैरे जवाहिरात, निरनिराळ्या जातींचे संगमरवरी दगड, वगैरे सामान, यांत सर्वश्रेष्ठ प्रतीचें किंवा अतिशय मूल्याचें म्हणून जें कांहीं होतें, तें तें

महाराणीचा हा महाल बनविण्यांत उपयोगांत आलें होतें, एवढेंच येथें सांगितलें ह्मणजे पुरे आहे. मोंगल पादशाहींतील जें सर्वांत उच्च प्रतीचें शिल्प ह्मणून नांवाजलेलें होतें, तें जोधबाईच्या या महालांत दृग्गोचर होत होतें.

अशा त्या अवर्णनीय महालांतील आपल्या शयनगृहांत एका रत्नजडित सुकोमल सुखशय्येवर आडवें अंग टाकून जोधबाई विश्रांति घेत बसली होती. समोरच्या उघड्या खिडकींतून दिसणारी सांध्य गगनाची शोभा पाहाण्यासाठीं ती मधूनमधून दृष्टिनिक्षेप करीत होती. परंतु त्या शोभेकडे तिचें लक्ष्य वेधून जात नव्हतें असें उघड दिसत होतें. तिचें लक्ष्य समोरच्या भिंतीवरील एका मोठ्या तसबिरीकडेच विशेष वेधलेलें दिसत होतें. एका मोंगल बादशहाच्या पट्टराणीचा तो महाल खरा, परंतु तेथें लाविलेल्या तसबिरींपैकीं पुष्कळ तसबिरी हिंदु-पुराणें व काव्यें यांतील प्रसंगांनाच अनुलक्षून काढलेल्या होत्या. कोठें श्रीगणेशाच्या शुंडादंडविराजित मंगलमूर्तीचें सुंदर चित्र काढलें होतें, तर कोठें दैत्यसंहारांत निमग्न झालेल्या कालिकादेवीची भैरवी मूर्ति चितारली होती. एके ठिकाणीं हिमालयावर श्रीशंकरांनीं केलेल्या मदनदहनाचें चित्र काढण्यांत आलें होतें, तर दुसऱ्या ठिकाणीं रति-विलापाच्या प्रसंगाची करुणाजनक तसबीर दिसत होती. कोठें आश्रमांतील हरिणांना गोंजारणाऱ्या वल्कलधारी शकुन्तलेचें चित्र काढलें होतें, तर कोठें गंभीर अरण्यांत विमल चंद्रप्रकाशांत वीणा घेऊन भगवान् शंकराला आपल्या विषादपूर्ण निशाकालीन संगीतानें आळविणाऱ्या महाश्वेतेचें चित्र दिसत होतें. एके ठिकाणीं अघोरघंट व कपालकुंडला या नरराक्षसांच्या हातून मालतीला सोडविणाऱ्या प्रणयी माधवाचें चित्र काढलें होतें. हीं सर्व चित्रें जहांगीर बादशहानें आपल्या प्रिय रजपूत पट्टराणीची हौस पुरविण्यासाठीं एका विख्यात हिंदु चित्रकाराकडून अतिशय पैसा खर्च करून काढविलीं होतीं. त्यांच्या चौकटी सुवर्णाच्या असून त्यांत मधूनमधून महामूल्य रत्नें जडविलीं होतीं. सारांश, सुंदर जोधबाईच्या सुंदर महालाला सर्वथैव शोभणारीं अशींच तीं सर्व चित्रें सुंदर होतीं!

महाराणी समोरच्या भिंतीवरील ज्या एका चित्राकडे या वेळीं मधूनमधून लक्ष्यपूर्वक पाहात होती, तें श्रीरामाच्या आज्ञेनें लक्ष्मणानें गर्भवती सीतादेवीला घोर अरण्यांत सोडून दिलें, या प्रसंगाला अनुलक्षून काढलेलें होतें. काय असेल तें असो; याच चित्राकडे जोधबाईचें सारें लक्ष्य आज लागून राहिलें होतें. मधूनमधून ती या चित्राकडे लक्ष्यपूर्वक पाही व एक दीर्घ सुस्कारा टाकी. मधूनमधून तोंडानें ती एका करुण गीताचें कडवें मृदु आवाजानें व अस्पष्टपणें घोळून घोळून ह्मणत होती. तिच्या हृदयांत आज एक गुप्त, मृदु व करुण संगीतोच्छ्वास वाहूं लागला होता! त्या ओघांतच तिच्या कंठांतून तें करुण संगीत आज बाहेर पडत होतें. मधूनमधून जवळच्या खिडकींतून जोधबाई सायंकाळच्या गगनाची शोभा विमनस्कपणें पहात होती. सूर्यनारायण अस्ताला जाऊन अंधकार आपल्या सहचरी निशादेवीला घेऊन वेगानें सरसावूं लागला होता. दूरच्या अंबरप्रदेशांत चमचमणाऱ्या दोन-चार तारकांकडेही जोधबाई मधूनमधून सतृष्ण नजरेनें

पाहात होती. परंतु तिच्या मनांत विचारांचे तरंग जोरानें उसळत असल्यामुळें एकेच ठिकाणीं तिचें मन रममाण होत नव्हतें. तसबिरीकडे पाहाण्याचा कंटाळा आला, कीं, बाहेर आकाशाची शोभा पहा, पुनः कांहीं तरी तोंडानें गुणगुण कर, पुनः तसबिरी पहा, याप्रमाणें जोधबाईची सारखी चळवळ चालली होती. मध्येंच ती जवळ ठेवलेल्या सुवर्णाच्या डब्यांतून कस्तुरी वगैरे सुवासिक द्रव्यांनीं युक्त असा लहानसा तांबूल बाहेर काढून, तो खाऊन आधींच रक्तोत्फुल्ल असणारे आपले ओंठ अधिकच लाल करून, शेजारीं ठेवलेल्या रुप्याच्या पिकदाणींत तांबुलाची लाल पिंकी टाकीत असे. तांबूलसेवनांत ह्मणजे जोधबाईच्या मनाला विशेष विरंगुळा वाटत होता असें नाहीं. तिच्या इतर व्यापारांप्रमाणें हाही एक व्यापार होता, इतकेंच !

' संध्याकाळ झाल्यानंतर तुझ्या महालांत येतों, ' असा बादशहाकडून जोधबाईला आज निरोप आला होता. त्याची येण्याची वाट पाहातच जोधबाई या वेळीं आपल्या महालांत बसली होती.' संध्याकाळ उलटून रात्र जसजशी अधिकाधिक सरसावूं लागली, तसतसें जोधबाईचें मन अधिकाधिक आतुर होऊं लागलें. आपला हृदयवल्लभ त्याच्या वचनाप्रमाणें आपल्या महालांत येतो कीं नाहीं, या आशंकेनें तिचें कोमल हृदय व्यथित होऊं लागलें होतें. बोलून चालून ती बादशहाची तब्बेत ! नाहीं लागली यायची लहर—किंवा दुसऱ्या एखाद्या बेगमेकडे जावयाचा मध्येंच तब्येतीला झटका आला, कीं आटोपला सर्व कारभार ! बादशहासारख्याची नाजूक चंचल लहर बिघडावयाला का वेळ लागत असतो ! उद्यां जहांगिराच्या जन्मोत्सवाला प्रारंभ होणार होता. सर्व आग्रा शहर उद्यां आनंदसागरांत नुसतें पोहूं लागेल. मोंगल पादशाहींत खुद्द दिल्लीपतीचा जन्मोत्सव ह्मणजे खरोखरच प्रचंड प्रमाणावरचा उत्सव असे. त्यांतून विलासप्रिय जहांगिराचा जन्मोत्सव फारच धामधुमीचा असे. त्याची राजधानी नाचगाणीं, आनंदप्रमोद, जलसे, मेजवान्या, दारूकाम, खैराती वगैरे मौजांनीं कांहीं दिवस नुसती फुलून जात असे. उद्यां जन्मोत्सवाला प्रारंभ होणार; तेव्हां आज बादशहाचें अन्तःकरण प्रसन्न असणार अशी जोधबाईची खात्री होती. आणि त्याच्या या मनःप्रसन्नतेची संधि साधूनच ती त्याला कांहीं नाजूक विनंति करणार होती. आणि या संधीला ती विनंति जहांगीर नव्याण्णव हिश्शांनीं बहुतेक मान्य करील अशी राणीची खात्री होती. ती होऊनच आज बादशहाला आपल्या महालांत यावयाचें आमंत्रण करणार, इतक्यांत वर सांगितल्याप्रमाणें खुद्द बादशहाचाच ' मी येतों ' असा तिला निरोप आला. हें पाहून जोधबाईला फार आनंद होणें साहजिक होतें. बादशहा ज्या अर्थी आपल्या महालांत आपण होऊन येतो आहे, त्या अर्थी आपलें काम खास फत्ते होणार, अशी शकुनगांठ तिनें आपल्या मनाशीं बांधली. मात्र काय विनंति करावयाची ती योग्य संधि पाहून आणि खाविंदाची तब्येत बहुत मर्जेंत असेल तेव्हांच केली पाहिजे असा जोधबाईनें मनांत विचार केला. परंतु, संध्याकाळ टळून गेली तरी देखील जेव्हां जहांगीर येण्याचें चिन्हही दिसेना, तेव्हां मात्र जोधबाई फार खिन्न झाली. निराशेनें तिचें हृदय अगदीं भरून

आलें. थोड्या वेळापूर्वी तिनें निर्माण केलेले हवेंतील किल्ले वरचेवर कोठें अदृश्य झाले !

खिन्न हृदयानें जोधबाईनें जवळच्या एका स्फटिकाच्या खुंटीवर टांगलेली वीणा खालीं काढली व आपल्या सुकोमल चंपक पुष्पतुल्य आरक्त अंगुलींनीं तिच्या तारा छेडून एक अवर्णनीय मधुर झंकार तिनें निर्माण केला. पुनः झंकार थांबवून जोधबाईनें दोन–चार पडदे वर खालीं केले व पुनः वीणेचा झंकार सुरू केला. अल्पकालांतच तिला पाहिजे होते तसे सर्व सूर सहज लागले. त्याबरोबर जोधबाईचें खिन्न झालेलें मन पुनः किंचित् प्रसन्न झालें. त्या रम्य व कोमल अंगुली पडद्यांवरून फिरूं लागून षड्ज, गांधार, रिखभ, धैवत, पंचम सुरांत मधुर संगीतालाप निघूं लागले. वीणा जसजशी मधुर वाजूं लागली, तसतशा क्षणभर सर्व चिंता नाहींशा होऊन जोधबाईचें अन्तःकरण अधिकाधिक प्रसन्न होऊं लागलें. वीणेच्या स्वराशीं जोधबाईनें आपला कोकिलस्वर विळविला व ती गाऊं लागली:—

" पियारे ! सैंया दिनवा बहुत गैल बीत !
जबसे गये मोरी, सुधहूं सो पियारो–
कोन गांवके रीत ?
पियारे ! सैंया दिनवा बहुत गैल बीत !
तन मन धन मोरा, तोंहीके सोंपहूं !
इह कैसे अनरीत ?
पियारे ! सैंया दिनवा बहुत गैल बीत ! "

क्रमाक्रमानें गायनाचा सूर अधिकाधिक उंच होत गेला. पंचम स्वरांत अलापांवर अलाप निघूं लागले. वीणा फारच गोड बोलूं लागली. तिचा व त्या सुंदर गायिकेचा जणूं एकजीव होऊन गेला होता ! जणूं काय ती आपलें स्वतःचें अस्तित्व विसरून जाऊन केवळ गानमयच होऊन गेली असावी, असें दिसत होतें. यमुनेच्या तीरावरील पुष्पसुवासित धीरसमीरण त्या गायनाच्या पंचमस्वराच्या माधुरीशीं मिश्रित होऊन, त्या पाषाणमय चित्रविचित्र महालांत इतस्ततः स्वच्छंदानें संचार करूं लागला ! मूर्च्छनातरंगांनीं युक्त असा तो गायनध्वनि महाराणीच्या दर्पणमंडित महालाच्या भिंतीवर आदळून त्याचा सुंदर प्रतिध्वनि होऊं लागला.

वरील प्रकार समाप्त झाल्यावर जोधबाई कांहीं वेळ स्तब्ध राहिली. एक दीर्घ निःश्वास टाकून तिनें समोरच्या भिंतीवरील सीतादेवीच्या त्या करुण चित्रपटाकडे दृष्टि लावली. त्याबरोबर तिच्या मनांत काय स्फूर्ति उत्पन्न झाली, कोणाला ठाऊक ! आपली वीणा घेऊन करुणस्वरानें ती पुनः गाऊं लागली:—

" त्यजिसि कसा मज विपिनीं ?
सदया ! त्यजिसि कसा मज विपिनीं ?
प्रिया ! दया नच लवहि तव मनीं ?
क्षणभरही तुझा विरह न सहवे,
कंठु कसें जीवितें तुजवांचुनि ?
भुवनीं सकलहि कृपा वितरसी,
निष्ठुरता परि धरिसी निजजनिं !
प्रेमें जरि मज धरिसि न हृदयीं,
दयिता तव ही परासुचि गणीं !
त्यजिसि कसा मज विपिनीं ? सदया !
प्रिया ! दया नच लवहि तव मनीं ? "

जोधबाई या गायनांत अगदीं तल्लीन होऊन गेलेली दिसत होती; इतकी कीं, जणूं काय या गायनांतील विरही नायिकाच ती बनली असावी असें तिच्या बाष्पगद्गद करुण स्वरावरून भासत होतें. तिच्या नेत्रांतून अश्रुबिंदु वाहत होते. शेवटीं, तिच्या

कंठांतून गायनाचे शब्द नीटपणें उमटेनासे झाले, तेव्हां वीणा खालीं ठेवून जोधबाई स्तब्ध बसली.

महालाच्या एका अर्धवट उघडलेल्या दरवाजाच्या पाठीमागें उभी राहून एक व्यक्ति जोधबाईचें गायन ऐकण्यांत अगदीं तल्लीन होऊन गेली होती. गायन संपवून महाराणीनें वीणा खालीं ठेवली व ती स्तब्ध राहिली तेव्हां ती व्यक्ति आंत शिरली. त्या व्यक्तीकडे या वेळीं जोधबाईची पाठ फिरली असल्यामुळें ती आंत आल्याचें तिला कळलें नाहीं. परंतु समोरच्या आरशांत त्या व्यक्तीचें प्रतिबिंब पडलेलें पाहून जोधबाई चमकून एकदम उभी राहिली. व त्या व्यक्तीच्या आगमनानें महाराणीला फार आनंद झाला असावा, असें तिच्या हर्षप्रफुल्ल मुखकमलावरून दिसत होतें. या वेळीं महाराणीच्या महालांत आलेली ही व्यक्ति दुसरी कोणी नसून स्वतः दिल्लीश्वर जहांगिराचीच ती स्वारी होती, हें चतुर वाचकांनीं तेव्हांच ताडलें असेल !

जहांगिरानें येतांच आपल्या चतुर प्रियेला आलिंगन देण्यासाठीं आपले बाहु पसरले व तो हंसत हंसत ह्मणाला:—"काय ह्मणालीस तूं ? "प्रेमें जरि मज धरिसि न हृदयीं—दयिता तव ही परासुचि गणीं ?" इतकें कांहीं अगदीं काकुळतीस यायला नको. ही पहा तुझी विनंति मीं मान्य केली !" असें ह्मणून त्यानें जोधबाईला प्रेमनिर्भर दृढालिंगन दिलें.

आपल्या प्रियपतीच्या बाहुपाशांतून आपल्याला लीनतेनें सोडवीत जोधबाई ह्मणते:—"हें काय बाई ! मी कांहीं आपणाला उद्देशून नव्हतं हें ह्मटलं हो-"

"तर मग आमच्या हातून हा मोठा गुन्हाच झाला ह्मणावयाचा ! हृदयेश्वरि ! या वयांत—सर्व सुखें अनुकूल असतांना—तुजवर शोकाचा अन् विरहाचा असा प्रसंग तरी कोणता आला होता बुवा ?"

आपल्या वस्त्राचा पदर तोंडांत धरून महाराणी हंसत हंसत ह्मणाली:—"आपणाला मीं मघाशींच सांगितलं आहे जहांपनाह ! हा विरह कांहीं माझा नाहीं, अन् परमेश्वरकृपेनं त्याचं काळं तोंड मला कधींहि न दिसो ! हा विरह मी उसना आणला आहे बरं !"

जहांगीरशहा हंसून ह्मणतो:—"ठीकच आहे. तुह्मां मारवाड्यांना उसनें देण्याघेण्याशिवाय अन् व्याजबट्ट्याशिवाय दुसरें काय सुचावयाचें आहे ? पण खरेंच प्रिये ! तुझीं दोन्ही गाणीं मला आज फारच गोड लागलीं बुवा !"

जोधबाई खालीं मान घालून विनयानें ह्मणाली:—"अगबाई ! तर मग स्वारी मघांपासून लपून ऐकत होती वाटतं माझं गाणं!"

महालाच्या उघड्या खिडकींतून हळूच प्रवेश करणाऱ्या यमुनातीराच्या मृदु वायूच्या लहरींनें या वेळीं त्या सुंदरीचा केशकलाप किंचित् आंदोलित होत होता. महालांतील अनेक चित्रविचित्र दीपांचा उज्ज्वल प्रकाश अवकुंठनवस्त्रांतून बाहेर पडलेल्या त्या सुंदर मुखावर पडून तें अधिकच सुंदर दिसत होतें. त्या सुंदर मुखाचें चुंबन घेऊन जहांगिरानें जोधबाईला पलंगावर आपल्या शेजारीं बसविलें व तिच्या मुक्त केशावरून हात फिरवीत प्रेमादरानें तिला विचारलें:—"आज बरेच दिवसांत आपल्या महालांत यायला मला फुरसत सांपडली नाहीं, असें जर आपणाला मीं सांगितलें तर तें खरें वाटेल कां आपणाला राणीसाहेब ?"

" हो न वाटायला काय झालं ? पण त्याबद्दल आतां गोष्ट कशाला ? आपली ही सवय नेहमींची आहे, अन् त्यानंतरची ही बतावणीही नेहमींचीच आहे महाराज ! आपलं येणं आज अगदीं वेळेवर झालं, नाहीं तर आज मी आपणाला बोलावणंच धाडायचा विचार केला होता."

" ठीक ठीक ! इतकें कसलें बुवा आमच्यावांचून आपलें काम अडलें आहे ?"

" उद्यांपासून आपल्या जन्मोत्सवाला प्रारंभ होणार. उद्यां जिकडे तिकडे सर्व दीन दुनिया आनंदप्रमोदांत दिवस घाल विणार. उद्यां दीन दरिद्री याचकांना त्यांच्या इच्छेनुरूप भिक्षा मिळेल–"

" बरें मग ? माझ्या जन्मोत्सवाचें तूं चांगलें वर्णन करते आहेस–' कवि ' बनायचा तर विचार नाहीं आपला ? "

बादशहाच्या विनोदाकडे फारसें लक्ष्य न देतां जोधबाई पुढें ह्मणाली:–" मी सर्व भरतखंडाची महाराणी–आपली पट्टराणी–उद्यांच्या उत्सवानिमित्त आपणापाशीं एक भिक्षा मागणार आहे. "

" कसली भिक्षा ? दिल्लीश्वरी अशी याचना तरी कसली करणार ? महाराणीला काय कमी आहे ? " जोधबाईची हनुवटी धरून जहांगीर हंसत ह्मणतो.

" पण माझी उपेक्षा तर नाहींना होणार इकडून ? "

" सांग–सांग. महाराणीला काय पाहिजे आहे ? "

" क्षमा ! "

" क्षमा ! कसली क्षमा ? क्षमा मागण्यासारखा असा तूं माझा अपराध तरी काय केला आहेस ? " बादशहानें किंचित् गंभीरतेनें विचारलें.

" नाहीं महाराज ! माझ्यासाठीं क्षमा नाहीं मी मागत ! "

जहांगिरानें आश्चर्यचकित होऊन विचारिलें " काय ? तुझ्यासाठीं क्षमा नाहीं मागत ? तर मग कुणासाठीं ? "

" माझ्या प्रियसखीसाठीं ! "

" तुझ्या सखीसाठीं ? मोतीराणीसाठीं ? कां बरें ? तिनें माझा काय अपराध केला आहे असा ? खरें ह्मणशील तर तुझ्या मतियाला मीं किती तरी दिवसांत पाहिलें सुद्धां नाहीं ! "

" मी मतियाविषयीं नाहीं हें बोलत. तिचं आपणाला बरेच दिवसांत दर्शनही घडलं नाहीं हें मला माहीत आहे. "

" तर मग ही दुसरी कोण तुझी प्रियसखी ? "

" मतियाशिवाय दुसरीही एक माझी प्रियसखी आहे. "

" कोणती ?"

" तो मतियापेक्षांही मला प्रिय आहे खाविंद ! आतां आणखी किती दिवस आपण तिला अशा स्थितींत ठेवणार ? आपणाला तिची अर्जूनही नाहीं कां दया येत ? उंच वृक्षावरून मोठ्या कष्टानें कोमल फूल काढून शेवटीं अनादरानें त्याला लाथेलालीं तुडवून टाकणं हें अरसिकतेचं अन् निर्दयपणाचंही काम आहे–सरकार ! मी बोलतें याचा राग मानूं नये गडे ! "

महाराणी कोणाविषयीं बोलत आहे हें जहांगिराच्या ध्यानांत यावयास फार वेळ लागला नाहीं. मेहेरबद्दल जोधबाई आपली विनवणी करीत आहे हें तो समजला. या प्रसंगीं मेहेरबद्दल गोष्ट निघाली हें बरें झालें नाहीं, असें त्याला वाटलें. होतां होईल तों मेहेरउन्निसाबद्दलची गोष्टच तो

टाळण्याचा यत्न करीत असे, परंतु प्रस्तुत प्रसंगीं तो आपण होऊनच जोधबाईच्या महालांत झाला होता. ही संधि साधून महाराणीनें बादशहापाशीं मेहेरबद्दलची गोष्ट युक्तीनें काढली. अर्थात् तेव्हां त्याचा कांहींच इलाज चालण्यासारखा नव्हता.

बादशहा बराच गोंधळांत पडला. जोधबाईला आतां काय उत्तर द्यावें तें त्याला सुचेना ! परंतु आतां कांहीं तरी उत्तर दिलेंच पाहिजे, असा विचार करून तो विरक्तभावानें अडखळत महाराणीला ह्मणतो:—"याचसाठीं मला बोलावणें पाठवायचा विचार होता वाटतें आपला ? "

पतीच्या मुखाकडे तीक्ष्ण नजरेनें पाहात जोधबाई ह्मणाली:—"होय, जहांपनाह ! याचसाठीं हुजुरांना मीं बोलावणं धाडायचा विचार केला होता. सरकार ! आपल्या या दीन दासीला ही भिक्षा आपण नाहीं कां घालणार ? आपलं मन खास खास इतकं निष्ठुर नाहीं ! नाहींना गडे ? "

जहांगिराच्या हृदयांत जोधबाईच्या या भाषणानें चलबिचल उडून गेली. तो तिला कांहीं गुळमुळीत उत्तर देणार, इतक्यांत कांहीं गतगोष्टींची त्याला एकाएकीं आठवण झाली. तत्क्षणीं सर्व रंग फिरला ! बादशहाच्या मुखावर क्रोधाच्या चिन्हांचा उदय होऊं लागला; भ्रुकुटी वक्र झाल्या; दंत अधरोष्ठावर वारंवार आघात करूं लागले !

बिचारी जोधबाई घाबरूनच गेली ! परंतु या प्रसंगीं माघार घेऊन उपयोग नाहीं, मेहेरबद्दलची आपल्या पतीपाशीं तरफदारी करावयाला हाच प्रसंग योग्य आहे, असा विचार करून ती धैर्यानें बादशहाला ह्मणते:—"असं काय बरं खाविंद ? माझ्या प्रश्नाला उत्तर द्यायला कां बरं होत नाहीं ? माझी प्रार्थना आपण मान्य नाहीं कां करणार ? "

बादशहा किंचित् कर्कश स्वरानें ह्मणाला—"करीन, अवश्य करीन !—"

" कधीं बरं ? "

" कधीं ? तुला ठाऊक नाहीं ? ज्या दिवशीं लत्ताप्रहाराच्या गोष्टीचें मला विस्मरण पडेल, त्या दिवशीं ! समजलीस ? "

प्रकरण पुनः पूर्वरंगावर जात चाललें आहे, असें जोधबाई समजली. परंतु बादशहापाशीं योग्य व खरा वृत्तांत कळविण्याची संधि बरेच दिवसांनीं आज आली आहे, ती दवडणें मूर्खपणाचें होणार आहे, असें तिला वाटलें. ती धिटाईनें जहांगिराला ह्मणते:—" मेहेरच्या तोंडून ही गोष्ट आली असं आपणाला कोणीं सांगितलं ?"

" पियारीनें—पियारी बेगमेनें—"

महाराणीनें आश्चर्यभावानें विचारलें:— " अगबाई ! पण पियारीला हें कसं कळलं ह्मणतें मी ?"

जहांगीर संतापाच्या स्वरांत उत्तरला:— " कसें कळलें ? पियारी बेगम छद्मवेषानें वर्द्धमानला स्वतः गेली होती, अन् तुझ्या त्या प्रिय सखीच्या तोंडचे हे शब्द तिनें स्वतःच्या कानांनीं ऐकले आहेत !"

जोधबाई किंचित् चरकली ! परंतु तसेंच धैर्य धरून ती ह्मणते:—" पण पियारीला तरी इतकी नसती उठाठेव काय ह्मणून ? या भानगडींत पडायचं पियारीला कारण काय ?"

बादशहाचा क्रोधाग्नि अजून शांत झाला नव्हता. तो चिडल्यासारखें करून ह्मणाला:— " तें कसेंहि असो; तिनें मेहेरचे हे शब्द ऐकले हें खास !"

‘ तरी पण पियारीनं ही उठाठेव कां केली तें मला समजलं तर बरं होईल. ”

“ ऐक तर मग. आपल्या स्वतःच्या कांहीं कामाला पियारी राजमहालाला गेली होती. माझ्या मनाला संतोष होईल अशी कांहीं तरी खबर पाठविण्याच्या उद्देशानें राजमहालाहून ती मीर मुनशीबरोबर वर्द्धमानला गेली.”

“ कसली खबर खाविंद ?”

“ मेहेरसंबंधाची. ती रूपानें कशी आहे हें पाहून मला कळविण्याच्या हेतूनें पियारी तिकडे गेली होती. ”

महाराणी कांहीं वेळ स्तब्ध होती. नंतर ती आवेशानें बादशहाला ह्मणते:—“दासीला क्षमा असावी सरकार ! पियारीनं आपणांला अगदीं खोटं सांगितलं.”

“तिला खोटें सांगायचें कारण काय ?”

“ पियारी मेहेरची शत्रु आहे. ती तिला बरं कसं पाहणार ?”

“ पियारी खोटं बोलेल कदाचित्—परंतु लत्ताप्रहाराची हकीकत पूर्ण सत्य आहे, यांत संशय नाहीं. माझाहि या गोष्टीवर तुजप्रमाणेंच प्रथम विश्वास बसेना. परंतु ज्या दिवशीं मी गुप्तपणानं मेहेरला भेटायला गेलों—”

जोधबाई उत्तेजित स्वरानें मध्येंच ह्मणाली:—“ जहांपनाह ! तकसीर माफ. स्त्रियांच्या हृदयाच्या गंभीरतेची अन् उदात्ततेची स्त्रियांना जितकी माहिती असते, तितकी पुरुषांना असणं शक्यच नाहीं. कदाचित् शहानशहांना सर्व साम्राज्यांतील खड्यान्‌खड्याची माहिती असेल, परंतु रमणीच्या हृदयाची त्यांना पूर्ण माहिती कधीं होईल असं नाहीं मला वाटत ! मेहेरचा स्वभाव मुळापासून अत्यंत अभिमानी आहे. अभिमानामुळं रमणीच्या कृतींत एका प्रकारची उपेक्षा येते, हें शहानशहांना मी सांगितलं पाहिजे असं नाहीं. परंतु ती उपेक्षा केवळ बाह्य असते. जगाला जरी ती अगदीं खरीखुरी वाटली, तरी तिचा उगम रमणीच्या अन्तःकरणापासून नसतो. सरकार ! त्यांतूनही एका बाबतींत आपणाकडून एक मोठीच—अक्षम्य—चूक झाली, असं ह्मणायचं मी धाडस करतें. मेहेर आपल्या अन्तःपुरांत कोणत्या स्थितींत आली, त्या वेळीं तिच्या हृदयाला कशा यातना होत होत्या हें आपणांला ठाऊक होतं—तशा स्थितींत मेहेरला भेटायला जाणं आपणाला सर्वथैव उचित नव्हतं. प्रेमालापांचा तो समय नव्हता. त्या वेळीं—तशा मनःस्थितींत—मेहेरपासून प्रेमवर्षावाची अपेक्षा करणं हीच आपली चूक—’

जोधबाईच्या या भाषणाचा जहांगीरशहाच्या मनावर फार परिणाम झाला असावा असें स्पष्ट दिसत होतें. बराच वेळपर्यंत आपल्या प्रियेच्या मुखकमलाकडे दृष्टि लावून तो स्तब्ध होता. मेहेरसंबंधाच्या आपल्या वर्तनांत कोठें तरी चूक आहे खास, असें जोधबाईशीं झालेल्या संभाषणावरून त्याला वाटूं लागलें होतें. मनुष्याची सदसद्विवेकबुद्धि जरी त्याला त्याचे प्रमाद स्पष्टपणें ओरडून सांगत असले, तरी ते स्वीकारणें त्यांच्या अगदीं जिवावर येतें. शक्य ते प्रयत्न करून—विवेकवाणीला दडपण्याची खटपट करून—आपल्या वर्तनाचें तो समर्थन करूं पहातो. प्रस्तुतचा प्रसंग त्यांतलाच होता. मेहेरजानसंबंधाचें आपलें वर्तन गर्हणीय होतें हें जोधबाईपाशीं कबूल करणें त्याला अगदीं कठीण वाटूं लागलें.

काांही वेळानें तो जोधबाईला ह्मणालाः— " बरें, आतां मी काय करावें, असें तूं ह्मणतेस ? "

जोधबाई अत्यंत नम्रतेनें ह्मणालीः—"दासीची याचना दुसरी कांहीं नाहीं—आपल्या पाशीं बोलायला मन कचरतें—पण—पण— "

महाराणीचे प्रेमभरानें चुंबन घेऊन शहा ह्मणालाः—" बोल बोल—वेडे-मजपाशीं बोलायला का इतके आढेवेढे ? "

पतीच्या मुखाकडे स्निग्ध दृष्टीनें पहात राणी ह्मणालीः—" उद्यां आपल्या जन्मोत्सवाचा मंगल दिवस. उद्यां सर्व अन्तःपुर आनंदसागरांत पोहत असेल. सर्व बेगमांच्या अमोदप्रमादाला उद्यां नुसता पूर येईल. जहांपनांहांच्या कृपेंतील अनेक अमीरउमरावांच्या स्त्रिया, मुली आणि भागिनी यांच्या समुदायानें सारा रंगमहाल उद्यां फुलून जाईल. सगळ्या अन्तःपुरांत फक्त मेहेरनेंच तेवढें उदासीन अन् दुःखी राहावें, हें खाविंदांच्या कोमल अन्तःकरणाला तरी बरं वाटतं का ! निदान ही गोष्ट तरी बरी दिसते का ? या गोष्टीचा आपण एकवार विचार तरी करावा. प्राणनाथ ! हृदयेश्वर ! चिरदुःखी मेहेरला उद्यांच्या आनंदोत्सवाचें स्वतः निमंत्रण देऊन आपण सर्व बेगमांपेक्षां तिचा अधिक आदर करावा अशी या दासीची आपणाला नम्र प्रार्थना आहे."

जहांगिरच्या मनांत या वेळीं कांहीं कल्पना येऊन तो किंचित् हंसला. जोधबाईकडे पाहात व्यंगोक्तीच्या स्वरानें तो तिला हंसत हंसत ह्मणतोः—" ठीक आहे—ठीक आहे—तुझ्या ह्मणण्याप्रमाणें उद्यां करतों, खुद्द तुझ्यापेक्षां देखील तिचा मी उद्यां अधिक आदर करतों. राणीसरकारांना फक्त मला एवढेंच विचारायचें आहे, कीं, तिला मीं अधिक मान दिला किंवा तिला मीं अधिक प्रेम दाखविलें तर आपल्या कोमल अन्तःकरणाला कांहीं यातना व्हावयाच्या नाहींत ना ? बेगमांच्या मेळ्यांत आपणाला मूर्च्छा तर नाहीं येणार ? हो, सांगून ठेवा—ह्मणजे दरबारच्या सर्व हकीमांना आपल्या औषधांनिशीं उद्यां जय्यत तयार राहायचा हुकूम देतों."

जोधबाई गंभीर भावानें उत्तरली— " नाहीं—सरकार—बिलकुल नाहीं. मी आपली प्रियपत्नी—पट्टराणी ! मेहेरसाठीं सिंहासनाचा अर्धा भाग सोडण्यांत मला अनुपम आनंद होईल. आपण माझी परीक्षाच पाहावी. "

जोधबाईच्या या उदारतेचें जहांगिराला फार आश्चर्य वाटलें. तिच्याकडे स्नेहपूर्ण दृष्टीनें पहात तो स्वतःशीं ह्मणालाः— " शाबास प्रिये ! शाबास ! खऱ्या रजपूत कन्येला योग्य असेंच तूं उत्तर दिलेंस. तुझी ही उदारता पाहून स्वर्गांतील देवांगनाही आश्चर्यचकित होतील ! "

कांहींवेळ मनाशीं विचार करून शेवटीं कंपित स्वरानें जहांगीर जोधबाईला ह्मणालाः—" तूं कांहीं ह्मटलेंस तरी तुझी विनंति मला तूर्त मान्य करतां येत नाहीं. महाराणि ! मला क्षमा कर. "

आपले सर्व प्रयत्न विफल झालेले पाहून जोधबाईला फार वाईट वाटलें. ती अभिमानपूर्ण स्वरानें ह्मणाली—"छे छे ! जहांपनाह ! आपणांला असं हें वर्तन मुळींच शोभत नाहीं. हिंदुस्थानच्या या विशाल साम्राज्याचे आपण सार्वभौम नृपति, होय ना ? परम दयानिधि परमेश्वराचे आपण प्रतिनिधि ! आपणच स्वजनांवर जर

इतकी निष्ठुरता दाखवूं लागलां—आपल्या करुणाविहीन आचरणानं त्यांचा सर्व जन्म जर आपण प्रेमशून्य—निःसत्व करूं लागलों तर सर्व जग आपणाला काय बरं ह्मणेल ? भावी इतिहासलेखक आपलं नांव कलंकित नाहीं का करणार ? मेहेर खरोखर सर्व स्त्रीवृंदाचं शिरोरत्न आहे. त्या रत्नाचं खरं मूल्य आपणांला अजून समजलं नाहीं हें खरोखर दुर्दैव आहे ! महाराज ! तिची योग्यता आपणाला काय सांगूं ? इथं आल्यापासून ती मोठ्या हालअपेष्टांत दिवस कंठीत आहे. आज जवळजवळ एक वर्ष होऊन गेलं. अभिमानानं ती आपल्या अन्नाला बिलकुल स्पर्श करीत नाहीं. कलाकुसरीचीं कामं तयार करून, आपल्या दासींकडून तीं अमीरउमरावांच्या स्त्रियांना विकून त्या पैशानं आपला निर्वाह करत्ये. जहांपनाह ! आपल्या दासींना तिनं जो पोषाक दिला आहे, जे बहुमूल्य दागदागिने दिले आहेत, तसले पोषाक अन् अलंकार आपल्या कित्येक बेगमांपाशींही नसतील. खरोखर दिल्लीश्वराची पट्टराणी होण्याची योग्यता जर कोणा रमणीच्या अंगीं असेल, तर ती मेहेरच्याच अंगीं आहे हें खास ! "

बादशाही रंगमहालांत आल्यापासून मेहेरजान हालअपेष्टांत दिवस कंठीत आहे ही गोष्ट जहांगिराच्या कानांवर अद्याप आलीच नव्हती. ही गोष्ट खुद्द बादशहाला कोण सांगणार आणि एवढें धैर्य तरी कोणाच्या अंगीं होतें ? गोष्टींच्या ओघाच्या भरांत जोधबाईनें सांगितलेली मेहेरच्या दुरवस्थेची हकीगत ऐकून बादशहाला फार आश्चर्य वाटलें !

एकवार हृदयांत उद्भवलेल्या प्रेमाचा पूर्ण लोप कधींच होत नाहीं. मध्यंतरीं त्याचा प्रवाह कांहीं कारणानें क्षीण झाला, तरी तो कधींही पूर्णपणें शुष्क होत नाहीं. मेहेरबद्दल जहांगिराच्या मनांत जो अनुराग एकदा उत्पन्न झाला होता, तो या प्रसंगीं एकाएकीं उज्ज्वल झाला. त्याचें हृदय या अनुरागानें बरेंच मृदु झालें.

कोमल स्वरानें जहांगीर जोधबाईला ह्मणालाः—" प्यारी ! तूं मेहेरच्या महालांत जात असतेस वाटतें ?

" होय सरकार ! मी बहुतकरून दररोज एकदां तरी मेहेरच्या भेटीला तिच्या महालांत जात असत्यें. तिच्या नैसर्गिक अभिमानामुळं तिच्यानं माझ्या महालांत येववत नाहीं. मी तरी काय करूं ? माझं मेहेरवर प्रेम जडलं असल्यामुळं तिची दररोज भेट घेतल्याखेरीज माझ्यानं राहावतच नाहीं. एखादे दिवशीं तिचं दर्शन घडलं नाहीं तर मनाला अगदीं हुरहुर लागून राहिल्यासारखी होते ! "

जोधबाईच्या मुखाकडे पहात जहांगीर कांहीं वेळ निश्चल राहिला. त्याच्या मनांत कांहीं तरी परस्परविरोधी विकारांचें युद्ध चाललें असावें असें दिसत होतें. कांहीं वेळानें विचारमालिकेंतून जागा झाल्यासारखें करून तो कोमल स्वरानें आपल्या पत्नीला ह्मणालाः—" मेहेरची इतकी वाईट स्थिति आहे, हें मला अद्यापि कळलें नव्हतें. उद्यां या अपराधाबद्दल मीर मुनशीला चांगलें शासन केलें पाहिजे. एखाद्या राज्ञीप्रमाणें मेहेरचा उत्तम बंदोबस्त राहिला पाहिजे, असा मीं त्याला हुकूम दिला होता. "

" त्या बिचाऱ्याला व्यर्थ शासन काय ह्मणून ? या बाबतींत मीर मुनशीकडे तिळमात्र दोष नाहीं. "

"कां बरें?"

"स्वतः मेहेरनेंच मीर मुनशीला बादशाही तनख्याची आपणाला जरूर नाहीं म्हणून सांगितलं—मग तो तरी बिचारा काय करणार? एके दिवशीं मी मेहेरला विचारलं 'आपल्या दासींना तूं इतक्या ऐषआरामांत अन् सुखांत ठेवलं आहेस, अन् तूं स्वतः अशा हालअपेष्टांत कां दिवस काढतेस मेहेर?'"

बादशाहानें किंचित् आतुरतेनें विचारलें—:—"मग यावर तुझ्या प्रिय सखीनें तुला काय उत्तर दिलें?"

"ती मला गंभीरपणानं म्हणाली:—' या दासी माझ्या स्वतःच्या आहेत; म्हणून माझ्या इच्छेप्रमाणं यांना मीं सुखांत ठेवलं आहे—परंतु मी ज्यांची दासी, त्यांनीं मला ज्या स्थितींत ठेवलं आहे, त्या स्थितींतच मला राहिलं पाहिजे.'"

जोधबाईच्या मुखांतून निघालेले मेहेरचे हे करुणायुक्त अभिमानाचे शब्द ऐकतांच जहांगिराच्या हृदयांत कांहीं विलक्षण काल वाकालव झाली. आजपर्यंत मेहेरबद्दल त्याच्या मनांत जो तीव्र तिरस्कार होता, तो बराच कमी झाला. मेहेरच्या कृतापराधाचा कल्पित घाव त्याच्या अन्तःकरणावरून बहुतेक बुजून गेला. गतकालांतील अनेक गोष्टींचें उज्ज्वल चित्र जहांगिराच्या स्मृतिपटावर पुनरपि अंकित झालें. शरदृतूंतील पौर्णिमेच्या तेजोदस चंद्राप्रमाणें शोभणारें मेहेरजानचें यौवन—सौंदर्य त्याच्या मानसनेत्रांपुढें उभें राहिलें—तें त्याच्या नेत्रांपुढून क्षणमात्र हालेना! मेहेरच्या लावण्यनिरीक्षणात जहांगीरशहा गढून जाऊन त्याचें भान हरपलें! जों जों तो आपल्या मानसचक्षूंनीं मेहेरच्या लावण्याचें पान करूं लागला, तों तों त्याची गोडी अधिकाधिक वाढूं लागली. क्षणोक्षणीं ती सौंदर्यप्रभा अधिकाधिक प्रफुल्ल दिसूं लागली. मेहेरच्या लावण्यपानांत दंग होऊन गेला असतां बादशहा स्वतःशीं म्हणालाः—"मेहेर! प्यारी! तुझ्या सौंदर्याप्रमाणें तुझे गुणही स्वर्गीय आहेत काय? आजपर्यंत या रमणीरत्नाची उपेक्षा करणारा मी सर्व दीन दुनियेचा बादशहा असतांही खरोखर कंगाल भिकारी आहें—मेहेर—मेहेर! माझ्या या पापाचें प्रायश्चित्त मी घेईन तेव्हांच मला खरी शांति प्राप्त होईल."

कांहीं वेळानें तो महाराणीकडे पाहून खिन्नपणें म्हणालाः—"महाराणि! मला क्षमा कर. तुझी आज्ञा उद्यांच मला मान्य करतां येणार नाहीं. तूं सुचविलेल्या गोष्टींचा नीट विचार करून एकदोन दिवसांनीं मला काय करायचें तें मी करीन—"

"जहांपनाह! हृदयेश्वर! मेहेरला हा भयंकर अपमान वाटेल—या अपमानवज्रानं तिचं कोमल हृदय क्षणमात्रांत दग्ध होऊन जाईल. सर्व बेगमांना आपल्याकडून जन्मोत्सवाचं निमंत्रण जाऊन त्या आनंदसागरांत पोहत आहेत ही गोष्ट जेव्हां अभिमानी मेहेरच्या कानांवर जाईल, तेव्हां जन्ममहोत्सवांत आपली कुणीही दाद घेत नाहीं असें पाहून ती अभिमानाच्या भरात विषपान करून प्राणत्याग करील. प्रखराग्नीनें जळून गेलेली लतिका तिच्यावर कितीही पाणी शिंपलें तरी कधीं जीवन्त होईल का?"

जहांगिरानें महाराणीला कांहीं उत्तर दिलें नाहीं. यावेळीं त्याची कांहीं चमत्कारिक स्थिति झाली होती. त्याच्या हृदयाला शेकडों विंचवांच्या दंशाच्या अस-

हनीय यातना होत होत्या! त्या वेळीं तो जोधबाईला काय उत्तर देणार? त्याच्या कपाळावर शेंकडों घनांचे घाव ताडताड बसत होते, त्याचे डोळे अगदीं ताठून गेले होते. जोधाबाईचा एक शब्द विषदग्ध बाणाप्रमाणें जहांगिराच्या हृदयाचा भेद करित होता.

विचार करतां करतां जहांगिर स्वस्थानावरून मध्येंच ताडकन् उठला व कंपित स्वरानें जोधाबाईला ह्मणाला "परवां सकाळीं या प्रश्नाचें मी तुला उत्तर देईन. आज माझें डोकें अतिशय दुखत असल्यामुळें मला कांहींच बोलतां येत नाहीं."

एवढे शब्द कसेबसे बोलून जहांगिर तेथून वेगानें निघून गेला. आपल्या पत्नीच्या मुखाकडे पहाण्याचेंही त्याला साहस झालें नाहीं.

जहांगीराची ही अवस्था पाहून जोधबाईला फार समाधान झालें असावें असे दिसलें. बादशहा गेलेल्या दरवाजाकडे पहात किंचित् हंसून ती ह्मणते:—"आज बरंच यश आलं ह्मणायचं!—पुढं कांहींही होवो—आज स्वारीला मात्रा चागली लागू पडली यांत कांहीं संशय नाहीं!"

---

## प्रकरण अकरावें.

### सैतान-सैतानी!

आग्र्यापासून कांहीं अंतरावर एक लहानसें जंगल होतें. जंगल लहान खरें, परंतु मोठमोठया वृक्षांनीं व गुल्मलतादिकांनीं तें असें व्यापून गेलें होतें, कीं, प्राचीन दंडकारण्यासारख्या प्रचंड व भीषण अरण्याला तें पूर्णपणें योग्य अपत्य शोभण्यासारखें होतें. या अरण्यांत एक अगदीं मोडकळीस आलेली लहानशी मशीद होती. मशिदीचें भयाण स्वरूप भोंवताल्च्या भयंकर जंगलाला सर्वथैव साजण्यासारखेंच होतें. या भग्न मशिदींत आज अनेक वर्षांपासून सेलीमशहा नांवाचा एक वृद्ध फकीर रहात असे. सेलीमशहा हा सर्वज्ञ असून भूतभविष्य पूर्णपणें जाणतो अशी जिकडे तिकडे त्याची ख्याती होती. परंतु अशा उलंग फकीरांना साजेशा लहरी व तामसी स्वभावाचा सेलामशहा असल्यामुळें त्याच्याकडे भूतभविष्य जाणण्यासाठीं फारसें कोणीही येत नसे. अगोदरच तें जंगल भयंकर; त्यांतून भूताखेतांची त्या अरण्यांत वस्ती असून भर दिवसाही तेथें त्यांचा यथास्थित धुडगूस सुरू असतो असा चहूंकडे प्रवाद होता. या दोन तीन कारणांमुळें सेलीमशहाला लोकांकडून कधीं फारसा उपसर्ग पोंचत नसे. भर दोनप्रहरींही त्या अरण्याकडे जावयाला मोठमोठ्या 'धैर्यवंतां'ची छाती होत नसे, मग लुंग्यासुंग्या भेकडरावांची काय कथा?

सेलीमशहा हा विलक्षण प्रकृतीचा मनुष्य होता, यांत संशय नाहीं. तो धर्मशास्त्रांत मोठा प्रवीण असल्याबद्दल त्याची चहूंकडे कीर्ति होती. अकबर बादशहा मोठमोठया धर्मज्ञ पंडितांची सभा भरवीत असे, त्या सभेला सेलीमशहा कधीं कधीं जात असे. त्या सभेंत त्याचा फार उच्च दर्जा होता. अकबर बादशहा मृत्यु पावल्यानंतर मात्र सेलीमशहाला शहरांत प्रवेश करतांना कोणीं कधीं पाहिलें नाहीं. तो जरी मुसलमान फकीर होता, तरी हिंदु-ज्योतिषशास्त्रांत त्याची विलक्षण गति होती. मात्र त्याच्या या पारंगततेचा उपयोग फारसा कधीं कोणाला

होत नसे. झालाच तर अगदीं एखा-द्यासच होईल !

सूर्य मावळून दोन-अडीच घटका होऊन गेल्या होत्या. भर दोनप्रहरीं सूर्य-नारायण पूर्ण दिमाखानें तळपत असतांही ज्या ठिकाणीं अंधकार त्याची पर्वा करीत नव्हता, त्या ठिकाणीं, सूर्य अस्तास गेल्यानंतर त्यानें आपलें करडें साम्राज्य स्थापल्यास नवल तें काय ? आपल्या कृष्ण-वर्ण वस्त्रानें रात्रीनें सर्व प्रदेश झांकून टाकला होता. रात्रिकीटक व कोल्हे, भालू वगैरे पशूंनीं आपल्या कर्कश शब्दांनीं तो भयाण वनप्रान्त अधिकच भीषण करून सोडला होता.

अशा भयंकर वेळीं, भग्न मशिदींतल्या एका लहानशा दालनांत एका मिणमिण करणाऱ्या दिव्याजवळ सेलीमशहा बसला होता. त्याच्यापुढें एक धुळीची पाटी असून तीवर आपल्या हातांतील काष्ठशला-केनें आंकडे मांडण्यांत व पुनरपि ते पुसून टाकण्यांत तो अगदीं गढून गेला होता. त्या मिणमिणणाऱ्या दिव्याच्या क्षीण प्रका-शामुळें फकीराचें गंभीर मुखमंडल अधिकच गंभीर दिसत होतें. फकिराजवळच एक अत्यंत रूपशालिनी कोमलांगी तरुण रमणी बसली असून त्याच्या प्रत्येक हालचालीकडे—विशेषत: त्याच्या मुखावरील क्षणोक्षणीं बदलणाऱ्या भावांकडे—अगदीं लक्षपूर्वक पहात होती. त्या सुंदरीचें रमणीय मुख-मंडल चिंताक्रांत दिसत होतें खरें; परंतु, त्या चिंतेमुळें व स्तिमित दीपप्रकाशामुळें तें फारच गोड दिसत होतें. जणूं काय, त्या लावण्यप्रभेच्या अपूर्व रूपप्रभावा-मुळेंच तो दिवा लज्जित होऊन आपलें लज्जास्पद अस्तित्व खिन्न हृदयानें कसें तरी कंठीत होता !

कांहीं वेळानें सेलीमशहाचें गणित पुरें झालें. हातांतील शलाका खालीं ठेवून, आपलें मुख वर करून स्थिर दृष्टीनें त्यानें त्या सुंदरीकडे पाहिलें व हळूच एक नि:श्वास सोडला.

कोकिळेच्या स्वरालाही लाजविणाऱ्या आपल्या मधुर कंठानें सुंदरीनें सेलीम-शहाला विचारलें:—" काय ? झालं का आपलं गणित ? "

" होय माई ! "

" आपलं गणित काय सांगतं आपणाला ? "

फकीर गंभीर भावानें ह्मणाला:—" तुझा इष्ट हेतु कधींही सिद्धीस जाणार नाहीं, असें मला आढळून आलें. "

एक दीर्घ उसासा टाकून खिन्न स्वरानें तिनें विचारिलें:—" तर मग दिल्लीचं सिंहासन माझ्या अदृष्टांत नाहीं, असं आपलं ह्मणणं ? "

" होय माई ! दिल्लीचें सिंहासन तुला कधींही प्राप्त होणार नाहीं ! "

" कां बरं नाहीं ? "

" दुसरी एक परम भाग्यवती स्त्री तुझ्या अदृष्टाच्या आड येत आहे. ती आली नसती तर कदाचित् तूं राजसिंहा-सनाची अर्धभागिनी झाली असतीस—ती भाग्यवती स्त्री तुझ्या भाग्यपथांतून दूर——"

ती सुंदरी कर्कश स्वरानें मध्येंच ह्मणाली:—" ती माझ्या मार्गांतून दूर होईल. रस्त्यांतील कांटा आपण ज्याप्रमाणें दूर फेंकून देतों, त्याप्रमाणें तिला ठेंचून मी दूर फेंकून देईन ! "

सेलीमशहा दृढ स्वरानें ह्मणाला:—" अशक्य, अशक्य ! माई ! या भान-

गर्दीत तूं बिलकुल पडूं नकोस–ही गोष्टही तूं मनांत आणूं नकोस. ”

“ कां बरं ?”

“तें तुला कधींही साध्य होणार नाहीं.”

“ तें मी साध्य करीन–दैवालाही मी फसवूं शकेन !”

“ माई ! त्या नुसत्या बोलायच्या गोष्टी आहेत. मोठमोठे मी मी ह्मणविणारे राजे, अधिराजे, बादशहा दैवापुढें हार खातात, तेथें तुझ्यासारख्या यःकश्चित् अबलेचा पाड काय? तो नाद तूं सोडून दे–दिल्लीचें सिंहासन तर तुला कधींही प्राप्त होणार नाहीं–त्या हवेंतील बुडबुड्याकरितां नारीहत्येचें भयंकर पातक जोडून तूं नरकाचें साधन करून ठेवणार काय ? ”

सेलीमशहाचे हे शब्द ऐकतांच त्या तरुणीच्या अंगावर कांटाच उभा राहिला ! ती खिन्न स्वरानें अडखळत अडखळत म्हणाली:–“ तर मग प्रभो ! माझें पुढें होणार तरी काय? माझ्या अदृष्टांत कोणता परिणाम लिहिला आहे ? सांईजी! मनस्तापाच्या प्रचंड धगधगींत माझें हृदय जळत आहे !”

“ परिणामाची गोष्टही काढूं नकोस–ती ऐकलीस तर भयानें तुझा येथल्या येथेंच अंत होईल !”

खिन्नतेनें किंचित् हंसून ती रमणी फकिराला ह्मणते:–“ महाराज ! माझ्या हृदयांत भयाचा जर लवलेश असता तर रात्रीच्या अशा या भयंकर वेळीं या पिशाचपूर्ण किर्र अरण्यांत दिल्लीश्वराची ही प्रियतमा आपल्याकडे आलीच नसती ! रमणीचें कोमल हृदय प्रत्यक्ष प्रलयकालीही भय पावणार नाहीं. सांईजी ! कसलीही शंका मनांत न धरितां माझ्या नशिबीं काय आहे, तें मला सांगा. ”

सेलीमशहा गंभीरपणानें ह्मणाला:–“ असें असेल तर मी माझ्या गणिताचें फल तुला सांगतों. तुझ्या अदृष्टांत अपघातानें भयंकर मरण दिसत आहे. ”

“ अगबाई ! ”

“ विषानें किंवा तीक्ष्ण खंजिरानें तुझें जीवन नष्ट होईल. ”

फकिराच्या या शब्दांनीं रमणीच्या अंगावर शहारे उठले ! तिच्या सर्व शरीरांतून विद्युत्तरंगाचे झटके खेळूं लागले. तिचें मस्तक भ्रमूं लागलें. भूगर्भांतील प्रचंड उत्तापानें आंतील पदार्थांमध्यें ज्याप्रमाणें मोठी खळबळ सुरू होते, त्याप्रमाणें कांहीं अनिर्वचनीय अशा यातनांच्या तापानें तिच्या हृदयांत खळबळ उडाली !

बसल्या जागेवरून ती ताडकन् उठून उभी राहिली व फकिराला ह्मणाली:–“ महाराज ! आपणाला ही दासी वंदन करिते. हिच्यावर आपली कृपादृष्टि असावी. मी येतें आतां. ”

सेलीमशहाही उठून उभा राहिला व करुण स्वरानें ह्मणाला:–“ काय ? तूं एकटीच जाणार माई ? रात्र बरीच झाली आहे. ”

“ हो, एकटीच जातें. त्यांत कसलें भय आलें आहे ? येथून जवळच माझी पालखी आहे. ”

“ नाहीं तर पाहिजे असल्यास मी येतों बरोबर. ”

“ नको सांईजी ! या दासीसाठीं इतकी तसदी घेण्याचें कांहीं कारण नाहीं–मी येतें आतां. ”

असें म्हणून सेलीमशहाला पुनः एकदा वंदन करून ती तरुणी हळूहळू जडपदानें तेथून निघून गेली.

सेलीमशहाच्या मशिदीपासून एक लहानसा नागमोडी रस्ता अरण्यांतून बाहेर निघून राजमार्गाला मिळत होता. त्या मार्गानें ती स्त्री जडांतःकरणानें हळूहळू चालली होती. तिच्या हृदयांत नानाविध विकारांनीं कल्लोळ उडविला होता. त्या कल्लोलामुळें रात्रिकीटकांच्या व इतर पशूंच्या शब्दांकडे, तिचें लक्ष्य जाणें बिलकुल शक्य नव्हतें. या विकार-युद्धाकडे तिचें अंतःकरण पूर्णपणें वेधलें गेल्यामुळें तिला त्या गहन वनांतही कसली भीति वाटत नव्हती. ती आपला मार्ग भरभर तोडीत होती.

मशिदीपासून कांहीं अंतरावर गेल्यावर आपल्या अंगावरील बहुमूल्य ओढणी मागून कोणी तरी ओढल्याचा तिला स्पष्ट भास झाला. परंतु त्याकडे लक्ष्य न देतां ती तशीच पुढें निघाली.

ती दोन चार पावलें „जाते न जाते तोंच पाठीमागून पुनः तिची ओढणी ओढून कोणीं मृदु शब्दानें तिला हांक मारली:- " बेगम पियारी ! "

रमणी चमकून तेथल्या तेथें थबकली. या गंभीर अरण्यांत अशा वेळीं आपणाला आपल्या नांवानें स्पष्ट हांका मारणारा कोण असावा, याची तिला कल्पनाच होईना. तिच्या हृदयांत चर्रर झालें !

इतक्यांत त्या अज्ञान व्यक्तीनें पुनरपि तिला हांक मारली:- " पियारी- " रमणीनें वळून मागें पाहिलें, तों आपादमस्तक वस्त्रानें परिवेष्टित अशी एक उंच मनुष्यमूर्ति तिच्या दृष्टीस पडली. ती दृष्टीस पडतांच रमणीचें हृदय मात्र थरारलें !

कंपित स्वरानें तिनें त्या मूर्तीला विचारलें:- " तूं आहेस तरी कोण ? एवढ्या रात्रीं या भयंकर ठिकाणीं माझी वाट अडविणारा तूं कोण आहेस ? "

घनगंभीर स्वरानें या मूर्तीनें तिला उत्तर दिलें:- " पियारी बेगम ! तूं मला ओळखीत नाहींस काय ? मी कोणीहि असलों तरी तुझा शत्रु खास नाहीं. मी तुझा हिताकांक्षी परम मित्र आहें, असें समज. पियारी ! दिल्लीनाथाची प्रियतमा तूं ! एवढ्या रात्रीं अंतःपुरांतून बाहेर पडून तूं कोणीकडे गेली होतीस ? "

पियारीनें किंचित् कर्कश वाणीनें त्या मूर्तीला विचारलें:- " दिल्लीश्वराची बेगम कुठं वाटेल तिकडे जायला तिची ती मुखत्यार आहे. मी कुठं गेल्यें होत्यें याची तुला काय पंचाईत ? "

मनुष्यमूर्ती विकट हास्य हंसून म्हणाली:- " मला काय पंचाईत ? पंचाईत आहे, म्हणून तर या वनमार्गांत गांठून तुला मी विचारतों. पण त्याबद्दल व्यर्थ वाटाघाट पाहिजे कशाला ? तूं कुठें गेली होतीस, तें मला ठाऊक आहे. पियारी ! मी तुला एवढें खात्रीपूर्वक सांगतों, कीं, प्रत्यक्ष सेलीमशहाला तुजवर जे उपकार करतां आले नाहींत, ते मला सहज करतां येतील. तुझ्या मार्गांतील कांटा मी नाहींसा करतों. यापेक्षां तुला मी अधिक काय सांगूं ? "

पियारी बेगम आश्चर्यानें थक्कच होऊन गेली ! आपली गुह्य गोष्ट पूर्णपणें माहीत असणारी ही विलक्षण व्यक्ति आहे तरी कोण ? पियारीला कांहीं सुचेना. अशा संकटांत ती कधींहि सांपडली नव्हती.

तरी ती बळेंच धैर्य धरून त्या विलक्षण व्यक्तिला मृदु स्वरानें म्हणते:-" तूं कोणीहि ऐस. एखाद्या अजाण पथिकावर सहजासहजीं विश्वास ठेवण्याइतकी कांहीं मी भोळी नाहीं हो! इथं सगळ्या गोष्टी बोलणं मला कांहीं बरं वाटत नाहीं. चल, मजबरोबर शहरांत चल."

ती व्यक्ति व्यंगोक्तीनें हंसून म्हणाली:- वा वा! छान युक्ति! मी तुजबरोबर शहरांत यावें अन् तूं मला अचानक राजपुरुषांच्या स्वाधीन करावेंस! युक्ति पण युक्ति आहे तुझी! पियारी! तूं जशी भोळी नाहींस, तसा मी देखील भोळा नाहीं. समजलीस? छे:! तूं म्हणतेस तसें होणें बिलकुल शक्य नाहीं. पियारी! हे पहा. वर अनंत नीलिमामय नभोमंडल विराजमान झालें आहे—त्या नभोमंडलाच्याही वर एक सर्वत्र अन्तर्यामी शक्ति वास करीत आहे. तिला साक्षी ठेवून तिच्या नांवानें आपण दोघेजण शपथ घेऊं या, कीं, कोणताही प्रसंग आला तरी कोणी कुणाचें अनिष्ट करायचें नाहीं! चल ये."

पियारी विचारांत पडली. बराच वेळ मनाशीं भवति न भवति केल्यावर तिनें अशी शपथ घेण्यांत कांहीं दोष नाहीं असें ठरविलें.

नंतर ती त्या अज्ञात व्यक्तीला म्हणते:- "तूं म्हणतोस तसं कां होईना. त्या अनंत शक्ति प्रभूला साक्षी ठेवून मी शपथ घेत्यें, कीं, कोणताही प्रसंग आला तरी तुझं मी कधींही अनिष्ट करणार नाहीं. झालं आतां? बरं, तुला आतां मजपासून पाहिजे काय अन् तूं आहेस कोण, तें तरी मला सांग."

ती व्यक्ति किंचित् कालपर्यंत अगदीं निस्तब्ध होती. नंतर कांहीं वेळानें ती पियारीला म्हणते:- "तुला आठवतें काय पियारी? तूं मेहेरउन्निसाला पहायला जेव्हां वर्धमानाला गेली होतीस, तेव्हां वृद्ध सेनापति रहमतखांच्या हुकुमानें वर्द्धमानपर्यंत तुला पोंचवायला तुजबरोबर कोण आला होता? मला वाटतें, तुझी स्मृति इतकी मंद खास नसेल!"

कांहीं वेळ विचारांत पडल्यासारखें करून पियारी म्हणाली:- "हो, न आठवायला काय झालं? सेनापति रहमतखांच्या हुकुमानं त्या वेळीं मजबरोबर वर्द्धमानला आला होता, त्याचं नांव रुस्तमअली. होय. सेनापति रुस्तमच! परंतु तो मरण पावला, असं आमच्या ऐकण्यांत आलं होतं."

ती व्यक्ति हंसून म्हणते:-"सेनापति रुस्तमअली मरण पावला नाहीं. बेगमसाहेब! हा पहा सेनापति रुस्तम तुमच्यासमोर उभा आहे."

रुस्तमला पाहून व त्याचें हें भाषण ऐकून पियारी बेगमेच्या अंगावर शहारे आले! सेलीमशहाच्या भग्न मशिदीसभोंवतालच्या अरण्यांत भुतेंखेतें रात्रंदिवस धुडगूस घालीत असतात, हा जनप्रवाद या वेळीं तिच्या डोळ्यांसमोर उभा राहिला. तिचें सर्व शरीर थरथरा कांपूं लागलें. भयभीत हृदयानें तिनें एकवार रुस्तमच्या धिप्पाड भव्य मूर्तीकडे निरखून पाहिलें. मनांतल्यामनांत पियारी नबीगणाच्या पवित्र नांवाचें स्मरण करूं लागली!

आपल्याशींच विचार करण्यांत निमग्न होऊन गेलेल्या रुस्तमला पियारी बेगमेची ही स्थिति कळून आली नाहीं. तो तिला कांहीं वेळानें म्हणतो:- "पियारी! मी मेलों

नाहीं. ज्याच्या हृदयात प्रेमसंजीवनी चिरकाल वास करते, तो कधींही मृत्यु पावत नाहीं. त्या येरझ्या रहमतनें मला कारागृहांत बंदिवान करून ठेविलें होतें. परंतु प्रेमाचें पांखरूं बंदिवान् स्थितींत कधींही राहात नाहीं. बेमालूम युक्ति लढवून मी कारागृहांतून पळून गेलों व तेव्हांपासून मी या गुप्तवेषानें चहूंकडे भटकतों आहें. रुस्तमच्या म्हणजे माझ्याच मृत्यूची बातमी मीच जिकडे तिकडे पसरून दिली. ज्याला आशा असते, तो मरणार तरी कसा पियारी?"

पियारी हंसून म्हणाली:—" अस्सं—अस्सं—आतां आलं माझ्या सारं लक्षांत ! बरं रुस्तम ! तुला पाहिजे तरी काय आतां? तूं भूत नाहींस हें खास !—परंतु सैतान मात्र आहेस ! असो, तुजवर आतां विश्वास टाकायला काहीं हरकत नाहीं. रुस्तम ! तुला काय पाहिजे ? "

रुस्तम उत्तेजित स्वरानें म्हणतो:—"मला काय पाहिजे ? जिच्यासाठीं माझें हृदय पळघडी घडघडां जळत आहे, जिच्यासाठीं मानापमान व गौरव यांच्यावर मी जलांजलि दिला, जिच्यासाठीं एखाद्या भुरट्या चोराप्रमाणें मी रस्तोरस्तीं सारखा वणवण भटकतों आहें, जिच्यासाठीं मला लपून आयुष्य कंठावें लागत असून दिवसाउजेडीं लोकांच्या वस्तींत मला तोंडही दाखविण्याची सोय राहिली नाहीं,—ती मला पाहिजे ! ती मला पाहिजे ! पियारी ! जिची तूं सांप्रत शत्रु बनली आहेस, ती—ती—मला पाहिजे ! "

" कोण ती रुस्तम ? "

" मेहेरउन्निसा ! "

रुस्तमच्या तोंडून 'मेहेरउन्निसा' हें नांव ऐकतांच पियारीचें हृदय चरकलें. रुस्तमला खरोखर वेड लागलें असावें, असें तिला वाटलें. रुस्तम म्हणतो काय, हें तिला मुळींच कळेना !

ती कंपित स्वरानें रुस्तमला म्हणाली:—"तूं म्हणतोस तें काम मजकडून कसं होणार ? माझ्या हातून या बाबतींत तुला काय साहाय्य होणार ? रुस्तम! तुला वेड तर नाहीं लागलं ? "

" होय ! मला मेहेरचें वेड लागून राहिलें आहे. पियारी ! तूं मला सहाय हो. बेगम पियारी ! अजूनपर्यंत तुझी कुणावर मोहबत जडली नाहीं. तुला प्रेमाचें पवित्र रहस्य कसें कळणार ? ऐश्वर्यावर, धनरत्नांवर, सिंहासनावर तुझी प्रीति ! म्हणूनच अशा या गंभीर निशाकालीं हें साहसकर्म करायला तूं प्रवृत्त झालीस ! माझें प्रेम मेहेरवर—त्या रमणीरत्नावर— जडलें आहे, म्हणून तिच्यासाठीं, मेहेर मला प्राप्त व्हावी म्हणून, हें दुःसाध्य दिसणारें काम मी करीन. तूं मला फक्त दुर्गांत येऊन जा अन् मेहेरचा महाल मला दाखवून दे, म्हणजे मी बाकीचें काम उरकतों. पियारी ! माझें एवढें काम तूं केलेंस, कीं तुझ्यासाठीं मी प्राणविसर्जन करायलाही तयार आहें."

रुस्तमचें हें भाषण पियारी अगदीं शांतपणें ऐकत होती. तिच्या मनांत नुकतीच एक सैतानी कल्पना उगम पावली होती, इतकेंच नव्हे, तर त्या कल्पनेला चांगलें परिणत स्वरूपही येत चाललें होतें. त्या कल्पनेची भावी सिद्धी तिच्या मनश्चक्षूंपुढें आतांच दिसूं लागल्यामुळें तिचें हृदय त्या वेळीं आनंदानें प्रफुल्ल होऊन गेलें होतें. एकंदरींत आपल्या कल्पनेला खरोखरीची सिद्धी प्राप्त व्हावी म्हणून सैतान रुस्तमला सहाय घेण्याचा त्या

सैतानीनें निश्चय केला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं जगताच्या दृष्टीनें जर मेहेरउन्निसा कलंकित ठरली, तर राजसिंहासनाप्रत नेणारा आपला मार्ग पूर्ण निष्कटंक झाला, हें उघड आहे—या एका कल्पनेच्या पायावर पियारीनें केवढी तरी जंगी इमारत रचली.

याप्रमाणें मनाशीं ठाम निश्चय करून ती रुस्तमला ह्मणाली:—"समज, तुझें ह्मणणं कबूल करून, कोणती ना कोणती तरी युक्ति लढवून मी तुझा दुर्गांत प्रवेश करविला, तर पुढें तूं करणार काय ?"

रुस्तम अत्यंत करुणापूर्ण स्वरानें ह्मणाला "पियारी ! मी दुसरें काय करणार माझ्या हृदयवल्लभेचें एकवार डोळे भरून दर्शन घेऊन मी धन्य होईन. जें दर्शन घडत नसल्यामुळें मी आजपर्यंत मृतप्राय बनलों होतों, तें दर्शन—एकवारच कां होईना,—मला मिळेल तर मी पुनरपि नरकलोकांतून मनुष्यलोकांत येईन. पियारी ! तुला प्रणयाचें रहस्य काय कळणार ? तुला सांगितलें तर तूं माझी कींव न करतां उलट थट्टा करशील मात्र ! हें पहा—माझ्या हातानें लावलेल्या एका जातीवंत गुलाबाचें मनोहर फूल ! याचा प्रेमोपहार माझ्या मनोगत प्रियेला देण्यासाठीं मी हें बरोबर घेतलें आहे. मेहेरजानचा या पुष्पाला एकदां तरी स्पर्श झाला ह्मणजे माझें जीवन मी धन्य मानीन ! पियारी ! केवळ एकवारच त्या रमणीचें मी डोळेभरून दर्शन घेईन आणि जिकडे वाट फुटेल तिकडे मी निघून जाईन. हें काळें तोंड पुनरपि मी कोणालाहि दाखविणार नाहीं."

पियारी उल्हासित चित्तानें ह्मणाली:—"ठीक ठीक ! चल तूं मजबरोबर. मी तुझा हस्तयुक्तीनं दुर्गांत प्रवेश करून देत्यें अन् त्या चेटकिणीचा महालही तुला दाखवित्यें. पण तूं या फकीर वेषानंच कां येणार तिकडे रुस्तम ?"

रुस्तम ह्मणाला:—"होय. या वेषानेंच मी तिकडे येतों. मी सेलिमशहाचा शिष्य आहें. निदान या नात्यानें तरी कांहीं लोकांना मी परिचय दिला आहे. जर माझ्या चौर्यकृतींत मी पकडला गेलों तर या वेषाच्या योगानें माझ्या अपराधाची तीव्रता लोकांना पुष्कळ कमी भासेल."

सेनापति रुस्तम प्रणयसमरांगणांतही चांगला कसलेला योद्धा आहे अशी पियारी बेगमेची खात्री झाली. त्याची ही युक्ति चांगली आहे असें तिला वाटलें.

"चल तर."

तो सैतान आणि ती सैतानी त्या घनदाट वनांतून गंभीर अंधकारांतून, आपला मार्ग काढित दुर्गाकडे निघालीं ! कोणाच्याही तोंडून एक शब्दहि फुटत नव्हता. उभयतांच्या अंतःकरणांत बाहेरील अंधकाराला साजेसे कृष्णविचार चालले होते !

कांहीं वेळानें हे दोघे पथिक राजमार्गाला येऊन मिळाले. जवळच बाजूला एक श्रीमान् अमीर एक नूतन मशीद बांधीत होता. मशिदीचें काम चाललें असल्यामुळें ठिकठिकाणीं लांकुडसामान, दगड वगैरे सरंजाम पडला होता. रस्त्याला लागूनच कांहीं मोठमोठे दगड पडले होते. त्यांपैकीं एकदोन चौकोनी तिकोनी दगड भारी जड होते.

जातां जातां पियारी त्या दगडांजवळ एकदम थबकली व रुस्तमकडे पाहून ती गंभीरपणानें त्याला म्हणते:—"रुस्तम ! जरा उभा रहा. तुझ्या बाहूंत शक्ति किती आहे, तें मला एकवार प्रत्यक्ष पाहूं दे."

पियारीचे हे उद्गार एकून रुस्तमला भारी आश्चर्य वाटलें. तिच्या म्हणण्याचा अर्थ काय तें त्याच्या लक्ष्यांत येईना! चंचल दृष्टीनें इकडे तिकडे पहात तो पियारीला म्हणाला:-"युद्धाचा व्यवसाय सोडून आज मला किती तरी दिवस झाले आहेत. प्रत्यक्ष प्रसंग आल्याशिवाय माझ्या बाहूंत हल्लीं किती शक्ति आहे तें आज मलाहि सांगतां येणार नाहीं."

"मी तुला तो प्रसंग आणून देतें. हा तिकोनी दगड उचलून पलीकडे टाक पाहूं."

पियारीच्या मनांत काय आहे, त्याचा अजूनही रुस्तमला थांग लागेना. तरी बेगमेच्या आज्ञेप्रमाणें तो प्रचंड दगड त्यानें सहज उचलून पलीकडे उडवून दिला!

रुस्तमच्या बाहूंत प्रचंड बल वास करीत आहे, हें पाहून पियारीला फार आनंद झाला असावा, असें दिसलें. ती त्याला म्हणाली "रुस्तम! दुर्गांत प्रवेश करण्यापूर्वीच माझ्यासमोर तुला एक प्रतिज्ञा केली पाहिजे."

रुस्तमनें आश्चर्यानें विचारलें "कसली प्रतिज्ञा पियारी?"

"दुर्गांत जावयाचा रस्ता मी तुला खुला करून देईन, त्याप्रमाणेंच दुर्गांतून बाहेर यावयाचा मार्गहि मी तुला खुला ठेवीन. मेहेरउन्निसाला घेऊन या मार्गानें तुला रात्रीच्या रात्रीं दुर्गाच्या बाहेर पडलें पाहिजे. या प्रचंड दगडापेक्षां एका कुसुमकोमल स्त्रीचा भार कांहीं अधिक नसतो. त्यांतूनहि त्या स्त्रीवर तूं प्राणांपलीकडेहि प्रेम करतोस—"

रुस्तम मध्येंच म्हणाला—"पियारी! मला असें करायला लावण्यांत तुझा काय उद्देश आहे, तें माझ्या स्पष्टपणें ध्यानांत आलें. निष्कलंक मेहेरजानच्या विमल कीर्तीला निंद्य कलंक—मग तो खोटा कां असेना—लावून तूं आपला राजसिंहासनाचा मार्ग निष्कंटक करूं पहात आहेस; परंतु पियारी! माझी त्या रमणीरत्नावर पवित्र मोहबत जडली आहे. माझ्या प्रियवल्लभेच्या जन्माचा सत्यनाश माझ्या हातून होणें तुला संभवनीय वाटतें काय? धिक्कार असो तुला!"

ती कालसर्पिणी क्षणमात्रांत रुस्तमवर उलटली! ती क्रोधकंपित स्वरानें ओरडली "तर मग तूं इथंच रहा—दिल्लीपतीच्या दुर्गांत त्यांच्या अन्तःपुरांत—तुझ्यासारख्या नीच हुजऱ्याचा प्रवेश होणं कधीं तरी संभवनीय आहे का?"

तेथून समोरच बादशाही दुर्गाचें कृष्ण प्रस्तरमय प्रचंड सिंहद्वार स्पष्टपणें दिसूं लागलें होतें. आतां धर्माधर्माची चिकित्सा करावयला रुस्तमला अवधि राहिला नव्हता. एके बाजूला घोर विरह दुसऱ्या बाजूला मधुर मीलन! एका बाजूला बेहेस्त, दुसऱ्या बाजूला जहान्नम! एके बाजूला पवित्र नबीवृंद—दुसऱ्या बाजूला परमपापिष्ट सैतान! हीं युग्में रुस्तमच्या मानसनेत्रांपुढें स्पष्टपणें उभीं राहिलीं. एका निमिषार्धाच्या अल्पावकाशांत या युग्मांच्या दोन बाजूंपैकीं एक बाजू स्वीकारणें रुस्तमला अवश्य होतें. शेवटीं सैतानाचा विजय झाला! रुस्तमनें सैतानाच्या चिरकालीन दास्याचा स्वीकार केला. पियारीच्या पापी प्रस्तावाप्रमाणें त्या पापिष्टानें शेवटीं प्रतिज्ञा केली!

कांहींही संकट न येतां पियारीच्या साह्यानें रात्रीं रुस्तमचा बादशाही दुर्गांत प्रवेश झाला!

## प्रकरण बारावें.

### प्रणयोपहार.

आणखी दोनतीन प्रहर गेले, एक-दांची ही दीर्घ रात्र सरून दुसरा दिवस उजाडला, कीं दिल्लीपतीच्या जन्ममहोत्सवास प्रारंभ होऊन सर्व आग्रा शहर आनंदसागरांत नुसतें पोहूं लागेल. वास्तविक पहातां दुसऱ्या दिवशीं बादशहाचा जन्मोत्सव, परंतु त्या रात्रींही जन्मोत्सवाच्या पूर्व तयारीनिमित्त सर्व शहरभर सारखी चळवळ सुरू होती. ठिकठिकाणीं ध्वजापताका, लतापल्लवांचीं मंगलमय तोरणें वगैरे उभीं करण्यांत प्रजाजन रात्रभर खपत होते. ती रात्र महोत्सवाची नसतांही महोत्सवाचीच असल्याचा निदान एखाद्या परकी वाटसरू मुसाफरास तरी भास होण्यासारखा होता.

खुद्द बादशाही रंगमहालांत तर खूपच घामधूम चालली होती. जी ती बेगम आपल्या महालाचा थाट इतर बेगमांच्या महालांपेक्षां नयनाकर्षक व्हावा, त्याच्या झकमकीनें व सौंदर्यानें बादशहाचें चित्त आपल्याकडे आकर्षिलें जाऊन त्याची मर्जी आपणांवर सुप्रसन्न व्हावी, म्हणून फार खटपट करीत होती. प्रत्येकीचा खरा हेतु हा, कीं, इतर सर्व बेगमांची पिछेहाट होऊन रंगमहालांत सर्वस्वी आपला एकटीचा वरचष्मा व्हावा! त्या रात्रीं कोठल्याही बेगमेला झोंप म्हणून नाहीं. उद्यां अमुक प्रसंगीं कोठलें वस्त्र कोठें परिधान करावें, ओढणी निळ्या रंगाची घ्यावी कीं किरमिजी घ्यावी; कोणता लहंगा आपल्या सौंदर्याला ज्यास्त शोभा आणील; उद्यां हिऱ्यांच्या, पाचच्या कीं मोत्यांच्या दागिन्यांचा साज घालावा; कोणता अलंकार कोणत्या तऱ्हेनें कोठें घातला म्हणजे आपलें अप्रतिम लावण्य इतर भिकारी बेगमांच्या भिकार रूपाचा तोरा नाहींसा करून त्यांना खालीं माना घालायाला लावील; आपलें सकल भूषणालंकृत मधुर सौंदर्य घासून पुसून नीटनेटकें कसें करून ठेवावें, म्हणजे बादशहा आपल्या महालाकडे धांव घेईल; इत्यादि प्रकारच्या सौंदर्यमूलक नानाविध चिंतांनीं रंगमहालांतील असंख्य रूपशालिनी बेगमांना अगदीं त्रासवून सोडलें होतें. सारांश, त्या रात्रीं सर्व आग्रा शहरांत कोणाला झोंप म्हणून लागली नाहीं! उद्यां आपणाला यथास्थित धनप्राप्ति होईल या आशेनें दीन दरिद्री लोकांना झोंप आली नाहीं. आपला मानमरातब वाढेल, पदगौरवाची वृद्धि होईल, बडी 'खेलात्' प्राप्त होईल या आशेनें अमीरउमराव व श्रीमंत लोक यांच्या डोळ्यांना डोळा लागला नाहीं! मात्र या सार्वजनिक जागरणांत दुःखाचा लेशही नसून सुख व आशा हींच त्याला कारण होतीं!

सर्व रंगमहालांत एक अभागिनी मात्र नेहमींप्रमाणें स्वस्थपणें झोंपी गेली होती. बिचारीला एकटीलाच जन्मोत्सवाचें निमंत्रण नाहीं, प्रियकराचें दर्शन नाहीं, प्रेम नाहीं, आदर नाहीं—कांहा नाहीं! नाहीं म्हणावयाला तिच्या वांट्यास त्या दिवशीं अनादर व उपेक्षा हीं मात्र भरपूर आलीं होतीं! यांचा सर्वच सांठा तिच्या नशिबीं आला होता. परंतु हा मोठा सांठा तिला मिळाल्याबद्दल कोणतीही मत्सरी बेगम तिचा मत्सर करीत नव्हती.

सर्व जगानें अनादर दाखविलेली अभिमानिनी मेहेरजान आपल्या महालांत

शय्येवर निजली होती. शय्येशेजारींच एक लहानसा दिवा मंदपणें तेवत होता. त्या दीपाच्या स्तिमित मंद प्रकाशांत मेहेरउन्निसाचें सुंदर, रमणीय परंतु चिंता रेखांकित मुखमंडल अधिकच शोभा धारण करीत होतें! खरा अस्सल हिरा 'कज्जलघनयुत' अशा अंधकारांतही चमकावयाचाच!

मेहेरच्या महालाचा दरवाजा उघडाच होता. उपेक्षित बेगमेच्या महालाकडे पहातो कोण आणि त्याच्याकडे लक्ष्य तरी कोणाचें जातें आहे? पियारी बेगमेच्या साहाय्यानें अन्तःपुरांत प्रवेश झालेला पापिष्ठ रुस्तम त्या उघड्या दरवाजांतून इकडे तिकडे पहात पहात हळुहळू चोरपावलें टाकीत टाकीत मेहेरच्या महालांत शिरला! महालांत शिरतांच त्या पापिष्ठाच्या पापी डोळ्यांना जें कांहीं दिसलें त्यानें त्याला भूल पडली—त्या भुलीनें तो वेडा बनला—त्या वेडानें तो चेतनाशून्य झाला! त्या वेडाच्या भरांत, त्या सौंदर्यलतिकेचें अगदीं निकट जाऊन दर्शन घ्यावें या हेतूनें रुस्तम एक पाऊल पुढें घाली—परंतु दहा पावलें तो मागें होई! त्याची दर्शनाची प्रबल पिपासा कांहीं केल्या शांत होईना! त्या अनिंद्य रमणीकडे निश्चल दृष्टीनें पहात असतां त्याच्या डोळ्याची पापणीही लवेना! जणूं काय, कदाचित् तेवढ्या अ-दर्शनाबद्दल आपणाला परमेश्वरापाशीं जाब द्यावा लागेल, अशीच रुस्तमाला भीति वाटत होती! अनिमिष दृष्टीनें कितीं वेळ पाहिलें तरी त्याच्या आतुर हृदयाची तृप्तीच होईना! अहाहा! महादेवाच्या ताब्यांत असणारें सारें सौंदर्य त्यानें याच मूर्तींत ओतलें काय? असेंच असेल तर या लावण्यखनीच्या लावण्यपानांत सर्व जन्म घालविला म्हणून हृदयाची तृप्ति कशी होणार? रुस्तम त्या मोहिनीनें पुरा पागल बनला!

रुस्तमच्या हातांत दिव्य सुगंधाच्या प्रफुल्ल गुलाब फुलांचा मनोहर गुच्छ होता. त्या उन्मादग्रस्ताच्या दुर्दमनीय हृदयाच्या दुराकांक्षांनीं परिपूर्ण असा तो प्रणयोपहार आपल्या हृदयवल्लभेला अर्पण करण्यासाठीं त्यानें आणला होता, हें वाचकांना माहीत आहेच. मेहेरच्या महालांत शिरल्यापासून रुस्तमला शंभर वेळां अशी प्रबल इच्छा झाली, कीं, तो कुसुमगुच्छ तिच्या हातीं देऊन तिच्याशीं प्रेमानें निदान दोन शब्द तरी बोलावे! मेहेरशीं तो बोलायला जाणार तों कोणी तरी अदृश्य शक्ति त्याचा गळा दाबून धरून त्याला जणूं काय म्हणे "छे छे! या देवरमणीच्या निद्राभंगाचें पातक आपल्या मस्तकावर घेऊं नकोस!" मेहेरच्या पुष्पकोमल अंगाला हळूच स्पर्श करून जगांतील स्वर्गसुख मिळवावें अशी त्या पापिष्ठाला कितीं तरी वेळ उत्कट इच्छा होई! परंतु ती होतांच कोणी तरी वैद्युतिक प्रचंड शक्तीनें जणूं काय त्याचा हात आंखडून धरीत असे! त्या रमणीच्या निसर्गसुंदर, सदोदित प्रफुल्लावस्थेंत असणाऱ्या कोमल कपोलभागांवर आपल्या गंभीर प्रेमाची खूण म्हणून आपल्या ओष्ठद्वयानें एक नाजूकशी चुंबनरेखा अंकित करावी अशी त्या अधमाला शतवार इच्छा होत असे—परंतु कोणी जणूं काय 'हां—पापिष्ठा! इतक्या दूरवर मजल नेऊं नकोस!' असा प्रबल शक्तीचा मूर्त मंत्र त्याच्या कर्णरंध्रांत ओतीत असे!

शेवटीं, उन्मादग्रस्ताच्या प्रबळ इच्छाशक्तींचा क्षणकालिक विजय झाला! तो प्रणयोपहार—कुसुमगुच्छ—घेऊन रुस्तम हळूहळू मेहेरजानच्या शय्येपाशीं गेला व तिच्या उशीवर, तिच्या गालाजवळ त्यानें तो ठेवून दिला. तिच्या गालाजवळ ठेवतांच जणूं काय लज्जेमुळेंच तो गुच्छ क्षणार्धांत म्लान दिसूं लागला! मेहेरच्या अगदीं जवळ जाऊन रुस्तम डोळे भरून तिजकडे पाहूं लागला—त्या भुवनमोहन, वेड लावणाऱ्या, सौंदर्यपूर्ण मुखमंडलावरून त्याच्यानें दृष्टि काढवेचना! प्रतिक्षणीं त्याच्या कलंकित हृदयांत वासनांचे विद्युत्तरंग आंदोलित होऊं लागले!

परंतु निमिषार्धांत त्याच्या मनानें उलट खाल्ली! पियारीपाशीं जी प्रतिज्ञा करून तो येथें आला होता, तीप्रमाणें आचरण करण्यास रुस्तमच्या हृदयांत धैर्यच नाहींसें झालें! नव्हे, ती प्रतिज्ञा अमलांत आणूं नये असाच त्यानें मनांत दृढनिश्चय केला. मेहेर निद्रावस्थेंत असतां तिला उचलून घेऊन तेथून निघून जाण्याची गोष्ट तर दूरच राहो, परंतु तिच्या, शरीराला नुसता स्पर्श करणेंही त्याला अशक्य वाटूं लागलें. जणूं काय कोणी तरी त्याच्या दृष्टीसमोरील पडदा उचलून नरकाचा भयंकर देखावा त्याच्या दृष्टीस पाडला असावा, अशीच तत्क्षणीं त्याची वृत्ति बदलली! नरकाचा तो बीभत्स देखावा पाहून पापिष्ठ रुस्तमच्या शरीरावर रोमांच उभे राहिले.

परंतु मनाशीं एक निश्चय ठरवून त्याप्रमाणें आचरण करावयास त्याला आतां पुरेसा वेळही नव्हता. आणखी यत्किंचित् विलंब झाला तर आपण येथल्या येथें ठार होणार अशी रुस्तमची पक्की खात्री होती. त्याच्यासाठीं पियारी थोडा अधिक वेळ बाहेर थांबून राहील हें तर शक्यच नव्हतें. मेहेरच्या सुंदर मुखकमलावरून मोठ्या कष्टानें दृष्टि काढून रुस्तम आशापूर्ण अतृप्त हृदयानें तेथून परत फिरला. त्याच्या हृदयांत वासनांचा प्रचंड अग्नि धगधगूं लागला! परंतु या वेळीं त्याच्या मनानें दृढनिश्चयच केला होता. पियारी बेगमेजवळ थोड्या वेळापूर्वीं केलेल्या प्रतिज्ञेला त्यानें लाथेनें दूर झुगारून दिलें!

तो अस्फुट स्वरानें म्हणाला "पियारी! राक्षसी! सैतानी! तुझ्यासमोर केलेल्या प्रतिज्ञेवर हा मी लत्ताप्रहार करतों पहा! मेहेर! मेहेर! प्यारी! हाय! तुझें सौंदर्य स्वर्गीय! तूं पवित्रतेची प्रत्यक्ष मूर्ति! तुजवर माझें किती प्रेम—पण जाउं दे! मेहेर! त्या राक्षसणीच्या चिथावणीनें तुझा सर्व नाश मी कसा करूं? हें तुझें शेवटचेंच दर्शन असेल तर असो! तुझ्या दर्शनाशिवाय सर्व जन्मभर मी मनाच्या तीव्र यातनांच्या अग्नींत दग्ध होईन—क्षणोक्षणीं होणाऱ्या मर्मान्तक तीव्र यातना सोशीन—परंतु त्या सैतानीच्या—पियारीच्या—प्रलोभनाला बळी पडून तुझा मी सर्वनाश कधींही करणार नाहीं!"

निद्रित मेहेरजानकडे पुनः एकवारही न पहातां रुस्तम येथून द्रुतपदानें निघून गेला!

* * *

मेहेरउन्निसाच्या महालांतून रुस्तम बाहेर पडला. तो इकडे तिकडे न पहातां ज्या ठिकाणीं पियारी बेगम त्याची वाट पहात रहाणार होती, त्या ठिकाणीं तडक आला. मेहेरच्या महालांत प्रवेश करतांना त्याच्या अन्तःकरणांत जी चलबिचल चालली होती, तिचा या वेळीं येथें मागमूसही नव्हता. मनांत केलेल्या

दृढनिश्चयामुळें त्याला एका प्रकारचें धैर्य आलें होतें व त्याची छटा यावेळीं त्याच्या मुखमंडलावरहि चांगली उमटली होती.

महालाच्या प्रवेशद्वाराशींच एक व्यक्ति उभी होती. ठरल्याप्रमाणें पियारी बेगम आपली मार्गप्रतीक्षा करीत तेथें उभी आहे असें रुस्तमला वाटलें. आपणाला विलंब झाल्यामुळें पियारी केव्हांच निघून गेली असेल असें जें आपणाला वाटलें होतें, तें खरें ठरलें नाहीं याबद्दल त्याला आनंद झाल्यासारखें दिसलें. यावेळीं पियारीची आपणाला भेट झाली तर फार चांगलें होईल, असें त्याला महालांतून निघाल्यापासन वाटत होतें.

'पियारी' जवळ जाऊन रुस्तम दृढ स्वरानें ह्मणालाः-" पियारी ! तेथें मला ठरल्यापेक्षां अधिक विलंब लागला याबद्दल मला क्षमा कर. मी असाच आलों याबद्दल तुला आश्चर्य वाटेल. मी तुला आतां साहाय्य करणें सर्वथैव अशक्य आहे."

पियारीला उद्देशून रुस्तम जें बोलला तें जणूं काय अरण्यरुदितवत् झालें! पियारी एक शब्दही बोलली नाहीं. वास्तविक ह्मटलें तर पियारी रुस्तमचें हें भाषण निमूटपणें ऐकून घेण्यासारखी बायको नव्हती !

रुस्तम पुनः म्हणालाः-" पियारी ! बोलत कां नाहींस ?"

तरीही पियारी स्तब्ध ! रुस्तमला भारी आश्चर्य वाटलें. तो पियारीकडे निरखून पाहूं लागला.

मेहेरच्या महालाबाहेर दीपप्रकाश नसल्यामुळें अंधकार होता. त्या अंधकारांत उभी असलेली व्यक्ति पियारी नव्हे अशी तत्क्षणीं रुस्तमची खात्री झाली. पियारी तर ठेंगणीठुसकी व कृशांगी होती, ही व्यक्ति उंच, धिप्पाड व बलिष्ठ दिसत होती. त्या व्यक्तीनें स्त्रीला उचित असा वेष केला नसन पुरुषवेष चढविला होता. तर मग ही पियारी नव्हे. हा कोणी तरी पुरुष ! रुस्तमच्या हृदयांत भयानें धडकीच भरली ! तो थरथर कांपूं लागला !

तेथें आल्यापासून रुस्तमची इतकी हालचाल आणि चलबिचल झाली-परंतु तो पुरुष अगदीं निश्चल होता. आपले तीव्र भेदक नेत्र त्यानें रुस्तमकडे लावले होते.

त्या अपरिचित पुरुषानें घनगंभीर स्वरानें रुस्तमला विचारलें," तूं कोण आहेस?"

रुस्तमच्या अंगावर कांटा उभा राहिला. अपरिचित व्यक्तीच्या प्रश्नाला उत्तर न देतां तो खालीं मान घालून स्तब्ध उभा राहिला.

त्या व्यक्तीनें पुनः दरडावून विचारलें, " कोण तूं ?"

रुस्तमनें कंपित स्वरानें त्याला उलट प्रश्न केला, "आपण कोण आहां ?"

त्या अपरिचित पुरुषानें रुस्तमच्या प्रश्नाचा कांहीं जबाब दिला नाहीं. चवताळलेल्या वाघाप्रमाणें तो रुस्तमजवळ गेला आणि आपल्या वज्रमुष्टीनें त्यानें त्याचा हात पकडला व क्रोधकर्कश स्वरानें तो ओरडला, " पापिष्ठा ! सैताना ! एवढया रात्रीं मेहेरउन्निसाच्या महालांत तूं कशाला गेला होतास ?"

हाय ! सर्व नाश झाला ! रुस्तमला तत्क्षणीं त्या मूर्तीची ओळख पटली. ती मूर्ति आणि तो स्वर त्याच्या पूर्ण परिचयाचा होता. त्या मूर्तीचें शेंकडों वेळां त्याला दर्शन झालें होतें; तो स्वरही त्याच्या कर्णरंध्रांत शेंकडों वेळ घुमला होता ! आपला मृत्यु आतां फार दूर नाहीं अशी त्या हतभाग्याची क्षणार्धांत खात्री झाली !

नरकलोकांचे भयंकर द्वार त्याला आंत घेण्यासाठीं खाडकन् उघडलें !

कांपत कांपत हात जोडून अस्फुट कंपित स्वरानें तो ह्मणाला:—" जहांपनाह ! दुनियाके मालिक ! शहानशहा ! या पापी अधमाधमाचा आपण अत्यंत क्रूरपणानें वध करावा. माझ्यासारखा नीच नराधम सर्व त्रिभुवनांत कोणीही नसेल. मी विश्वासघातकी—प्रभुद्रोही—पापिष्ठ— मला घोर मृत्युशिवाय दुसरें प्रायश्चित्त नाहीं ! "

मेहेरच्या महालाच्या दाराशीं उभी असलेली व्यक्ती कोण असावी, हें आतां वाचकांच्या ध्यानांत आलेंच असेल. ती छद्मवेषधारी व्यक्ति दुसरी कोणी नसून, खुद्द दिल्लीपति जहांगिराचीच स्वारी होती !

त्या दिवशीं संध्याकाळीं जोधबाईच्या महालांतून निघून गेल्यावर जहांगिराच्या मस्तकांत मेहेरबद्दलचे विचार भ्रमण करीत होते. जोधबाईच्या उपदेशानें त्याच्या हृदयांत लख्ख प्रकाश पडला होता ! मेहेरचें व आपलें पूर्वकालीन चरित्र त्याच्या स्मृतीपटावर जागृत झालें. तिची नयनमनोहर मूर्ति त्याच्या नेत्रांसमोरून कांहीं केल्या हालेना ! व्यर्थ कुशंका घेऊन त्या गुणवती रमणीला आपण हालांत ठेवलें, या विचारानें त्याच्या अन्तःकरणाला अनंत यातना होऊं लागल्या. या पापाचें प्रायश्चित्त घेतलेंच पाहिजे असा जहांगिरानें दृढ निश्चय केला. आज मेहेरचा आदरसत्कार करून स्वतः तिला जन्मोत्सवाचें निमंत्रण द्यावयाचें असा विचार करून तो गुप्त वेषानें तिच्या महालाशीं आला ! परंतु दुर्दैवराहूनें मेहेरच्या भाग्यचंद्राचा पिच्छा अजून सोडला नव्हता ! मेहेरच्या महालांतील शयनगृहाच्या दरवाजाशीं जहांगिर येतां, तो कांहीं विलक्षणच देखावा त्याच्या दृष्टीस पडला ! तो पाहून बादशहा जागच्या जागीं स्तंभितच झाला ! शय्यागृहाचें दार उघडें आहे व एक फकीरवेषधारी तरुण पुरुष मेहेरच्या शय्येजवळ उभा असून त्याचें मुख मेहेरच्या मुखकमलाच्या अगदीं निकट झालें आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें ! आश्चर्यमूढ होऊन जहांगीर त्या साहसी फकिराची कृति लक्ष्यपूर्वक पाहूं लागला. कांहीं वेळानें फकीर लवकरच महालाच्या बाहेर पडणार असें पाहातांच तो महालाच्या दरवाजाशीं काळोखांत येऊन उभा राहिला. या दाराशिवाय मेहेरच्या महालांतून बाहेर पडावयाला मार्ग नव्हता !

रुस्तमनें बादशहाला ओळखलें, तसें बादशहानेंही छद्मवेषधारी रुस्तमला ओळखिलें ! तो गंभीर स्वरानें म्हणाला:—" रुस्तम ! तूं खरोखरच नीच, कुलांगार आहेस. प्रत्यक्ष सैतानापेक्षांही तूं अधम आहेस! ज्या बादशाही अन्तःपुरांत मक्षिकेलाही शिरावयाला मार्ग नाहीं, त्या अन्तःपुरांत कोणाच्या साहाय्यानें तूं प्रवेश केलास? रंगमहालांतील कोणती निमकहारक बेगम तुला साहाय्य झाली ? बोल बोल ! पियारी बेगमेचें नांव तूं मघाशीं कां घेतलेंस ? "

रुस्तमनें कांहीं उत्तर दिलें नाहीं ! तो बिचारा या प्रश्नांला काय उत्तर देणार ? लज्जेनें खालीं मान घालून तो मुकाट्यानें जागच्या जागीं उभा होता. त्याचें सर्व शरीर भयानें कांपत होतें !

रुस्तमच्या तोंडून शब्द निघत नाहीं असें पाहून बादशहाचा क्रोधाग्नि भडकला. आपल्या वज्रमुष्टींत पकडून त्यानें ठेवलेला रुस्तमचा हात हिसडून त्यानें जोरानें झुगारून दिला व कंपित कंठानें तो ह्मणाला:—

" रुस्तम ! तुझ्यासारखा कृतघ्न तूंच ! तुझा बाप मोठा कीर्तिमान; दिल्लीच्या गादीची सेवा त्यानें इमानइतबारें केली; त्याचे अनेक अमूल्य गुण स्मरून लहान वयांतही मी तुला या योग्यतेला चढविलें. आपल्या बापाप्रमाणें तूंही माझा व माझ्या गादीचा गौरव वाढविशील अशी मला मोठा आशा होती ! परंतु काळसर्पा ! ज्यानें आजपर्यंत दूध घालून तुझें पालन केलें, त्याच्यावरच तूं उलटलास ! तुझ्यावर टाकलेल्या विश्वासाचें तूं खरोखर योग्य सार्थक करून दाखविलेंस ! जें माझें चिरवांछित रत्न–ज्याचें नुसतें दर्शन घ्यावयाचेंही अजूनपर्यंत मला साहस झालें नाहीं, तें रत्न चोरून न्यावयाचा तूं प्रयत्न करीत होतास ! मेहेरउन्निसाचें पवित्र शय्यनगृह तूं आज कलंकित करून टाकलेंस–तिचा पवित्र देह तुझ्या स्पर्शानें–"

रुस्तम उत्तेजित कंठानें मध्येंच म्हणाला:– " प्रभो ! दिल्लीश्वर ! मी तर पापीच आहेंच. परंतु माझ्या शब्दांवर आपला विश्वास बसेल काय ? परम पवित्र पैगंबर प्रभूच्या चरणांचें स्मरण करून सांगतों, कीं, मेहेरच्या पवित्र देहाला या अधमाधमाचा स्पर्श बिलकुल झाला नाहीं. माझ्यासारख्या नीच कावळ्याला त्या राजहंसीला स्पर्श करण्याचें साहस होणें शक्यच नाहीं. मीं डोळे भरून तिचें दर्शन मात्र घेतलें जहांपनाह ! नुसतें नेत्रांनीं दर्शन घेणें यांतही पाप आहे काय ? "

एखाद्या उन्मादग्रस्ताप्रमाणें रुस्तम याप्रमाणें बोलत असतां बादशहाचें लक्ष्य त्याजकडे होतें किंवा नाहीं हें सांगतां येणें मोठें कठीण आहे. त्याची भेदक दृष्टि रुस्तमकडे लागून राहिली होती खरी, परंतु त्याचें लक्ष्य परस्परविरोधी विचार–विकारांमध्यें भ्रमण करीत होतें. बादशहानें फिरून एकदा रुस्तमला प्रश्न केला, "बोल, खरें सांग अन्तःपुरांत प्रवेश करायला तुला कोणीं साहाय्य केलें ? "

आपल्या खऱ्या परीक्षेची वेळ हीच आहे असें रुस्तम समजला. पियारी बेगमचें नांव सांगून आपण चटकन् मोकळें व्हावें असें एक वेळ त्यानें मनांत आणलें परंतु तें क्षणमात्रच। सर्व मनोधैर्य एकवटून सारा संकटभार आपल्याच शिरावर घ्यावयाचा त्यानें निश्चय केला. कांहीं झालें तरी पियारीचा विश्वासघात करावयाचा नाहीं, असें त्यानें ठरविलें.

नम्रपणें गुढघे टेंकून रुस्तमनें बादशहाला प्रणिपात केला व अश्रुपूर्ण नेत्रांनीं तो त्याला म्हणाला:—" शहानशहा ! दीन दुनियाके मालिक ! या दीन दासाला क्षमा करा. आपणाला वाटेल ती भयंकर शिक्षा या अधमाला आपण द्यावी; ती आनंदानें सोसायला मी तयार आहें. परंतु हा प्रश्न आपण मला करूं नये. मी कोणाच्या मदतीनें अंतःपुरांत प्रवेश केला, हें माझ्या तोंडून कधींही बाहेर पडणार नाहीं. आपल्या कमरेला लटकलेल्या तरवारीनें माझ्या देहाचे आपण तुकडे तुकडे करून टाका–परंतु मी विश्वासघात कधींही करणार नाहीं. "

बादशहाचे डोळे रागानें गरगर फिरूं लागले. यःकश्चित् शिपुरडा आपणापुढें अशी वर्तणूक करील अशी जहांगिराची कल्पना नव्हती ! तो रागानें ओरडून म्हणाला:— "असा सुखकर मृत्यु तुला देणें म्हणजे तुझ्या अपराधाबद्दल तुला बक्षीसच देण्यासारखें आहे. तुला यापेक्षां किती तरी पटीनें भयंकर शिक्षा केली पाहिजे. तुला जिवंतपणीं अर्धा गाडून कावळ्या कुत्र्यांकडून तला फाडफाडन खावविलें पाहिजे; नंतर

तुझें शरीर अग्नीनें अर्धदग्ध करून तुझा भर रस्त्यावर फेंकून दिला पाहिजे. हीच शिक्षा मी तुला करतों."

अन्य प्रसंगीं ही क्रूर शिक्षा ऐकून रुस्तम भयानें कांपूं लागला असता. परंतु या वेळीं त्याला मनोधैर्याचें अपूर्व बल प्राप्त झालें होतें. बादशहाचे शब्द ऐकून तो बिलकुल डगमगला नाहीं.!

तो शांतपणें म्हणाला:–" प्रभो ! माझ्या नशिबीं हीच शिक्षा असेल तर तीही मी मुकाट्यानें सहन करीन. परंतु मी विश्वास-घात करणार नाहीं. एकवार माझ्या हातून विश्वासघात झाला आहे, हें खरें;परंतु त्याला अन्य कारणें आहेत. या क्षुद्र प्राणांकरितां मी तें पातक मस्तकीं घ्यावयाला आतां तयार नाहीं ! "

जहांगीर यावर कांहीं बोलला नाहीं. एक वेळ त्यानें रुस्तमकडे तुच्छतेनें दृष्टि मात्र फेंकली !

अल्पकालपर्यंत दोघेही निस्तब्ध होते. नंतर बादशहा तीव्र स्वरानें ओरडला "कोण आहे तिकडे ! "

बादशहाच्या आदेशाबरोबर दोघेजण काळेकभिन्न, धिप्पाड, प्रचंड शक्तीचे शिद्दी बादशहासमोर येऊन उभे राहिले व त्यांनीं त्याला नम्रपणें प्रणाम केला. त्यांना पहातांच आपणाला नरकलोकांत पोंच-विण्याकरितां हे प्रत्यक्ष कालदूत आले आहेत असें रुस्तम समजला. आतां मृत्यु अनिवार्य होता!

त्या शिद्यांना उद्देशून बादशहा म्हणाला:– " आतांच्या आतां याला घेऊन जा आणि हाबूजखान्यांत कोंडून ठेवा. याच्या दर्जाचा बिलकुल विचार न करतां याच्या पायांत जड लोहशृंखला घालून याला डांबून टाका. याचा न्याय काय करावयाचा तो पुढें करूं. सध्यां याला ही शिक्षा भोगूं द्या."

रुस्तमनें नम्रपणानें बादशहाला कुर्निसात केला. ते यमदूत त्याला ओढून नेत असतां जहांगीराला प्रणाम करून अश्रुपूर्ण नेत्रांनीं तो म्हणाला:—" प्रभो ! आपण दिलेली शिक्षा मला अगदीं शिरसा–प्रमाण आहे. परंतु आप-णाला शेवटची एक विनंति करायची आहे. मृत्यु माझ्या शिरावर विराजमान झाला आहे. मी पैगंबराला स्मरून आ-पणाला त्रिवार सत्य तेंच सांगतों. मृत्यु-च्याही पलीकडे माझ्या मस्तकावर तो जगदीश्वर–सम्राटांचाही सम्राट्–जागत आहे, तोच सर्व गोष्टींना साक्षी आहे. मेहेर-उन्निसा पूर्णपणें निष्कलंक आहे. माझा तिला स्पर्शही झाला नाहीं. तो सर्वसाक्षी परमेश्वरच याला साक्षी आहे—"

बादशहानें रुस्तमकडे पाहिलेंही नाहीं. ते दोघे शिद्दी त्याला घेऊन कारागृहाकडे गेले.

मेहेरच्या महालाकडे शून्यदृष्टीनें एकवार पाहून, आंत न जातां बादशहा तेथून जड हृदयानें निघून गेला.

---

## प्रकरण तेरावें.

### अनुताप.

जगांतील मनुष्यांची–राजांची, रंकांची श्रीमंतांची, गरीबांची–स्थिति कांहींही असो; त्यांना अनुपम सौख्य प्राप्त होवो, किंवा डोळ्यांतून ' अश्रुजलाचे पाट ' काढणारें भयंकर दुःख प्राप्त होवो,कालाला कोणाचीही पर्वा नाहीं ! कोणाच्या सुखदुःखाची तो तिळमात्र क्षिति बाळगीत नाहीं. त्याचा

प्रवाह शांतपणें सारखा सुरू असतो. कोणाचे दिवस सुखांत जातात, तर कोणाचे दुःखांत जातात. एखादा सार्वभौम बादशहा सम्राट्-पदावर विराजमान असतांही दुःखानें, चिंतेनें, आणि नानाविध मनस्तापांनीं दग्ध होत, आलेला दिवस कसा तरी कंठीत असतो, तर एखादा गरीब नांगऱ्या निढळाच्या घामानें मिळविलेली चतकोर भाकरी खाऊन मजेंत व आनंदांत दिवस काढतो. ज्याचे दिवस सुखांत जातात, त्याला वाटत असतें, कीं, सदासर्वदा आपले दिवस असेच सुखांत जाणार; ज्याच्या वांटणीला दुःखाचा कटु चषक आलेला असतो, तो मनुष्य आपल्या नशिबीं सदासर्वदा दुःखाचेच दिवस आहेत असें समजतो. परंतु कालचक्र हें कोणाच्या इच्छेवर अवलंबून नाहीं. त्याची गति सारखी—अव्याहत—चालू असते !

आज जहांगीर बादशहाच्या जन्ममहोत्सवाचा दिवस ! आपल्याबरोबर अपरिमित आनंद—आमोद—प्रमोद घेऊनच जणूं काय आजच्या दिवसानें आग्रा शहरांत प्रवेश केला होता ! सर्व शहर आनंदानें रंगून गेलें होतें. तो दिवस आनंदाचा, म्हणून कांहीं तो थोडा वेळ तरी लांबविण्याकरितां कालचक्रानें आपली गति थांबविली नाहीं ! तें सारखें फिरतच होतें. आपल्या गतीबरोबर तें तो आनंदाचा दिवसही घेऊन गेलें ! सूर्यास्त झाला, रात्र आली. उत्सवानिमित्त उभारलेलीं ध्वज—पताका—तोरणें व नगरांतील इतर सर्व शृंगार अजूनही बहुतेक जसाचा तसाच होता. सर्व आग्रा शहराला जो दिवस अत्यानंदाचा व सुखाचा गेला, तोच दिवस केवळ दोन व्यक्तींना फार दुःखाचा गेला ! सर्वांत महदाश्चर्याची गोष्ट ही कीं, ज्याच्या जन्मोत्सवानिमित्त जिकडे तिकडे आनंदीआनंद चालला होता, तो खुद्द जहांगीर बादशहा या दोन दुःखी व्यक्तींपैकीं एक होता ! आणि दुसरी व्यक्ति म्हटली म्हणजे, अनादरानें उपेक्षलेली, जिच्या वांटणीला निराशेची जहागीर आली होती, ती अभागिनी मेहेरउन्निसा ! आग्र्याच्या अतुलैश्वर्यसंपन्न भव्य राजप्रासादांत वास करणाऱ्या दोन व्यक्तींना—त्यांतूनही अखिल दीन दुनियेचा मालिक जो सम्राट् जहांगीरशहा, त्याला—आजचा दिवस अत्यंत दुःखाचा जावा हें आश्चर्य नव्हे काय? यालाच दुर्दैवविलास म्हणतात !

एक प्रहर रात्र होऊन गेली होती. बादशहाच्या जननोत्सवाची दंगल शहरांत अजूनपर्यंत थोडीबहुत चालूच होती. खुद्द रंगमहालांतील उत्सवाला आतां बरीच उतरती कळा लागली होती, असें म्हटलें तरी चालेल. बादशहाची मर्जी आपणावर ओढून घेऊन इतर बेगमांचीं नाकें चांगलीं ठेंचून टाकावयाचीं असा प्रत्येक बेगमाचा बेत असतांही जहांगीरच्या उदासीनतेमुळें रंगमहालांत निराशेची छाया पसरली होती. आजच्या मंगल दिवशीं खुद्द बादशहानें अशी उदासीन वृत्ति कां धारण केली असावी, याचा कोणालाही पत्ता लागेना ! रंगांत भंग झाला !

या वेळीं मेहेरउन्निसा आपल्या महालांत सुखासनावर बसली होती. तिच्या हृदयांत सुखाचा लवलेशही नसतां ज्या आसनावर ती बसली होती, त्याला 'सुखासन' असें नांव देणें हा वास्तविक त्या शब्दाचा दुरुपयोग करण्यासारखेंच आहे ! मेहेरच्या मनांत चाललेल्या खिन्न विचारांची छाया तिच्या विषण्ण मुखमंडलावर पडली होती.

मेहेरच्या मनांतील विचारमालिका या वेळीं पुढीलप्रमाणें होती:—

" हाय ! आज अगदीं कळसच झाला! सर्व सुखाशेचा आज पूर्ण लोप झाला ! आज सुखाचा दिवस मला येईल, उद्यां येईल, अशी आजपर्यंत मला आशा होती, परंतु आज शेवटचा आशातंतु तुटून गेला ! सर्व आग्रा शहर आज आनंदसागरांत बुडालें आहे. रंगमहालांतील प्रत्येक बेगम आज सुखशिखरावर विराजमान झाली आहे. प्रत्येक बेगमेला सुखी करण्यासाठीं शहानशहांची स्वारी झटत आहे, अन् मी मात्र दुःखाच्या डोहांत बुडावें, असें मीं कोणतें पातक केलं आहे ? मी अभागिनीनं बादशहांचा असा अपराध तरी काय केला आहे ? परमेश्वरा, नको—! या जन्माचा मला आतां अगदीं वीट येऊन गेला.—ज्यानं त्यानं माझा अपमान करावा, जिकडे तिकडे माझा अनादर व्हावा, सर्वांनीं मला उपेक्षेच्या दृष्टीनं पाहावं, हेंच माझ्या अदृष्टांत असावं काय ? या अनादराच्या स्थितींत, शुद्ध बंदिवासांत हें कंटाळवाणें आयुष्य कंठण्यापेक्षां नरकवासांत दिवस कंठणें खास वाईट नाहीं. हाय ! अदृष्ट !

" आजपर्यंत मी अशा स्थितींत दिवस काढले, तसे यापुढेंही प्राणान्त होईपर्यंत मी दिवस काढले असते; परंतु कोणच्या आशेवर मी जिवंत राहावं? मती ! प्रियसखी मतिलाही माझ्या दुर्दैवामुळं माझा विसर पडला.आग्र्यांत येऊन मी तुला वारंवार भेटत जाईन अशीं तिनं मला अनेकदा वचनं मात्र दिलीं, परंतु आपलं तोंड मात्र तिनं कधीं दाखविलं नाहीं,—माझं नशीबच फिरलं आहे. तेव्हां माझ्या जिवाची सखी देखील मजवर फिरली यांत नवल नाहीं !

" ज्या जीवनांत कांहीं आशा राहिली नाहीं, तें आतां तसंच कंठण्यांत तरी काय अर्थ आहे ? अनंत यातनांची ज्वाला हृदयांत धडधड पेटत असतां मनुष्य जिवंत रहाणं खरोखरच अनिष्ट आहे. या यातना सहन करण्यापेक्षां एका क्षणांत जर त्याला आपल्या जीवनाबरोबर यातनांचा अंत करतां येत आहे, तर त्यानें तो कां करून घेऊं नये ? मला आतां आशा, भरंवसा, प्रेम, आदर, सुख यांपैकीं कसलाही आधार राहिला नाहीं. मग हे जड झालेले प्राण आतां मीं कोणत्या आधारावर धारण करावे ?—छे: ! तें कांहीं नाहीं. अगदीं ठरलं—खास ठरलं. आजच्या आज हा जीवनदीप मालवून टाकावयाचा ! अन् मतियानं तरी मला काय सांगितलं आहे ? बादशहांनीं तुला अनादर दाखविला तर तूं खुशाल प्राणविसर्जन कर. आतां यापेक्षां अधिक अनादर तरी कोणता असणार ? आतां मीं आत्महत्या केली तरी मतिया कांहीं मला दोष देणार नाहीं. "

असे विचार चालले असतां मेहेरचा गळा दाटून आला. डोळ्यांतून अश्रुप्रवाह वाहूं लागला. तिनें हात जोडून सजल नेत्रांनीं एकवार वर पाहिलें. तिच्या चिंताकृश गंडयुगुलावरून जलधारा वाहत होत्या. तिचें हृदय मर्मभेदी यातनांनीं विदीर्ण झालं होतें—जीवन निराशेनें परिपूर्ण होऊन गेलें होतें—तिच्यासमोर एक लहानसा विषपूर्ण रौप्यपात्र होतें.

मेहेरची विचारमालिका पुनरपि चालू झाली:—" या वेळीं जिकडे तिकडे शांत होत आलं आहे. जवळपास कोणीही नाहीं.

सर्व दासींना आनंदोत्सवांत मग्न होण्याकरतां मीं सुटी दिली आहे, त्या बिचाऱ्यांना आपल्या धनिणीच्या मनाची आजची स्थिति ठाऊक असती, तर त्या मला इथं अशी एकटी सोडून गेल्या नसत्या. यापेक्षां अधिक सुंदर योग आतां मला कुठून मिळणार आहे? आजच्या आज या अनादरांतून, उपेक्षेंतून, दारुण यातनांतून आपली सुटका करून घेतली पाहिजे. हे जगदीश्वर! हे अंतर्यामिन्! हे दयामय! तूं अनाथांचा नाथ– अगतिकांची गति आहेस. तुझ्यापुढं राजे, महाराजे, बादशहा अन् हीन दीन कंगाल दोन्ही सारखेच आहेत! मी जगताच्या दृष्टीनें अनाथ उपेक्षित दीन अबला आहें, तरी तुझ्या दृष्टीनें कांहीं तशी खास नाहीं! हे कृपासिंधो! तूं मजवर दयाच दाखविशील! आतां हें दुःख, यातना, अनादर मला सहन होत नाहींत. या पात्रांतील हें सर्वदुःखहारी अमृत पिऊन मी तुझ्या चरणापाशीं येतें. या अभागिनीला तिथं तरी स्थान मिळो, एवढीच तुला माझी दीन प्रार्थना आहे.

"हृदयेश्वर! जीवितनाथ! आपण या प्रसंगीं कुठं आहां? एक पळही आपण मला विसरलां नाहीं. या दासीची योग्यता नसतांही सदासर्वदा आपल्या हृदयांत हिला आपण स्थान दिलं. हाय! दिव्य–सुखपूर्ण, आपल्या प्रणयस्मृतिचिन्हांनीं सुशोभित अशा त्या वर्धमान नगरांत आपल्या पवित्र शांत समाधीवर पडून, आपलं शेवटचं वंदन करून प्राणविसर्जन करण्याचं या मंदभागिनीच्या नशिबीं नाहीं, याबद्दल मला फार दुःख होतं!

"हे दिल्लीपते! आपण दीनदुनियेचे सम्राट, आपलं सामर्थ्य अचाट आहे! आपली कीर्ति दिग्दिगंतराल व्यापून राहिली आहे! खरोखर, स्वजनाविषयीं, आपलं प्रेम अतुलनीय आहे! धन्य आपलं प्रेम–धन्य आपली करुणा–धन्य आपल्या कोमल हृदयाच्या प्रवृत्ति! आपलं मनुष्यत्व खरोखर प्रशंसा करण्यासारखं आहे!"

समोरच्या विषपूर्ण रौप्यपात्राकडे मेहेरची दृष्टि लागली होती. त्या लहानशा पात्रांतील पेय पितांच जीविताच्या सर्व ज्वाला, अपमान, उपेक्षा हीं सारीं विलयाला जातील असा तिला भरंवसा होता. मेहेरला हा मोह आवरला नाहीं. त्या विषपात्राच्या प्रलोभनाला ती बळी पडली! एकवार तिनें हात जोडून जगदीश्वराची प्रार्थना केली व तें विषपात्र हळूहळू ओंठाशीं धरलें. त्या तीव्र विषाचा तिच्या जिव्हेला स्पर्श झाला. त्याचा किंचित् अंश तिच्या पोटांतही गेला. मेहेरचें आधींच हलकें झालेलें मस्तक भ्रमूं लागलें.

इतक्यांत कोणीं धांवत धावत येऊन मेहेरच्या हातांतून तें विषपूर्ण रौप्यपात्र दूर उडवून दिलें!

तें तीव्र विष पोटांत गेल्यामुळें त्याचा परिणाम होऊं लागून जरी मेहेरच्या बुद्धीला भ्रंश पडत चालला होता, तरी तिची शुद्धि अद्यापि पूर्णपणें गेली नव्हती. तिला अजूनही चैतन्य होतें. ज्या व्यक्तीनें द्रुतपदानें महालांत येऊन आपल्या हातांतून तें विषपात्र फेंकून दिलें, ती व्यक्ति कोण आहे, तें मेहरनें तत्क्षणीं ओळखलें. ती व्यक्ति दुसरी कोणी नसून मेहरची प्रियसखी मतिया होती!

स्वहस्तानें मरणाच्या दाराशीं पडलेल्या मेहेरजवळ येऊन मतिया तिचें मुखमंडल

निरखूनं पाहूं लागली. मेहेरच्या गळ्याला घट्ट मिठी मारून अश्रुपूर्ण नयनांनीं स्फुंदत स्फुंदत मतिया ह्मणाली:—" मेहेर ! प्रिय सखि ! हें तूं काय केलेंस ? असा सर्वनाश करायला तुला कारण तरी काय झालं ? तुला ही दुर्बुद्धि कुणीं शिकविली ? हाय ! जर मी अभागिनी थोडीशी अगोदर आलें असत्यें तर—"

त्या यातनांतही जिवलग मैत्रिणीच्या भेटीमुळें झालेल्या उत्कट आनंदाची छटा मेहेरच्या म्लान मुखकमलावर चमकूं लागली ! ती क्षीणस्वरानें मतियाला ह्मणाली:— "मतिया ! शेवटीं आलीस तूं ? माझा दैवानं अगदीं अंतच पाहिला, ह्मणून मीं असा आपला अंत करून घेतला मतिया ! पण तुला इथं आलेली पाहून मला किती आनंद झाला आहे ह्मणून सांगूं ! तुझ्या मांडीवर मस्तक ठेवून मला आतां प्राण सोडतां येईल, ही कल्पना मनांत येऊन माझं हृदय आनंदानें भरून आलं आहे. तूं काल इथं यायची होतीस, असं मीं ऐकलं होतं—मतिया ! जर तूं थोडीशी अगोदर आली असतीस—"

मतियानें एक दीर्घ निःश्वास टाकला व गद्गद कंठानें ती ह्मणाली:—" मेहेर ! दैवापुढं कुणाचा इलाज चालणार ?—कालच मी येणार होत्यें—परंतु दैवघटनेनं काल मला येतां आलं नाहीं. राजासाहेब एकाएकीं आजारी पडले—मेहेर ! अजूनही मृत्यूच्या हातून तुझी सुटका करतां येईल. तुझ्या पोटांत फारसं विष गेलं नसावं. अजूनही उपाय चालतील. मी हकिमांना बोलावून आणत्यें. "

अर्ध्या घटकेपूर्वी जे ओष्ठ स्निग्ध व चिक्कण होते, ते विषप्रभावानें आतां शुष्क व काळे झाले ! तरीही त्यांवर मधुर स्मित चमकूं लागलें. मोतिराणीचे हे शब्द ऐकून मेहेर एकदा निराशेचें करुण हास्य हंसली व ह्मणाली:—" मतिया ! ती आशा आतां व्यर्थ आहे. मी आतां वांचणार नाहीं. माझ्या पोटांत किती विष गेलं आहे, तें मला सांगतां येत नाहीं. परंतु मला अतिशय यातना होत आहेत—गळा अगदीं सुकत चालला आहे. मस्तकांत तीव्र वेदना होत आहेत. आतां हकीम येऊन काय करणार मतिया ? तुझ्या मांडीवर मस्तक ठेवून तुझ्या मुखाकडे पहात मला शांतपणं मरूं दे, एवढीच मी तुला विनंति करत्यें. "

परंतु मतियानें मेहेरची ही विनंति मान्य केली नाहीं. महालाबाहेर धांवत जाऊन पहिल्यानें आपल्या दासीला तिनें जोधबाईकडे पाठविलें व सर्व वृत्तान्त संक्षेपतः तिला सांगून ताबडतोब हकिमाला बरोबर घेऊन यावयाला महाराणीला निरोप धाडला.

याप्रमाणें व्यवस्था करून मतिया आंत येते, तों मेहेर पूर्णपणें बेशुद्ध पडली होती. मतिया घाईघाईनें तिला शुद्धीवर आणावयाचा प्रयत्न करूं लागली. तिचे डोळे महालाच्या दरवाजाकडे लागून राहिले होते.

मतियाला फार वेळ वाट पाहावी लागली नाहीं. अल्पावधींतच हकिमाला बरोबर घेऊन जोधबाई घाईघाईनें तेथें आली. मतियाच्या मुखावर किंचित् आशेचें चिन्ह दिसूं लागलें.

हकिमानें मेहेरची नाडी, ओंठ, जीभ, तोंड वगैरे अत्यंत लक्ष्यपूर्वक तपासून पाहिलीं. त्याच्या गंभीर मुखावर हर्षाचें चिन्ह दिसूं लागलें. बरोबर आणलेल्या

औषधांपैकीं एक औषध त्यानें मेहेरच्या मस्तकावर सपाटून चोळलें व तो म्हणालाः—“ आतां फारशी भीति नाहीं. बेगमसाहेबांच्या पोटांत विष थोडें गेलें आहे व तें जाऊन फारसा वेळही झालेला नाहीं. म्हणून यांच्या जगण्याची खात्री वाटते. मी हें औषध देतों आहे; हें यांच्या नीट पोटांत जाऊन एकदोनदां उलटी झाली कीं तावडतोब या शुद्धीवर येतील. भिण्याचें कांहीं कारण नाहीं. ”

हकिमाचे हे शब्द गोतिराणी व जोधबाई यांना अमृताप्रमाणें मधुर वाटले. त्यांच्या जीवांत आतां जीव आला. मतिया मेहेरला आपल्या मांडीवर घेऊन बसली. क्षणोक्षणीं ती मेहेरचे हातपाय व श्वास तपासूं लागली. स्वतः दिल्लीपतीची पट्टराणी जोधबाई हकिमानें दिलेलें औषध तयार करूं लागली. अल्पावकाशांत औषध तयार होऊन मतियाच्या साहाय्यानें महाराणीनें तें मेहेरच्या तोंडांत घातलें—बहुतेक सर्व औषध रुग्ण स्त्रीच्या पोटांत गेलें. औषध पोंचून थोडा वेळ न होतो तों मेहेरला एक सपाटून उलटी झाली. त्यांतून पोटांत गेलेलें सारें विष बाहेर पडलें. मेहेरच्या काळवंडलेल्या चेहेऱ्यावर पुनः प्रफुल्लता येऊं लागली. थोड्याच वेळानें तिला पुनः एकदा उलटी झाली. दोन उलट्या होऊन पोटांतील सारें किल्मिष बाहेर पडल्यावर मेहेरला पुष्कळ बरें वाटलें—तिची लुप्तप्राय झालेली चेतना परत आली. नंतर मतिया व जोधबाई यांनीं मेहेरला उचलून पलंगावर ठेविलें व त्या दोघीजणीं तिचे हातपाय चोळूं लागल्या. कांहीं वेळानें तिला स्वस्थपणें निद्रा लागली.

मेहेरचा अपमृत्यु टळला! मतिया व जोधबाई यांचा आनंद गगनांत मावेना. मेहेरला चांगली झोंप लागलेली पाहून महाराणी उठली व म्हणालीः—“ मतिया! मी जात्यें आतां—पुनः लवकरच येईन. परंतु मध्यंतरीं मेहेरची स्थिति मला कळीव. ”

असें म्हणून जोधबाई प्रफुल्ल हृदयानें तेथून निघून गेली.

* * *

मध्यरात्र उलटून गेली होती. मेहेरला स्वस्थ झोंप लागून बराच काळ लोटला होता. आपल्या निद्रित सखीजवळ बसून तिच्या चेहेऱ्यावरील प्रत्येक हालचालिकडे मतिया अगदीं बारीक नजरेनें पाहात होती. मतिया व जोधबाई यांच्या कल्पनेपलीकडे मेहेरला गुण पडला होता.

कांहीं वेळानें मेहेरजान जागी होऊन तिनें डोळे उघडले. आपली जीवाची जिवलग मैत्रीण मृत्यूच्या कराल दाढेंतून परत आलेली पाहून मतियाला जो हर्ष झाला आहे, त्याचें योग्य वर्णन करणें आमच्या शक्तीबाहेर आहे.

प्रेमभरानें मेहेरचें एक चुंबन घेऊन मतिया तिला म्हणालीः—“ मेहेरजान! प्यारी! आतां कसं वाटतं तुला? चांगली गाढ झोंप लागली ना तुला? ”

मेहेर क्षीण स्वरानें म्हणालीः—“ होय, सखी! मला चांगली झोंप लागली, अन् मला आतां फार बरं वाटतं आहे. पण मतिया! ही अभागिनी मेली असती तर कांहीं दुनिया ओस पडली नसती. इतकी खटपट करून कशाला या मंदभाग्येला वांचविलंस तूं? उपेक्षेच्या, अवहेलनेच्या, अनादराच्या यातनाच सोसायला ना? त्यापेक्षां आज जर माझा

अंत झाला असता तर माझ्या या साऱ्या हालअपेष्टा चुकल्या असत्या, मतिया! मैत्रिणीच्या उपकाराचं यातना हेंच काय फळ मिळावं? त्यापेक्षां मृत्यु—"

मेहेरचें मुखकमळ प्रेमानें कुरवाळून मतिया मध्येंच ह्मणाली "छीछी! मेहेर! असं बोलूं नये गडे! अशी भयंकर गोष्ट तूं पुनः मनांतसुद्धां आणूं नकोस. संकटाला भिऊन आत्मघात करून घेण्यांत विशेष तें काय आहे? अन् असं जालीम विष घेतल्यावर तावडतोब मरण आलं तर त्यांत काय मोठंसं नवल आहे? मी आणखी एक अर्ध घटका जर उशीरा आल्यें असत्यें, तर सारा ग्रंथ आटोपलाच होता! मेहेर! तूं शांत हो. असल्या गोष्टी तूं मनांत आणूं नकोस, स्वस्थ पड अन झोप घे, ह्मणजे तुझी प्रकृति ताळ्यावर येईल. तूं नीट बरी झालीस कीं या पापपुरींतून आपण निघून जाऊं—झोंप आतां."

मेहेरनें पुनरपि डोळे मिटले. मतिया तिला वारा घालूं लागली. मेहेरची प्रकृति अगोदरच नाजूक, त्यांतून यमराजाशीं मुकल्याच झालेल्या झटापटींत तिला जिवापाड श्रम झालेले! त्या श्रमानें ती अगदीं गळून गेली होती. यामुळें तिला पुनः तावडताब झोंप लागली. तिला गाढ झोंप लागली असें पाहून मतिया हलकेच तेथून उठली व आपल्या दासीला मेहेरजवळ बसवून व तिला लक्ष्यपूर्वक पाहरा करावयाला सांगून बाहिरच्या दालनांत येऊन अस्वस्थ अंतःकरणानें ती इकडे तिकडे येरझारा करूं लागली. थोड्याच वेळापूर्वी घडलेल्या गोष्टीची ताजी आठवण आणि मेहेरची भविष्यत्कालीन स्थिति यांनीं मतियाचें हृदय हलवून सोडलें होतें.

अष्टमीच्या चंद्राकलेचे मलिन क्षीण किरण मेहेरउन्निसाच्या त्या एकान्त महालाच्या विशाल स्तंभांवर पडले होते. जणूं काय त्या चंद्राननेच्या प्रकृतीची चौकशी करावयालाच या वेळीं भगवान् रजनीवल्लभानें त्यांना धाडलें होतें! या चंद्रकिरणांशिवाय तेथें मुळींच कसला प्रकाश नसल्यामुळें तो महाल बहुतेक अंधकारांत बुडून गेला होता. इतस्ततः पडलेल्या म्लान चंद्रकिरणांनीं महालांतील अंधकाराची गंभिरता व घनता जणूं काय अधिकच वाढली होती!

त्या अंधकारमय दालनांत मतिया इकडून तिकडे येरझारा घालीत होती. याप्रमाणें कांहीं वेळ गेल्यावर तिनें सहज बाहेर पाहिलें, तों एक वस्त्रावृत मनुष्यमूर्ति मेहेरच्या महालाकडे येत आहे असं तिच्या दृष्टीस पडलें! त्याबरोबर मतिया चमकली! दिल्लीपतीच्या रंगमहालांतही भुतेंपिशाचें वावरत असतात कीं काय, अशी तिला क्षणमात्र शंका आली. परंतु अशा असंभवनीय गोष्टीविषयीं शंका आल्याबद्दल लगेच तिचें तिलाच हंसू आलें. ती मूर्ति गंभीर पदनिक्षेप करीत मेहेरउन्निसाच्या महालाच्या दरवाजाकडे येत होती. ती मूर्ति स्त्रीची नसून पुरुषाची होती हें मोतिराणीनें तावडतोब ओळखलें. त्या मूर्तीला त्या महालाकडे येतांना पाहून तिच्या अंगावर शहारे आले! परंतु धैर्य धरून ती त्या मूर्तीकडे टवकारून पहात महालाच्या दाराशीं उभी राहिली.

ती मूर्तीही धीरपदानें महालाकडे यत होती. दरवाजापासून कांहीं अंतरावर येतांच दरवाजापाशीं एक स्त्री उभी आहे असें तिच्या दृष्टीस पडली. ती स्त्री कोणालाही आंत प्रवेश करूं द्यावयाचा नाहीं, या

उद्देशानें तेथें उभी राहिली असावी असें त्या मूर्तीला वाटलें. त्या स्त्रीला तेथें पाहतांच मनुष्यमूर्तीला किंचित् आश्चर्य वाटलें असावें असें दिसलें. परंतु तिनें आपली धीर गति थांबविली नाहीं—ती तशीच पुढें पुढें येत होती. अल्प क्षणांत ती. अगदीं दरवाजा-पाशीं येऊन ठेपली. ती जवळ येतांच चंद्र-प्रकाशाच्या साहाय्यानें मतियानें झटकन् तिला ओळखिलें, परंतु तिच्याशीं एक शब्दही न बोलतां ती तशीच दृढतेनें तेथें उभी राहिली.

एका स्त्रीनें आपला मार्ग रोखून धरावा हें त्या आगंतुकाला सहन झालें नाहीं. त्याच्या एकंदर हालचालीवरून त्याची मनःस्थिति शांत नसावी असें पहाणाऱ्याला, सहज कळण्यासारखें होतें.

दरवाजांत उभ्या असलेल्या स्त्रीला उद्देशून आगंतुकानें कर्कश स्वरानें विचारलें " कोण आहेस तूं ? "

मतियानें आगंतुकाच्या प्रश्नाला उत्तर दिलें नाहीं. ती कठोरपणानें खदखदा हंसली मात्र!

तिचें हें चमत्कारिक वर्तन पाहून आगंतुकाला राग आला. ही धीट स्त्री कोण आणि ती असें वर्तन कां करते हें त्याला कळेना. त्यानें अस्थिरतेनें मतियाला फिरून विचारलें, " अशी विलक्षण स्त्री तूं आहेस तरी कोण ? "

मतियानें हंसून उत्तर दिलें, " मी कोण तें आपणाला ठाऊक नाहीं काय जहांपनाह ? माझं आपणांला इतक्यांत विस्मरण झालं वाटतं ? "

त्या स्त्रीच्या आवाजावरून व इतर चिन्हांवरून जहांगिराला या वेळीं तिची चटकन ओळख पटली. ओळख पटतांच त्याचा अधिकाराचा स्वर एकदम मवाळला. त्यांत प्रेम, करुणा व मार्दव हीं प्रकट झालीं !

जहांगिरानें कोमल स्वरानें तिला विचारलें, " कोण? मतिया तर नव्हे ? "

मोतिराणी हसून ह्मणते, "होय जहांपनाह! मतियाच मी."

" मतिया ! मतिबिबी ! कधीं आलीस तूं? तूं इथें कां ह्मणून या वेळीं? "

मतिया गंभीरपणानें ह्मणाली:—" शहान-शहा ! या सर्व दुनियेंत जिचं मायेचं असं एकही मनुष्य नाहीं—इतकंच नव्हे, तर जिच्यावर सर्व जग फिरलं आहे, तिची सेवाशुश्रूषा करायला परमेश्वरानंच मला इथं पाठविलं. परंतु सरकार ! या अशा अपरात्रीं आपली स्वारी इथं काय ह्मणून ?"

अत्यंत करुणापूर्ण स्वरानें, गद्गद कंठानें, बादशहा तिला ह्मणाला:—"मतिया ! मला खरें सांगशिल ?"

" काय गरीब परवर ? "

"कांहीं वेळापूर्वीं विषपान करून मेहेरनें आत्महत्या केली अशी मीं कुजबूज ऐकली—मतिया ! खरी का ही गोष्ट? "

मोतिराणी पदरानें डोळे पुशीत पुशीत खिन्न स्वरानें ह्मणाली:—" होय जहांपनाह ! आपल्या कानांवर जी बातमी आली, ती अगदीं खरी आहे. मी इथं येऊन पोंचण्यापूर्वीं मेहेरनं अभिमानाच्या भरांत विषपान केलं—मी उशीरां येऊन पोंचल्यें—जवळपास कुणी नव्हतं. पुष्कळ उपाय केले. परंतु दैवानं यश दिलं नाहीं. थोड्या वेळापूर्वीं मला दुःखसागरांत लोटून माझी सखी निष्ठुरपणानें स्वर्गीं निघून गेली ! दुनियाके मालिक ! आपल्या निष्ठुरपणाचा विजय

झाला ! आपली कीर्ति मेहेरच्या मरणानें अधिकच उज्ज्वल झाली आहे जहांपनाह !"

मतियाचे हे विषदग्ध शब्दबाण बादशहाच्या बरोबर मर्मस्थानीं लागले ! अगोदरच त्याचं अंतःकरण मेहेरच्या मृत्यूच्या बातमीनें शतधः विदीर्ण झालें होतें. त्याला मतियाचे शब्दबाण सहन झाले नाहींत. तो जेथल्या तेथें दुःखानें खालीं बसला. त्याच्या नेत्रद्वयांतून झरझरा अश्रुप्रवाह वाहूं लागला. त्याचा गळा भरून आला. तो रडत रडत मतियाला ह्मणाला:--" काय ? मतिया ? शेवटीं ती हृदयविदारक वार्ता खरीच ठरली अं? मेहेरजान गेलीच ना या हतभाग्याला टाकून ? मतिया ! खरें सांग-भलत्या वेळीं माझी थट्टा करूं नको. मेहेरनें अभिमानानें प्राणविसर्जन केलें ना ? "

"शहानशहा दिल्लीश्वराची भलतीसलती थट्टा करण्याइतकं या दासीच्या अंगीं सामर्थ्य नाहीं.मी सांगितलं तेंच अक्षरशः खरं आहे."

एखाद्या लहान मुलाप्रमाणें जहांगीर आतां स्फुंदूं लागला. अनुतापानलानें त्याचें हृदय जळत होतें. केवळ आपल्या अभिमानानें आणि मूर्खपणानें मेहेरसारख्या स्त्रीरत्नाचा असा शोचनीय अंत झाला, या कल्पनेनें त्याचें मस्तक भणाणून गेलें. ही कल्पना क्षणमात्र त्याला सोडीना. कांहीं वेळ तो स्तब्ध होता.

कांहीं वेळानें मनांत कांहीं दृढनिश्चय करून तो उठला व मतियाला उद्देशून म्हणाला:-" मतिया ! रस्ता सोड. त्या रत्नाचें शेवटचें दर्शन घेऊन माझ्या नेत्रांचें मला समाधान करून घेऊं दे. मीं चांडाळानें आजपर्यंत तिला सुखाचा एकही दिवस दृष्टीस पडूं दिला नाहीं. तिचा अनादर केला. अभिमानाच्या भरांत तिच्याशीं एकादांही प्रेमाचा शब्द बोललों नाहीं. इतक्या दिवसांत तिचें मीं दर्शनही घेतलें नाहीं. आज मी तिला डोळे भरून पाहाणार. इतक्या दिवसांच्या भयंकर अपराधाचें-अत्याचारांचें-मला प्रायश्चित्त घेऊं दे. त्याच उद्देशानें या वेळीं मीं इथें आलों आहें. मेहेरचें शेवटचें-हाय ! आतां या जन्मीं पुनः ती या हतभाग्याच्या कधींही दृष्टीस पडणार नाहीं-दर्शन घेऊन, तें सुंदर मुखकमल डोळे भरून पाहून घेऊन सर्व जन्मभर मर्मयातनांच्या ज्वालांत दग्ध होईन, अशी प्रतिज्ञा करून या वेळीं मीं येथें आलों आहे. मतिया ! दार सोडून मला रस्ता दे. "

मतियानें कांहींच उत्तर दिलें नाहीं आणि तिनें बादशहाचा रस्ताही सोडला नाहीं. बादशहाच्या लहरी स्वभावाचें तिला मोठें आश्चर्य वाटलें. जहांगिराला मेहेरबद्दलच्या प्रेमाची उकळी आजच इतकी कां फुटली असावी ? ही याची लहरही इतर बादशाही लहरींप्रमाणें क्षणस्थायीच असेल काय ? हा प्रबल अनुरागवन्हि, मेहेरच्या दर्शनाविषयीं ही प्रचंड लालसा इतके दिवस कोठें लपून राहिली होती ? आजच या मनोविकारांना एवढी प्रबलता कोठून आली ? जी जिवंत असतां तिचें दर्शन यानें एकवारही घेतलें नाहीं, उलट तिला शक्य तितका अनादर दाखविला, तिचा अभिमानमदानें उपमर्द केला, ती आज मृत झाली म्हणून तिच्या दर्शनाविषयीं याला इतकी प्रबल आतुरता उत्पन्न झाली

काय ? हे व अशाच तऱ्हेचे अनेक प्रश्न अत्यल्प कालांत मतियाच्या मनांत उद्भवले.

मतिया जों जों मार्ग मोकळा करावयाला वेळ लावूं लागली, तों तों जहांगिराचा धीर सुटत चालला. त्याला आतां क्षणमात्र विलंब सहन होईनासा झाला. मनांतल्या मनांत तो मतियावर अतोनात रागावला. मतिया आजच अशी हट्ट कां करीत आहे, हें त्याच्या लक्षांत येईना. इकडे मतियाच्या अंगीं आज जणूं काय एखादें पिशाचच संचरलें होतें! जों जों बादशहाची अधीरता वाढूं लागली, तों तों मतियाचा हट्टही दृढ होत चालला. बादशहाला किती वेळ तरी वाटलें, कीं, दांडगाई करून आपला आंत प्रवेश करून घ्यावा! परंतु तसें करावें तर शिष्टाचाराचा अतिक्रम होतो, असें वाटून त्या विचारापासून तो निवृत्त होई. मतिया अगोदर स्त्री, त्यांतून आपला परममित्र व हितकर्ता जो काटव्याचा ठाकुर गजपतिसिंह, त्याची ती पत्नी—तेव्हां तिच्याशीं दांडगाई करणें सर्वथैव अनिष्ट होय, असा विचार करून जहांगिराला जागच्या जागीं उभें राहणें लागे!

परंतु विचार तरी करावयाचा कोठपर्यंत? जहांगिराच्या अधीरतेचा कळस झाला. अभागिनी मेहेरनें प्राणविसर्जन केलें तें केवळ आपणासाठीं! आपल्या मूर्खपणाच्या अभिमानाचा असा शोचनीय परिणाम झाला. त्या रूपगुणशाली रमणीचें शेवटचें दर्शन घ्यावयाचा संकल्प करून आपण तिच्या महालाजवळ आलों असतां तिची सखी आपणाला—खुद्द हिंदुस्थानच्या सार्वभौम बादशहाला—आंत जावयाला अवरोध कां करते? त्यांत तिचा हेतु काय असावा? एका सामान्य स्त्रीची इतका धीटपणा? बादशहाच्या मस्तकांत हे प्रश्न एकदम उभे राहिले—परंतु त्यांचें त्याला उत्तर देतां येईना.

बादशहा अधिकाराच्या स्वरांत मतियाला दरडावून म्हणालाः—"मतिबिबि! वाट सोड. मी दिल्लीचा सार्वभौम बादशहा—जहांगिरशहा—तुला हुकूम करतों, कीं, माझी वाट सोड! मला उगीच अत्याचार करायला लावूं नकोस."

बादशहाच्या अधीरपणाची तार याप्रमाणें जरी अगदीं तुटणाऱ्या स्थितीपर्यंत चढली होती, तरी मतियाला त्याची फारशी भीति वाटली नाहीं. मेहेरबद्दल बादशहाच्या मनांत अगदीं अत्यल्प वेळांत जो प्रेमरसाचा एवढा मोठा थोरला पूर लोटला होता, तो कितपत जोराचा आहे हें नीट सूक्ष्मपणें पहावयाचा मोह मतियाला आवरेना! कांहीं झालें तरी—बादशहानें आपणाला कितीही धाक दाखविला तरी त्याच्या हातून रागानें तडफडण्यापेक्षां अधिक कांहीं होत नाहीं, ही तिची पक्की खात्री होती. धूर्त मतिया का बादशहाच्या शुष्क दरडावणीला या वेळीं भीक घालते? ती महालाच्या दरवाजांत निश्चलपणें उभी होती. बादशहाला वाट मिळाली नाहीं!

अजूनही चंद्राचे ते म्लान किरण नाहींसे झाले नव्हते. मतिया व बादशहा या उभयतांमध्यें चाललेल्या द्वंद्वांत शेवटीं कोणाचा विजय होतो, हें पहाण्याकरतांच जणूं काय ते अजूनही तेथें दबा धरून राहिले होते! बादशहा जेथें होता तेथें बराच प्रकाश पडला होता. त्याच्या मुखमंडलावर कांहीं चंद्रकिरण पडून त्याला कुरवाळित होते.

त्या चंद्रप्रकाशांत मतियानें बादशहाच्या चेहेऱ्याकडे निरखून पाहिलें. त्याचे डोळे पाण्यानें भरून आले होते. ओठ कांपत होते. मुखावर अधीरता, क्रोध, शोक, करुणा इत्यादि विकार दिसून येत होते. जहांगिराची अशी स्थिति पाहून मतियाला मोठें कौतुक वाटलें. मेहेरउन्निसाबद्दलचा तिचा अभिमान अधिकच उज्ज्वल झाला.

दिल्लीश्वराकडे पाहून मतियानें एकवार स्मित केलें व नंतर लगेच गंभीरपणाचा आविर्भाव दाखवून ती बादशहाला उद्देशून ह्मणाली:—" जहांपनाह ! मरणापूर्वी माझ्या प्रिय सखीनें मजपाशीं आपली शेवटची इच्छा प्रदर्शित केली होती—"

जहांगिरानें मध्येंच आतुरतेनें प्रश्न केला, " काय ती ? "

" ती मला ह्मणाली—' मतिया ! माझ्या प्रेमाची आजवर उपेक्षा झाली—मी तर जात्येंच—परंतु माझी शेवटची एक इच्छा आहे ती तूं पुरी कर—तुझ्याशिवाय माझी हतभागिनीची इच्छा कोण बरं पुरी करील?"

मेहेरच्या या काल्पनिक शब्दांनीं बादशहाच्या हृदयांत खळबळ उडविली. व्याकुल अन्तःकरणानें तो ह्मणाला:—"मतिया ! लवकर सांग—तुझ्या प्रिय सखीची इच्छा काय आहे ? "

" मेहेरनें शेवटीं मला निक्षून सांगितलें, कीं, ' कांहीं झालं तरी प्रेमशून्य पुरुषाला माझ्या मृत देहाला स्पर्श करूं देऊं नको ! ' जहांपनाह ! आपण आजपर्यंत माझ्या प्रिय सखीची अवहेलना केलीत. अवहेलनेंतच तिचा अंत झाला. परंतु आतां तिची शेवटची इच्छाही आपण पूर्ण नाहीं का करणार ? मृत मनुष्याची शेवटची इच्छा पूर्ण न करणं यासारखा भयंकर निष्ठुरपणा दुसरा कोणताच नाहीं!"

जहांगिराची स्थिति या वेळीं फारच अनुकंपनीय झाली होती ! एखादी वस्तु प्राप्त करून घ्यावयाला बालक ज्याप्रमाणें अधीर होऊन जातो, त्याप्रमाणें मेहेरच्या दर्शनविषयीं बादशहा अधीर होऊन गेला होता. सर्व शिष्टसांप्रदाय बाजूला ठेवून, बलपूर्वक मतियाला बाजूला करून, महालांत आपला प्रवेश करून घ्यावा असा त्यानें निश्चय केला. व्याकुलतेबरोबर क्रोधानेंही या वेळीं त्याच्या हृदयावर आपला अंमल बसविला होता.

क्रोधकंपित स्वरानें तो मतियाला ह्मणाला, मतिया ! तुझें बोलणें मी प्रमाण मानीत नाहीं. मी मेहेरचें शेवटचें दर्शन घेणार ! अजून तरी दरवाजा सोडून मला आंत जावयाचा मार्ग मोकळा करून दे. तूं जर आतां येथून बऱ्या बोलानें हलणार नाहींस, तर बलपूर्वक मी आपला मार्ग मोकळा करून घेईन. या तरवारीच्या साहाय्यानें रस्ता खुला करायला मी आतां मागेंपुढें पहाणार नाहीं हें नीट ध्यानांत ठेव. "

बादशहाचे हे दरडावणीचे शब्द ऐकून मतियाला भीति वाटण्याऐवजीं हंसूं मात्र आलें. ती मोठमोठ्यानें हंसूं लागली, तें हास्य विनोदाचें नसून त्यांत केवळ तिरस्कार आणि उपेक्षा हीं भरून राहिलीं होतीं. बादशहाला मतियाचें हास्य विषाप्रमाणें कडू लागलें.

बादशहाकडे तिरस्कारपूर्वक पहात मतिया हंसून ह्मणते, " जहांपनाह ! आपल्या या भयप्रदर्शनानं मी कांहीं भ्यायची नाहीं हो ! मरणाचं भय आपण मला कां बरं

दाखवितां ? मरणाचें जर मला भय वाटत असतें तर दिल्लीच्या बादशहांबरोबर अशा धीटाईनें बोलण्याचें साहस मजकडून झालेंच नसतें ! आपण सर्व भरतखंडाचे सार्वभौम बादशहा, आपला पराक्रम अचाट, आपली शक्ति मोठी—मी तर एक यःकश्चित् संस्थानिकाची पत्नी ! अनेक शस्त्रें धारण करणारे आपण वीर—मी एक निःशस्त्र अबला ! आपल्याबरोबर धीटाईनें वागून जिवंत राहण्याची आशा मी करीत नाहीं. परंतु आम्ही स्त्रिया मरणाला बिलकूल डरत नाहीं. जहांपनाह ! मी ह्मणत्यें याचें प्रत्यंतर पहायला कांहीं दूर जायला नको. जवळच पलीकडच्या दालनांत आपण गेलां ह्मणजे मरणाला रमणी कशा भीत नाहींत, हें आपणांला चांगलं आदळून येईल. मरणाचें भय नसल्यामुळेंच मेहेर आपणांला टाकून अभिमानानें चालती झाली. शस्त्रानें आपणांला मार्ग मोकळा करून घ्यायचा असेल तर मी आपण होऊन आपली मान आपल्यापुढें करत्यें. कमरेच्या तरवारीनें माझा देह भिन्न करून आपण आपला मार्ग खुशाल मोकळा करून घ्यावा. परंतु मी जिवंत असता माझ्या प्रिय सखीची —मेहेरची—इच्छा मी—"

परंतु मेहेरचें हें वाक्य पुरें झालें नाहीं. बादशहानें क्रोधोन्मत्त होऊन आपल्या कमरेला लावलेली लहानशी तरवार सरकन म्यानाबाहेर काढली. क्षीण चंद्रकिरणांत ती तरवार लखलखूं लागली. बादशहाचा क्रोध आतां अनावर झाला होता. त्याचे डोळे लालबुंद होऊन भिवया वर चढल्या होत्या. त्याची विवेकबुद्धि त्याला यावेळीं पार सोडून गेली! मतियाचें वक्षःस्थळ विद्ध करण्याकरतां तरवार उभारून बादशहा एक दोन पावलें वेगानें पुढें सरला. आपल्या विनोदाचा कळस होऊन गेला, त्याचें मृत्युरूपी फळ चाखल्याखेरीज आपणाला आतां गत्यंतरच नाहीं असें मेहेरला वाटलें. क्षणमात्र तिचें हृदय भीतीनें थरारलें—परंतु तें क्षणमात्रच ! घट्ट मन करून आपल्या प्रियसखीसाठीं तिच्या मागोमाग जावयास मतिया सिद्ध झाली !

परंतु काय आश्चर्य ! विलक्षण घटनावैचित्र्यानें बादशहाच्या तरवारीचा मतियावर वार झाला नाहीं ! एका अज्ञात स्त्रीमूर्तीनें तितक्यांत तेथें वेगानें येऊन बादशहाच्या हातांतली तरवार वरच्यावर पकडून दूर फेंकून दिली ! मतियाचा अपमृत्यु टळला !

बादशहानें आश्चर्यचकित होऊन मागें वळून पाहिलें. जिचा काळाभोर केशकलाप स्वच्छंदानें पाठीवर लोळत आहे, अशी एक सुंदर राज—राजेश्वरीची मूर्ति आपल्याकडे भयचकित नेत्रांनीं पहात आहे, असें जहांगीराला आढळून आलें. आपल्या इष्टसिद्धींत हा नवाच अंतराय आलेला बादशहाला सहन झाला नाहीं. या वेळीं त्याचें मन मेहेरमय बनून गेलें होतें.

बादशहानें महाराणीला रागानें विचारिलें, "राणी ! या वेळीं तूं येथें कां ह्मणून आलीस ?"

जोधबाई हंसत हंसत म्हणाली:—"तें मी मागाहून सांगेन आपणाला जहांपनाह ! पण आपणच अगोदर माझ्या एका प्रश्नाचें उत्तर द्यावें."

बादशहानें चिडून विचारलें, "कसलें उत्तर ?"

" मी आपणांला उलट विचारत्यें कीं, या वेळीं आपण इथं काय ह्मणून यायला झालं ? हा महाल कुणाचा तें आहेना आपणाला माहीत ? नसला तर सांगत्यें हो. हा महाल आजपर्यंत जिची आपण पूर्णपणें उपेक्षा केली, अन् जिनें केवळ आपणांकरितां प्राणविसर्जन केलं, त्या मेहेरउन्निसाचा हा महाल, बरं का ?—"

बादशहानें राणीला कांहींच उत्तर दिलें नाहीं. तो खालीं मान घालून स्तब्धपणें उभा होता.

कांहीं वेळ वाट पाहून बादशहाकडे तीव्र दृष्टीनें पहात जोधबाई त्याला खोंचून ह्मणतेः—"शहानशहा ! आपण केलेल्या अवमानामुळं जिनें जाणून बुजून आत्मघात करून घेतला, तिच्यासाठीं आतां हा प्रबल अनुराग कां ह्मणून ? जोंपर्यंत प्रेमयाचना करीत रमणी वल्लभाचे चरण धरीत आहे, तोंपर्यंत तिच्याकडे ढुंकूनही न पहातां तिला अनादरानं लत्ताप्रहार करायचा अन् तिचा कायमचा वियोग झाल्यावर तिच्यासाठीं कंठ कोरडा होईपर्यंत आक्रोश करायाचा हा तर साऱ्या पुरुषांचा धर्मच आहे ! सरकार ! काल सायंकाळींच, अभागिनी मेहेरजानवर कृपा करावी, तिचा आदर करून जन्मोत्सवाचं तिला प्रेमपूर्वक निमंत्रण द्यावं ह्मणून मीं परोपरीनं आपली विनवणी केली, त्या वेळीं आपला हा तीव्र अनुराग कुठं लपून राहिला होता ? आपल्या जन्मोत्सवाला इतर बेगमांना निमंत्रण देऊन केवळ मेहेरलाच जर आपण निमंत्रण देणार नाहीं, तर तिला तो भयंकर अपमान वाटून ती अभिमानाच्या भरांत आत्महत्या केल्याखेरीज कधींही रहाणार नाहीं, असं मीं आपणांला बजावून सांगितलं होतं. पण माझं ऐकतं कोण ? कोणत्या झाडाचा पाला मी ? परंतु मी सांगितलेलं अक्षरान् अक्षर आज खरं झालं, काय तरी बाई माणसाचा चमत्कार ! काल मीं आपणाला इतकं सांगितलं, तर त्याकडे मुळीं लक्ष सुद्धां द्यायचं नाहीं अन् आज मेहेरनं अभिमानानं आत्मघात करून घेतल्यावर तिच्या दर्शनाकरितां बेफाम होऊन एका निर्दोष स्त्रीला ठार करायला तयार व्हायचं !"

मेहेर गेली ! नील नभोमंडलांत विराजमान झालेल्या भगवान् चंद्राचे स्तिमित क्षीण किरण सांगतात—मेहेर गेली ! नक्षत्ररूपी चकचकणाऱ्या हीरकमालांनीं भूषित झालेला कृष्णमुकुट परिधान करणारी निशादेवी ह्मणते—मेहेर गेली ! दूर—मेहेरउन्निसाच्या महालापासून दूर—असणाऱ्या इतर बेगमांच्या महालांतून चमकणाऱ्या दीपरेखा सांगतात—मेहेर गेली ! खुद्द दिल्लीची साम्राज्ञी जोधबाई ह्मणते—मेहेर गेली ! स्वतः मेहेरजानची प्रिय सखी मोतिराणी सांगते—मेहेर गेली ! अभिमानाच्या भरांत विपुल राजवैभवाचा त्याग करून मेहेरउन्निसानें परलोकीं गमन केलें, या गोष्टीला इतके साक्षी—इतकीं प्रमाणें ! बादशहाला या वृत्तांतावर अविश्वास ठेवणें अशक्य होतें !

अनेक दिवसांची स्मृति विस्मृतिरूपी पडद्याच्या मागें लुप्त झाली होती, तो पडदा आज एकाएकीं वर उचलला गेला. तत्क्षणीं पूर्वकालीन चरिताची सुंदर स्मृति बादशहाच्या हृदयांत आज सहसा जागृत झाली ! मेहेरजानची—त्या रमणीशिरोरत्नाची—स्मृति किती रम्य ! मेहेरउन्निसा भर ज्वानींत असतां तिच्या उन्मादकारी दिव्य लावण्यानें

आपणाला बंदिवान करून सोडलें! त्या मोहानें आपलें सर्व सुख, विलास, शांति नष्ट झाली! खातांपितां, बसतांउठतां, जागृतावस्थेंत, निद्रा घेत असतां तिचें सुंदर स्वरूप आपल्या मानसचक्षूंपुढून दूर झालें नाहीं! तिच्या रूपगुणलालसेनें विवश होऊन आपण सुखसर्वस्वावर जलांजलि दिली; इतकेंच नव्हे, तर सर्व राज्यवैभव तुच्छ समजून प्रत्यक्ष सिंहासनावरही लाथ मारण्यास आपण प्रवृत्त झालों! सुष्ट-दुष्ट उपायांनींही त्या लावण्यशालिनीची प्राप्ति करून घ्यावयास आपण सिद्ध झालों. तिच्यासाठीं सर्वस्वी निर्दोष अशा प्रिय जनांच्या रक्तानें हात माखून घ्यावयास आपण मागेंपुढें पाहिलें नाहीं! जिचा लाभ व्हावा म्हणून आपण इतके कष्ट केले, नरहत्येसारखे भयंकर पातकही मस्तकावर घेण्यास तयार झालों—पापपुण्य, स्वर्गनरक यांची तिळमात्र क्षिति बाळगिली नाहीं, ती दैवबलानें प्राप्त झाली असतांही मूर्खपणाच्या अभिमानानें आणि संशयानें त्या रमणीचा आपण अनादर केला, एक दिवसही तिच्याशीं गोड प्रेमाचे शब्द बोललों नाहीं. चिंतेनें पांडुर झालेल्या तिच्या सुंदर मुखकमलाकडे एक वर्षांत आपण ढुंकूनही पाहिलें नाहीं. हाय हाय! पट्टराणी करण्यासाठीं, ऐश्वर्यसुखाच्या शिखरावर विराजमान करण्यासाठीं, मलपूर्वक आपण तिला येथें घेऊन आलों—परंतु आपल्या अनुपमेय मूर्खपणामुळें तिला दास्यांत, हालअपेष्टांत, दारिद्र्यांत दिवस कंठावे लागले, केवळ आपल्यासाठीं जिनें इतके अनिर्वचनीय हाल व यातना सोसल्या, तिला सुखाचा एक शब्दही आपण बोललों नाहीं. शेवटीं आपल्या अक्षम्य उपेक्षेमुळें तिनें आत्मघात करून घेतला! केवढा हा अत्याचार! आपल्या कीर्तीला केवढा हा कलंक! हा कलंक आपण जीवंत आहों तोंपर्यंत—छेः, आपल्या पश्चात् यावच्चंद्रदिवाकरौ—कधींही धुवून निघणार नाहीं! धिःकार असो आपल्या मनुष्यत्वाला आणि सार्वभौमत्वाला! अशासारख्या विचारांनीं जहांगिराच्या मनांत काहूर करून सोडलें! या विचारांच्या असह्य भारानें त्याचें हृदय चूर्ण होऊन गेलें!

हाय! आपली प्रणयिनी, आपल्या हृदयाची अधिष्ठात्री देवता मेहेरउन्निसा तर मधुर हास्य करीत स्वर्गलोकाला निघून गेली! आपण अत्यंत क्रूर, कठोर, निर्लज्ज, म्हणून ती जीवंत असतां तिला एकदाही भेटावयाला न येतां ती निघून गेल्यावर तिच्या केवळ मृत देहाचें दर्शन घेण्यासाठीं आलों! आपल्यासारखा निर्दय पुरुष जगांत एकही नसेल. जहांगिराला आतां हे विचार असह्य झाले.

बादशहा जिकडे जिकडे पाहूं लागला, तिकडे तिकडे प्रत्येक पदार्थ-सारें विश्वच आपला तीव्रपणें तिरस्कार करीत आहे, असें त्याला वाटूं लागलें. दुरून, मधून मधून सुगंधित पुष्पांचा परिमल बरोबर घेऊन येणारा मंद वायु म्हणत होताः— "जहांगीर दिल्लीचा बादशहा, मुत्सद्यांतला मुत्सद्दी, शहाण्यांतला शहाणा, राज्यशकट हांकण्यांत मोठा चतुर! परंतु त्याला खऱ्या विशुद्ध प्रेमाचें मर्म लवमात्र माहीत नाहीं!" अंधकारराशींत आपलें मुख लपविलेल्या पुष्पकलिका बोलत होत्या—"छी छी! धिःकार असो तुला! बादशहा झालास म्हणून काय झालें? तुझ्या हृदयांत प्रेमाचा वासही नाहीं!" तेथें पसरलेली मलिन ज्योत्स्ना खिन्नपणें

हंसून बादशहाला उद्देशून ह्मणत होती:– "छीः! जहांगीर! तुझ्यासारखा निर्लज्ज तूंच! तुझी मेहेरजान जीवंत असतां तूं तिला एकदाही भेटला नाहींस, मायेचा एक शब्दही बोलला नाहींस–तिचा शक्य तेवढा अनादर केलास! आणि आतां केवळ तुजकरितां तिनें प्राणविसर्जन केल्या-वर मात्र विव्हळ होऊन तूं तिला पहायला इथें धांवत आलास! निर्लज्जा! अजूनही तूं इथेंच उभा आहेस?" यमुना नदीचें दुरून ऐकूं येणारे मधुर कल–संगीत जणूं काय त्याला सांगत होतें–"जहांगीर! मूर्खा! बोलून चालून तूं पुरुष! तुमची जातच निष्ठुर! तुला रमणीच्या प्रेमाची कल्पना काय? तुला घटिंगणाला सुंदरीचा मान सन्मान कसा करावयाचा हें कसें ठाऊक असणार? मृदुकोमलांग पुष्पाला डोकी-वर उचलून त्याचा मान ठेवावा लागतो. आपल्या कठोर लत्ताप्रहारानें त्याला चूर्ण-विचूर्ण करणें हें तुझ्यासारख्या अरसिक पुरुषाचें काम! माझ्या या कृष्ण जलांच्या लाटांमध्यें किती गाढ प्रेम, किती गंभीर स्नेह वास करीत आहे, हें माझ्याजवळ येऊन एकवार नीट लक्ष्यपूर्वक पहा बरें! त्यांना एक क्षणभरही वियोग सहन होत नाहीं. आणि तूं? आपल्या प्रिय-तमेला पददलित करून इतके दिवस तूं निश्चिंत होतास!"

बादशहाला आतां उभें राहावेना–त्याच्या हातांपायांतील सर्व शक्ति नाहींशी झाली. त्याचें सर्व शरीर विकलतेनें कांपत होतें. जवळच्या दगडी भिंतीवर आपल्या शरीराचा सर्व भार टाकून जहांगीर कसा तरी तेथें उभा राहिला. भयंकर आशा-भंगानें त्याच्या अंतःकरणाला, तसेंच शरी-रालाही बलहीन करून सोडलें होतें. जिकडे पहावें तिकडे अशांतीच्या भयंकर ज्वाला! शांतीचा कोठें मागमूसही नाहीं! अनुतापानें त्याचें हृदय–हृदयच कां?–सर्व शरीर जळूं लागलें! विचार–विचार–! विचारांमुळें बादशहाला वेड लागण्याची पाळी आली!

मेहेर तर निष्ठुरपणानें स्वर्गाकडे चालती झाली! व्हावयाचें तें होऊन गेलें! कांहीं झालें तरी ती परत येणें आतां शक्य नव्हतें. हा भयंकर मनस्ताप किंचित् तरी शांत होईल, असा कांहीं उपाय आहे काय? आतां मेहेरचें अंत्य दर्शन हाच तो उपाय! नेत्र भरून तिचें शेवटचें दर्शन घेणें यांत कोणता दोष आहे?

बादशहा शरीरानें व मनानें अत्यंत विकल होऊन गेला आहे, हें मतिया व जोधबाई या उभयतांच्याही लक्ष्यांत आलें. त्याचा यापेक्षां अधिक छळ करणें इष्ट नाहीं. त्याच्या प्रेमपरीक्षेची केव्हांच सीमा होऊन चुकली आहे, हें त्यांच्या आतां ध्यानांत येऊन चुकलें. त्या उभयतांनीं एकमेकांच्या कानांपाशीं हितगुज करून आपसांत कांहीं ठरविलें. बादशहाचें त्यांच्याकडे लक्ष्यच नव्हतें. मतिबिबी व जोधबाई आपसांत कांहीं मसलत करीत आहेत हें त्याला कळलें नाहीं.

कांहीं वेळानें मतिया जहांगिरासमोर येऊन उभी राहिली व हात जोडून गंभीर-पणानें ह्मणाली:–"यावं तर जहांपनाह! आपल्या खुद्द मालकीच्या रंगमहालांत माझ्या-सारख्या परस्थ स्त्रीनं आपणांला आंत जायला मज्जाव करणं हें मूर्खपणाचं काम होय असं नीट विचार केल्यावर मला वाटायला लागलं आहे. मघांच्या माझ्या

वर्तनाचा आतां मला फार पश्चात्ताप होत आहे, माझ्या अपराधांबद्दल हुजुरापाशीं मी क्षमा मागत्यें. प्रिय सखी मेहेरचा मृत देह पाहून जर आपणाला शांति मिळेल, आपलं हृदय त्यामुळं तृप्त होईल असं जर आपणांला वाटत असेल, तर आपण खुशाल मेहेरच्या महालांत येऊन तिचं शेवटचं दर्शन घ्यावें— मी आतां आपणाला हरकत करीत नाहीं."

मतियाचे हे शब्द ऐकतांच बादशहा चटकन् आंत जावयास तयार झाला. त्याच्या हातांपायांतील गेलेली शक्ति जणुं काय पुनः परत आली. मेहेरचें अंत्य दर्शन घ्यावयाला तो अत्यंत उत्सुक झाला. मतिया पुढें निघाली व मागाहून बादशहा चालूं लागला. एखादा अपराधी न्यायसभेंत ज्याप्रमाणें खालीं मान घालून प्रवेश करतो, त्याप्रमाणें जहांगीर खालीं मान घालून मेहेरच्या महालांत शिरला. त्याचें हृदय आणि हृदयाबरोबर शरीर कांपूं लागलें. आपल्या प्राणांवर जड दडपण घालून त्याच्या भाराखालीं कोणी तरी त्यांना दडपीत आहे, असें त्याला वाटलें.

अल्पकालांत मतियाच्या मागून जहांगीर मेहेरच्या शयनगृहांत जाऊन पोंचला. भिंती-शेजारीं असलेल्या पलंगावर शुभ्र वस्त्राच्छा-दित शय्या पसरली असून तीवर मेहेरचा तो कुसुमकोमल देह निजविला होता. त्या वरून वक्षःप्रदेशापर्यंत एक बहुमूल्य झिर-झिरित शुभ्रवस्त्र टाकलें होतें.

जहांगिराचें हृदय आतां स्थिरावलें होतें. प्रत्यक्ष संकटाचा प्रसंग आला, म्हणजे अगोदर विगलित झालेल्या हृदयवृत्ति स्थिरा-वतात, असें पुष्कळांच्या अनुभवास येतें. जहांगिराचीही स्थिति त्या वेळीं अशीच झाली. त्यानें भक्तिभरानें व प्रेमपूर्वक मेहेरचें दर्शन घेतलें. तिच्या देहाकडे त्याची दृष्टि अगदीं खिळून गेली.

परंतु काय आश्चर्य ! मतिबिबी हळूहळू मेहेरच्या पलंगाजवळ गेली व तिच्या मुखाशीं आपलें तोंड नेऊन तिनें मृदु-स्वरानें हांक मारली. "मेहेर—मेहेरजान ! प्रियसखी !—"

मतियाची ही कृति पाहून बादशहा तर आश्चर्यानें स्तंभितच होऊन गेला! मतिया काय करीत आहे, हें त्याच्या लक्षांत येईना ! आपल्या नेहमींच्या थट्टे-खोर स्वभावाप्रमाणें या भलत्याच प्रसंगीं थट्टा करून आपणाला मतिया फस-वीत तर नसेल ना ? असाही जहांगिराला संशय आल्यावांचून राहिला नाहीं. ही मतिया पिशाची आहे, कीं देवी, तें त्याला कळेना ! जिच्या देहांतून प्राण निघून गेला, तिला कितीही प्रेमानें अगर मृदु-तेनें हांक मारली, तरी ती का जिवंत होऊन उठणार आहे ?

जहांगिरानें आश्चर्यप्रदर्शक स्वरानें म-तियाला विचारलें, "मतिया ! हें तूं काय करते आहेस ? अजनपर्यंत मला छळलेंस तें पुरे नाहींका झालें ? अशा शोकाच्या प्रसंगींही थट्टा करून तूं मला फसवावेंस हें तुला शोभतें काय ? माझ्या दुर्दैवानें मला विरहांत लोटून मेहेर तर केव्हांच निघून गेली ! तर तूं आतां हांक कुणाला मारतेस ?"

बादशहाचें हें भाषण ऐकून मतियाला हंसें आवरेना. ती हंसत हंसत त्याला म्हणाली:—"जहांपनाह ! आपली मी थट्टाही करीत नाहीं अन् मेहेर जीवंतही पण नाहीं! आम्हां स्त्रियांमध्यें किती अद्भुत शक्ति वास करीत आहे, हें जर आपणांला ठाऊक

असतं, तर आपणाला आज इतकं व्याकुल व्हावंच लागतं ना! अजून तरी माझ्या अद्भुत शक्तीवर आपला भरंवसा बसतो आहे कुठं? येईल येईल–एक दिवस अशीही वेळ येईल, कीं, आपणाला आम्हां स्त्रियांच्या शक्तीवरच सर्वस्वी अवलंबून रहावं लागेल. शहानशहा! आपला जर मजवर पूर्ण भरंवसा असेल तर इथल्या इथं मी आपणांला एक अद्भुत चमत्कार दाखवित्यें. प्रेमशास्त्रांत असा एक नियम आहे, कीं, विरहानं ज्यांना मरण येतं, त्यांच्यांत प्रेममीलनानं पुनः प्राणसंचार होतो. या आम्हां स्त्रियांच्या सामान्य शक्तीशिवाय मजपाशीं संजीवनीमंत्रही आहे. त्या मंत्राचं फल काय हें थोडक्या वेळांत इथल्या इथं मी आपणांला दाखवित्यें पहा!"

एखाद्या निर्जीव मूर्तीप्रमाणें बादशहा स्तब्ध उभा होता. मतियाच्या या दीर्घ व्याख्यानावर तो कांहींच बोलला नाहीं.

मतियानें पुनः कोमल कंठानें हांक मारली, "मेहेर–प्यारी मेहेर!"

मतियाच्या प्रेमसंबोधनानेंच जणूं काय मेहेरउन्निसाच्या मृत देहांत प्राणसंचार झाला! मेहेरनें हळूच आपले कमलसदृश डोळे उघडले.

"मेहेर–मेहेरजान!"

वीणाझंकारालाही मागें टाकणाऱ्या कोमल स्वरानें मेहेरजाननें हांक दिली, "काय प्रिय सखी?"

बादशहाकडे वक्र दृष्टीनें पहात मतिया हंसत हंसत ह्मणते:–"उठ मेहेर! तिकडे पहा बरं तुझ्या महालांत कोण आलं आहे तें?"

मतियाच्या सांगण्याप्रमाणें मेहेर हळूच उठून बसली. तिनें समोर पाहिलें तों खुद्द बादशहाची स्वारी! दिल्लीपति जहांगिरशहा या वेळीं तिच्यासमोर उभा होता. त्याचें मुखमंडल अगदीं म्लान होऊन गेलें होतें. त्याच्या डोळ्यांत नेहमीं चमकणारें तेज आज कोठें विलुप्त झालें होतें! त्याचे ओष्ठ कंप पावत होते. तो खालीं मान घालून उभा होता.

स्वतः पैगंबर महंमद जर त्या वेळीं मेहेरजानच्या समोर येऊन उभा राहिला असता, तर त्याला पाहून तिला जेवढें आश्चर्य वाटलें असतें, त्यापेक्षा जहांगिराला आपल्या महालांत पाहून तिला अधिक आश्चर्य वाटलें! हें स्वप्न तर नसेलना? असें वाटून तिनें पुनः डोळे मिटले. मेहेरचा आनंद गगनांत मावेना. इतक्या दिवसांनीं दैवाची आपणावर शुभ दृष्टि वळली, हें पाहून तिला अत्यंत हर्ष झाला. इतका वेळ तिला क्लांतीमुळें गाढ झोंप लागली होती. बाहेर काय काय गोष्टी घडून आल्या हें त्या बिचारीला मुळींसुद्धां ठाऊक नव्हतें.

इकडे जहांगीर आश्चर्यानें स्तंभित होऊन गेला. मेहेरच्या मृत देहांत प्राणसंचार झालेला पाहतांच मतियाला जादूटोणा यांची माहिती असावी, असें त्याला एकवार वाटलें. परंतु खरी स्थिति त्याच्या लवकरच ध्यानांत आली. मेहेरनें हें विष प्राशन केलें ही गोष्ट खरी; पण मतियाच्या प्रसंगावधानामुळें ती वांचली व तिच्या कुशलतेच्या युक्तीमुळें आपलें व मेहेरचें मधुर मीलन झालें, हें त्याला लवकरच कळून आलें.

बादशहानें मार्गे वळून हांक मारली, "मतिबिबी!"

परंतु मतिया त्या वेळीं तेथें कोठें होती? संधि पाहून तिनें तेथन केव्हांच पोबारा केला होता!

## प्रकरण चवदावें.

### मधुर मीलन.

दिल्लीपति जहांगीर व मेहेरउन्निसा या प्रणयियुगुलांत दैवदुर्विलासानें जे जे अंतराय उत्पन्न झाले होते, प्रीति-देवतेच्या प्रतापानें ते सर्व नाहींसे होऊन किती तरी दिवसांनीं त्यांच्या मधुर मीलनाच्या आज योग आला!

मेहेरच्या महालांत आतां अगदीं निर्मक्षिक झालें होतें, तरी सवईच्या आभावामुळें मेहेरशीं पहिल्यानें सांत्वनपर प्रेमाचे दोन शब्द बोलावयाला जहांगीराला लजा वाटूं लागली. तरी तसाच धीर धरून तो मेहेरजवळ गेला व तिचा हात प्रेमभरानें आपल्या हातीं घेऊन त्यानें तिला मृदु शब्दांनीं विचारलें, "मेहेर! प्यारी! आतां कसें काय वाटतें आहे तुला? वेडे! कांहीं झालें ह्मणून माणसानें असा का एकदम त्रागा करावा? बरें तर बरें, माझ्या सुदैवानें मतिबिबी जवळ होती ह्मणून, नाहीं तर केवढा अनर्थ झाला असता? तें असो. आतां—पण तुझी तब्बेत कशी आहे आतां प्यारी?"

जहांगिरच्या या प्रश्नाला मेहेरला कांहीं उत्तर देतां येईना! 'आतां बरी आहे तब्बेत,' हे शब्द शंभर वेळां तिच्या अगदीं ओठांशीं आले, परंतु तितक्याही वेळ ते परत गेले! तिची या वेळीं अगदीं चमत्कारिक स्थिति झाली होती. कृतज्ञता, अभिमान, प्रेम इत्यादि मनोविकार तिच्या हृदयांत प्रबळ आवेगानें प्रज्ज्वलित झाले होते. लज्जेनें तर तिच्या हृदयांत आपलें साम्राज्य स्थापन केलें होतें! आजपर्यंत मेहेरजानच्या हृदयराज्यांत दुःख व चिंता यांनीं जें कायमचें ठाणें धरलें होतें, त्यांना हर्ष व कृतज्ञता या विकारांनीं दूर हांकलून दिलें. अभिमानिनी मेहेरजानचें अभिमान हें तर मुख्य भूषण—या मंगलमय व आनंदाच्या प्रसंगींही या अलंकाराचा तिनें त्याग केला नाहीं! परंतु त्या अलंकारानें या वेळीं अत्यंत सुंदर रूप धारण केलें होतें. या वेळीं अभिमानाचा चिर सहचर जो क्रोध, तो कांहीं आला नाहीं—आले विपुल अश्रु!

जहांगीरच्या प्रश्नानें मेहेरला एकदम उमाळा येऊन तिच्या नेत्रांतून सारखा अश्रुप्रवाह वाहूं लागला. तिचा कोमल गंडप्रदेश त्या अश्रुजलानें भिजून गेला. अहाहा! त्या वेळीं मेहेरच्या नेत्रयुग्मातून जो सलिल प्रवाह येत होता, तो किती काव्यमय होता! अनेक कवींच्या सुंदर उच्च काव्यकल्पनांना त्यांनीं स्फूर्ति दिली असती! खरोखर मेहेरचे ते अश्रु अनंत प्रेमपूर्ण, भावपूर्ण, कातरतापूर्ण होते! त्या अश्रूंचें मूल्य सर्व साम्राज्याच्या मूल्याचे शेंकडोपटीनें अधिक आहे, असें प्रणयी जहांगीराला वाटलें!

जहांगीर धीर करून हळूहळू मेहेरच्या जवळ पलंगावर बसला व त्यानें आपल्या बहुमूल्य वस्त्रानें तिच्या नेत्रांतील अश्रु पुसून काढले. तृष्णातुर नेत्रांनीं तिच्या सुंदर मुखकमलाकडे दृष्टि लावून तो तिच्या अनंत लावण्यामृताचें पान करूं लागला. त्या अमृताच्या माधुरीला आज तुलनाच नव्हती!

ग्रीष्मऋतूंतील प्रचंड चंडकिरणाच्या तापानें त्रासलेला पथिक कितीही थंडगार सुवासिक पाणी प्याला, तरी ज्याप्रमाणें त्याची तृषा शांत होत नाहीं, त्याप्रमाणें मेहेरजानच्या सौंदर्याचें जहांगिरानें कितीही सेवन केलें तरी त्याच्या दर्शनतृष्णेची आज कांहीं केल्या शांति म्हणून होईना !

जहांगीर पाषाणहृदयी खरा--परंतु आज त्याचें तें पाषाणाचें हृदय विरघळून फुलापेक्षांहि कोमळ झालें होतें. आज स्वतः प्रेमानें आपला गौरव आणि प्रभाव त्याला चांगला समजून दिला होता ! त्याचें नयनयुग्म प्रेमाश्रुजलानें आर्द्र होऊन गेलें होतें. कंठ रुद्ध होऊन गेल्यामुळें त्याला नीट बोलतांही येत नव्हतें. त्याची दृष्टि प्रेमपूर्ण व कातर दिसत होती. प्रेमोच्छ्वासानें जहांगिराची आज अशी स्थिति झाली यांत कांहीं नवल नाहीं. मरुभूमींतही कधीं कधीं जलवृष्टि होऊन तिला आर्द्रता येते. कठीण पाषाणाखालींही कधीं कधीं जलप्रवाह लुप्त असलेले आढळून येतात !

जिचा आजवर अत्यंत अनादर झाला, जिची सर्वांनीं उपेक्षा केली, त्या मेहेरचें सौंदर्य अनादराला व उपेक्षेला न जुमानतां अधिकच तेजोमय झालें आहे, असें बादशहाला आढळून आलें. चिंतेनें लुप्त झालेल्या तिच्या तनुलतिकेंत रूपज्योतीचे तरंग उसळत आहेत, असें त्याला वाटलें. मेहेरचें 'शांत, तेजोमय नयनयुगुल नीरव भाषेंत प्रेमाच्या अनेक करुणकथा बादशहाला सांगत होतें ! आजपर्यंत ही मूकभाषा बादशहाला समजत नव्हती—आज एकाएकीं प्रेमदेवतेच्या प्रभावामुळें त्या भाषेचें रहस्य त्याला समजूं लागलें !

मेहेरजाननें जरी इतके दिवस तीव्र मनोवेदनांत आणि हालअपेष्टांत काढले होते, तरी तिचें तें कमलतुल्य लोचनयुगुल, पाठीवर इतस्ततः रुळणारी वेणी न घालतां मोकळा सोडलेला, भ्रमराप्रमाणें काळाभोर मनोहर केशकलाप, हत्तीच्या शुंडेप्रमाणें मांसल व सरल बाहुयुग्म, गोरोचनाप्रमाणें सतेज गौर व पीत वर्णांची मिश्र शरीर–कान्ति, बिंबतुल्य रक्त ओष्ठावर नाचणारें तें मधुर हास्य, हीं सर्व पूर्वीप्रमाणेंच अजूनही रम्य आहेत, अशी जहांगिरशहाची खात्री झाली. बादशाही रंगमहालांत ज्या अनेक रूपवती तरुण रमणी होत्या, त्यांचें सौंदर्य मेहेरच्या दिव्य सौंदर्यापुढें जणूं काय मलिन होऊन गेलें आहे, असें बादशहाला वाटलें. आजपर्यंत मेहेरचें स्वर्गीय लावण्य आपल्या डोळ्यांसमोर असतां त्यांतलें खरें रहस्य आपणाला कसें समजलें नाहीं याबद्दल त्याला मोठें आश्चर्य वाटलें !

रूपाचें काम रूप करून गेलें. बादशहाच्या हृदयावर त्यानें पूर्ण जय मिळविला ! यानंतर स्पर्शानें आपला प्रभाव दाखविण्यास प्रारंभ केला. रूपाच्या प्रभावापेक्षांही स्पर्शाचा पराक्रम अधिक आहे, अशी जहांगिराची खात्री झाली. भीत हृदयानें, लज्जाभावपूर्ण अंतःकरणानें मेहेरचे दोन्ही हात बादशहानें मोठ्या प्रेमादरानें आपल्या हातीं घेतले. त्याचें सर्व शरीर रोमांचित झालें. भयाच्या वेळेप्रमाणें प्रणयप्रसंगींही प्रणयिजनांच्या शरीराला कंप सुटतो. त्याप्रमाणें बादशहाच्या देहाला कंप सुटला. त्या निःसीम रूपवती रमणीच्या शरीरस्पर्शांत अवर्णनीय कोमलता वास करीत होती, त्याप्रमाणें तिच्या

सुगंधित श्वासांतही मृदुलता होती! त्या सौंदर्यांत तरी किती मधुरता! बादशहाच्या हृदयांत ज्या अपूर्व प्रेमवन्हीचा उगम झाला होता, त्याला आज चांगलीच आहुति मिळाली!

अहाहा! तो दिवस आणि आजचा हा दिवस! दोहोंत किती साम्य आणि किती भेद! जहांगीर आणि मेहेरउन्निसा हीं उभयतां त्या वेळीं अगदीं प्रथम यौवनस्थितींत होतीं. त्या वेळीं त्या उभयतांच्या चार चक्षूंचें प्रथम प्रेममीलन झालें. भर यौवनांत–रूपाच्या पूर्ण कलेंत–ती सुंदरी विराजमान झाली असतां आग्र्याच्या राजप्रासादांतच जहांगिरानें तिला पहिल्या प्रथम पाहिलें. त्या वेळीं हृदयाची आशा पूर्ण झाली नाहीं. परंतु ते दिवस गेले! मध्यंतरीं उभयतांच्या प्रेमांत किती अंतराय उत्पन्न झाले. एकमेकांच्या मनःप्रवृत्तींत किती फरक होऊन गेले. शेवटीं, परमेश्वराच्या कृपाप्रसादानें व प्रेमदेवतेच्या प्रभावामुळें सर्व संकटें, सर्व अंतराय, सर्व किल्मिषें नाहींशी होऊन आजच्या या पुनर्मीलनाचा योग आला! आजचा दिवस तरी किती सौख्याचा! शयनीं स्वप्नीं, आहार–विहारांत, बसतां उठतां ज्या मोहिनीची रमणीय मूर्ति अतिशय गुप्तपणानें जहांगीरानें आपल्या हृदयांतील गुप्त कंदरांत आजपर्यंत लपवून ठेविली होती, आपल्या मानसचक्षूंनीं जिचें तो नित्य दर्शन घेत असे, त्या मोहिनीच्या शेजारीं आज तो बसला होता! त्या मोहिनीचे दोन हात त्याच्या हातांत होते! दिल्लीपति जहांगीर आज आग्र्यांतील राजप्रासादांतील मेहेरच्या महालांत होता कीं स्वर्गांतील नंदनवनांत बसला होता! नंदनकाननांतील एका एकांत लतानिकुंजांत, स्वर्गांतील एका देवांगनेशेजारीं बसून तिच्या मधुर सहवासाचें सौख्य आपण सेवन करीत आहों असें बादशहाला वाटलें!

तें प्रणयियुग्म किती वेळ स्तब्ध बसणार? बादशहानें पहिल्यानें स्तब्धतेचा भंग केला. प्रेमपूर्ण मृदु स्वरानें तो मेहेरला म्हणालाः–"मेहेर! मी अधमाधम आहें. मी तुझे अनंत अपराध केले आहेत. मी तुझी क्षमा मागायला आज तुझ्याजवळ आलों आहे. मेहेर! प्यारी! या याचकाला तूं क्षमेची भिक्षा घालणार नाहींस का? कोमल हृदयाच्या स्त्रीवृंदांची तूं शिरोमणि! तुझें हृदय खास इतकें कठोर नसेल!"

मेहेरनें आपल्या हातांनीं डोळे पुसले बादशहाशीं बोलण्याचा तिचा प्रयत्न या वेळीं सफल झाला. खालीं मान घालून ती कोकिल स्वरानें म्हणालीः–"जहांपनाह!–"

मेहेरच्या मनांत आणखीही कांहीं बोलावयाचें होतें असें दिसलें. परंतु कंठ दाटून आल्यामुळें आणि लज्जेच्या प्रभावामुळें तिच्या तोंडून शब्द फुटेना. तोंडाशीं आलेले शब्द तसेच लज्जेमुळें मागें जात! त्या एकांत महालांत प्रियकराशिवाय दुसरें कोणीही नव्हतें तरी इतकी लज्जा! जहांगिराशीं बोलावयाची अत्यंत आतुरता असतांही कोणी अज्ञातशक्ति जणूं काय तिचा गळा चेंपून धरीत होती!

प्रेमभरानें मेहेरची हनुवटी धरून जहांगिरानें आदरानें हांक मारली, "हृदयेश्वरि!"

मेहेर लज्जाशील नववधूप्रमाणें खालीं मान घालून स्तब्ध बसली होती. तिच्या तोंडून शब्द येईना!

हंसत हंसत तिच्याकडे पहात बादशहा म्हणाला:—"मेहेर! प्राणेश्वरि! मीं तुझे अनंत अपराध केले आहेत हें तर खरेंच आहे. परंतु माझ्या शुद्ध हृदयाकडे लक्ष्य देऊन तूं मला क्षमा कर. मी जरी दिल्लीचा बादशहा, सर्व हिंदुस्थानच्या साम्राज्याचा सम्राट् असलों, तरी मी एक मनुष्यच आहें. मनुष्याच्या मनःप्रवृत्तीमुळें तो कधीं कधीं भ्रमानें अंध होतो. मनुष्याला जन्म देतांनाच परमेश्वर त्याच्या ठिकाणीं असा मनोधर्म उत्पन्न करीत असतो. या नैसर्गिक धर्मामुळें मीही भ्रमांध झालों होतों. स्वार्थपरायण, असहिष्णु, दुष्ट अशा पियारी बेगमच्या सांगण्यावरून मी फसलों. तिच्या दुष्ट कृतीचाच इतका हा दारुण परिणाम झाला. त्या पापिष्ठ स्त्रीला तिच्या पापाचें फल भोगण्याकरितां मीं कारागृहांत पाठवून दिली आहे. सर्व जन्मभर तेथें राहून हाता-पायांतील शृंखलाशीं हितगुज करीत पियारीला पश्चात्ताप करूं दे! प्यारी मेहेर! मजकडून तुला आजपर्यंत जो ताप झाला त्याची भरपाई ह्मणून आजपासून तुला मी दिल्लीश्वरी करतों. परंतु मेहेर—मला सांग—या अधमाला तूं पूर्ण क्षमा केलीस ना?"

मेहेरउन्निसा गद्गद कंठानें परंतु विनम्र स्वरानें बादशहाला ह्मणाली:—"जहांपनाह! आपल्या पायांच्या बटकीचीही बरोबरी व्हायची माझी योग्यता नाहीं. या क्षुद्र दासीकरतां स्वतःला कशाला बरं व्यर्थ दूषणं लावून घ्यायचीं? मी तर क्षुद्राहूनही क्षुद्र आहें. क्षुद्र जनाच्या ठिकाणीं उच्च दर्जाच्या लोकांचा अपराध होणं संभवनीय तरी आहे का? मग आपण माझी क्षमा कसली बरं मागायची? आपला लवमात्र अपराध नसतांहो आपण अपराधी आहों, असें स्वमुखानें आपण मला ह्मणायचें ही आपल्या मनाची निःसीम उदारता—आपल्या हृदयाचा हा थोरपणा आहे. अदृष्टाच्या खेळांमुळें ज्या ज्या कांहीं गोष्टी घडून आल्या, त्या मी विसरूनही गेल्यें. त्याबद्दल आपण आतां कांहीं मनांतसुद्धां आणूं नये. आपल्या मुखांतून पुनः कधीं देखील ही गोष्ट येऊं नये, अशी या दासीची आपणाला विनंति आहे. नाहीं तर मजवर आपलं खरं प्रेम नाहीं असंच मी समजेन!" असें ह्मणून स्निग्ध दृष्टीनें आपल्या प्रियकराकडे पहात मेहेरजाननें सुधापूर्ण मधुर स्मित केलें.

प्रिय-प्रियेच्या हृदयांतील सारें किल्मिष नाहींसें झालें. त्यानंतर त्या उभयतांमध्यें किती किती प्रेमाच्या गोष्टी झाल्या. वाचकहो! प्रणयियुग्माच्या त्या गोष्टी ऐकावयाचें तुह्मांला आह्मांला कांहीं प्रयोजन नाहीं.

जहांगीरानें मेहेरला दृढालिंगन दिलें! उभयतांच्या मुखमंडलावर मधुर आनंद उदय पावला. उभयतांमध्यें हास्यरसाचे फवारे उडूं लागले.

* * *

मतिया व महाराणी जोधबाई त्या प्रणयियुग्माचें प्रेमरहस्य दरवाजामागें उभ्या राहून स्वस्थपणें पहात होत्या. आपल्या सर्व श्रमाचें सार्थक होऊन आपल्या प्रिय सखीवर बादशहाचें लुप्त प्रेम पुनरपि जडलें, याबद्दल त्यांना जो आनंद झाला त्याचें वर्णन करणें व्यर्थ आहे!

कांहीं वेळानें मतिया महलांत गेली. जहांगीरापुढें जाऊन हात जोडून हंसत हंसत ती त्याला ह्मणते, "जहांपनाह! आमच्या साहाय्याशिवायच आपण आपला गांधर्व-विवाह उरकून घेतला आहे. आपल्या

दृष्टीनं मी तर मोठीच अपराधी आहें. परंतु विशेष आनंदाच्या प्रसंगीं भूपती कडून अपराध्यांना त्यांच्या अपराधांची माफी होत असते. या शिष्टाचाराला अनुसरून या अभागिनीलाही अपराधाची क्षमा मिळेल अशी मी आशा केली, तर मला वाटतं ती परिपूर्ण होणं फारसं कठीण नाहीं!"

मतियाला एकदम महालांत आलेली पहातांच जहांगीर व मेहेर या उभयतांनाही लज्जा वाटली. मतियाबद्दल उभयतांचें हृदय कृतज्ञतेनें भरून आलें! केवळ मतियाच्याच प्रसंगावधानानें व चातुर्यानें त्या प्रणयिजनांचें आज मीलन झालें होतें!

हंसत हंसत लज्जित भावानें जहांगीर मतियाला ह्मणाला:—"मतिबिबी! आज तूं मोठी चतुराईच केलीस! याबद्दल राजेसाहेबांपाशीं मी तुझी चांगली शिफारस करीन हो! मतिया! तुझ्या प्रिय सखी जवळ मीं क्षमा मागितलीच आहे; तुजपाशींही मी क्षमेची भिक्षा मागतों. मघाशीं तुझ्याशीं जें मी दांडगाईचें व शिष्टाचाराला सोडून वर्तन केलें, त्याबद्दल मला फार लाज वाटते."

हंसत हंसत मतिया ह्मणाली:—"जहांपनाह! तिकडच्यापाशीं माझ्या चतुरतेची आपण शिफारस करणार अहां, हे मजवर आपले डोंगराएवढे उपकार आहेत. सरकार! दासीच्या धारिष्टाची क्षमा असावी. आपला मजवर निःसीम अनुग्रह आहे, ह्मणूनच इतक्या दूरपर्यंत थट्टाविनोद करण्याचं या दासीला साहस होतं."

इतक्यांत महाराणी जोधबाईहि प्रफुल्ल मुखानें हंसत हंसत तेथें आली व जहांगिराच्या डाव्या बाजूला जाऊन बसली. स्निग्ध दृष्टीनें मेहेरजानकडे पाहून ती ह्मणाली:—"प्रिय सखी मेहेर! तुला मीं सिंहासन अर्पण केलं आहे. आपल्या अमूल्य सद्गुणसमूहामुळं त्या उच्च स्थानाला तूं सर्वथैव योग्य आहेस. तो दयाघन परमेश्वर तुजवर सदासर्वदा सौख्याची विपुल वृष्टि करील, असा माझा तुला आशीर्वाद आहे."

महाराणी महालांत आलेली पहातांच मेहेरउन्निसा तांतडीनें उठून तिच्यापाशीं गेली व तिनें तिचे पाय धरले. मेहेरला वर उचलून व हृदयाशीं धरून जोधबाई तिला ह्मणाली:—"छे छे! भगिनी! माझे का पाय धरावेस तूं!"

मेहेरउन्निसा अश्रुपूर्ण नेत्रांनीं ह्मणाली:—"देवि! आपल्या चरणधूलीच्या कणाचीही मला योग्यता नाहीं. जोंपर्यंत माझ्या देहांत प्राण आहे, तोंपर्यंत आपलं निःसीम महत्व अन् योग्यता यांचं मला कधींही विस्मरण पडणार नाहीं. दिल्लीचें उच्च सिंहासन मला मुळींच योग्य नाहीं. माझ्या स्पर्शानं तें कलंकित मात्र होईल. आपण महाराज्ञि! सर्व प्रकारानं तें आपणांलाच योग्य आहे. आपण दिल्लीच्या सिंहासनाला चिरकाल भूषण अहां."

जोधबाईनें यावर मेहेरला कांहीं उत्तर दिलें नाहीं. आपल्या वस्त्राखालून तिनें एक लहानशी नकशीचें काम केलेली सुंदर सुवर्णाची पेटी काढली व त्यांतून एक बहुमूल्य हीरक-वलय बाहेर काढून तिनें स्वहस्तानें तें मेहेरच्या सुंदर हातांत चढविलें. त्या बहुमूल्य हीरक-वलयानें मेहेरच्या हाताला शोभा प्राप्त झाली, किंवा मेहेरच्या हातानें त्या हीरक-वलयाची

शोभा वृद्धिंगत झाली, हें सांगणें मोठें कठिण आहे.

हीरक-वलय मेहेरच्या हातांत घालतां घालतां महाराणी हंसून तिला म्हणाली:- " हें हीरक-वलय तुम्हां उभयतांच्या मधुर मीलनाची आठवण म्हणून मी तुला अर्पण करत्यें. याला तूं कधीं विसरूं नकोस हो! "

जोंपर्यंत मेहेरच्या देहांत प्राण होता, तों-पर्यंत त्या सुंदर स्मृति-चिन्हाचें तिला कधींही विस्मरण पडलें नाहीं.

याप्रमाणें त्या सर्व मंडळीला ती रात्र अत्यंत सुखाची गेली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं प्रातःसूर्याच्या किरणरेखांनीं आग्रा शहर भूषित झालें नाहीं तोंच, ' नूरजहान ' असें नांव धारण करून मेहेरउन्निसा पट्ट-राणीच्या पदावर विराजमान झाल्याची बादशहानें शहरांत दौंडी पिटविली !

* * *

नूरजहान बेगमेच्या उदारतेमुळें सेनापति रुस्तम कारागृहांतून मुक्त होऊन पुनरपि आपल्या पदावर विराजमान झाला; आणि सर्वनाशी, राक्षसी पियारी बेगम? कारागृहांत विषपान करून सर्व यातनांपासून तिनें आपली मुक्तता करून घेतली ! तिच्या मुक्ततेविषयीं नूरजहाननें पुष्कळ प्रयत्न केला असतांही तिचें रक्षण करण्यांत तिला यश आलें नाहीं !

